भाषांतरमाला क्र. ७८

# असंस्कृत समाजातील लैंगिकता

## व ती दडपून टाकण्याची प्रक्रिया

लेखक
ब्रॉनिस्लाव्ह मालिनौस्की

**Sex And Repression In Savage Society**
या ग्रंथाचे भाषांतर

भाषांतरकार
दिनकर धोंडो कर्वे




महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई

प्रथमावृत्ती : १९७८ ( शके १९०० )

प्रकाशक


सचिव,
महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ,
मंत्रालय, मुंबई—३२

मुद्रक :
श. म. देव
व्यवस्थापक,
सुलभ मुद्रणालय
२९१ शनिवार पेठ, पुणे ३०

किंमत रुपये १४/–

# अर्पण - पत्रिका

माझे स्नेही पॉल खूनर ह्यांना
न्यू गिनी १९१४, ऑस्ट्रेलिया १९१८,
दक्षिण टिरोल १९२०

# निवेदन

१. आधुनिक शास्त्रे, ज्ञानविज्ञाने, तंत्र आणि अभियांत्रिकी इत्यादी क्षेत्रांत त्याचप्रमाणे भारतीय प्राचीन संस्कृती, इतिहास, कला इत्यादी विषयांत मराठी भाषेला विद्यापीठाच्या स्तरावर ज्ञानदान करण्याचे सामर्थ्य यावे हा उद्देश लक्षात घेऊन साहित्य-संस्कृती मंडळाने वाङ्मय-निर्मितीचा विविध कार्यक्रम हाती घेतला आहे. मराठी विश्वकोश, मराठी भाषेचा शब्दकोश, वाङ्मयकोश, विज्ञानमाला, भाषांतरमाला, आंतरभारती, विश्वभारती, महाराष्ट्रेतिहास इत्यादी योजना या कार्यक्रमात अंतर्भूत केल्या आहेत.

२. मराठी भाषेला विद्यापीठीय भाषेचे स्वरूप व दर्जा देण्याकरिता मराठीत विज्ञान आणि तंत्रविज्ञान, तत्त्वज्ञान व सामाजिक शास्त्रे या विषयांवरील संशोधनात्मक व अद्ययावत माहितीने युक्त अशा ग्रंथांची रचना मोठ्या प्रमाणावर होण्याची आवश्यकता आहे. शिक्षणाच्या प्रसाराने मराठी भाषेचा विकास होईल ही गोष्ट तर निर्विवादच आहे. पण मराठी भाषेचा विकास होण्यास आणखीही एक साधन आहे आणि ते साधन म्हणजे मराठी भाषेत निर्माण होणारे उत्कृष्ट वाङ्मय हे होय. जीवनाच्या भाषेतच ज्ञान व संस्कृती यांचे अधिष्ठान तयार व्हावे लागते. जोपर्यंत माणसे परकीय भाषेच्याच आश्रयाने शिक्षण घेतात, कामे करतात व विचार व्यक्त करतात तोपर्यंत शिक्षण सकस बनत नाही, संशोधनाला परावलंबित्व राहते व विचाराला अस्सलपणा येत नाही, एवढेच नव्हे तर वेगाने वाढणाऱ्या ज्ञानविज्ञानापासून सर्वसामान्य माणसे वंचित राहतात.

३. संस्कृत व अन्य भारतीय भाषांतील आणि त्याचप्रमाणे इंग्रजी, फ्रेंच, जर्मन, इटालियन, रशियन, ग्रीक, लॅटिन इत्यादी पश्चिम भाषांतील अभिजात ग्रंथांचे व उच्च साहित्यामधील विशेष निवडक पुस्तकांचे भाषांतर किंवा सारांश अनुवाद अथवा विस्तृत ग्रंथांचा आवश्यक तेवढा परिचय करून देणे हा मंडळाच्या वाङ्मयीन कार्यक्रमातील भाषांतरमालेचा उद्देश आहे.

४. भाषांतर योजनेतील पहिला कार्यक्रम मंडळाने आखून ज्यांना अग्रक्रम दिला पाहिजे अशी पाश्चात्य व भारतीय भाषांतील सुमारे २०० पुस्तके निवडली आहेत. होमर, व्हर्जिल, इस्किलस, ॲरिस्टोफेनिस, युरायपिडिस, प्लेटो, ॲरिस्टॉटल, थॉमस ॲक्वाइनस, न्यूटन, डार्विन, रूसो, कान्ट, हेगल, जॉन स्टुअर्ट मिल, गटे, शेक्सपीअर, टॉलस्टॉय, डास्टोएव्हस्की, कॉसिरेर, गॉर्डन व्ही. चाइल्ड इत्यादिकांचा या भाषांतरमालेत समावेश केला आहे. संस्कृतमधील वेद, उपनिषदे, महाभारत, रामायण, भरताचे नाट्यशास्त्र, संगीत रत्नाकर, ध्वन्यालोक, प्राकृतातील गाथासप्तशती, त्रिपिटकातील निवडक भाग इत्यादिकांचाही भाषांतरमालेत समावेश केला आहे.

५. भाषांतर योजनेखाली मंडळाने आतापर्यंत ५६ अभिजात ग्रंथांची भाषांतरे प्रकाशित केली आहेत. जॉन स्टुअर्ट मिलचे "On Liberty", रूसोचे "Social Contract", एम. एन. रॉयची "Reason, Romanticism & Revolution" व Letters from Jail", स्तानिस्लाव्स्कीची "An Actor

Prepares " व "Building a Charactor", तुर्गिनेव्ह्चे "Fathers and Sons", रायशेनबाखचे "Rise of Scientific Philosophy", गन्नार मिरदाल्चे "Economic Theory and under-developed Regions", भारतरत्न कै. पां. वा. काणे यांचे "History of Dharmashastra", कोपूलँडचे "Music and Imagination", बर्ट्रान्ड रसेलचे "Religion and Science" व "Problems of Philosophy", तेरझागीचे "Theoretical Soil Mechanics", विशाखादत्ताचे "मुद्राराक्षसम्", भरतमुनींचे "भरत-नाट्यशास्त्र" (अध्याय ६ व ७ आणि अध्याय १८ व १९), निकोलाय मनुचीचे "Storia Do Mogor", ए. सी. पिगुलिखित "Socialism Vs. Capitalism", इझाडोरा डंकनचे "My Life", स्ट्रॅविन्स्कीचे "Poetics of Music", के. एम्. मसानींचे "A Text-Book of Gynaecology", रुबेन लेवीचे "Social Structure of Islam", सी. ए. आर्. क्रॉसलंडचे "Future of Socialism", कोनराड लॉरेन्झचे "On Aggression" इत्यादी पुस्तकांची भाषांतरे व सारानुवाद प्रकाशित झाले आहेत.

६. श्री. ब्रानिस्लाव मालिनोव्स्की लिखित "Sex & Repression in Savage Society" हे मूळ इंग्रजी भाषेतील पुस्तक डॉ. दि. धों. कर्वे यांनी मराठीत भाषांतरित केले असून सदर पुस्तकात वैद्यकीय व्यवसायातील मनोविश्लेषण-शास्त्राचा मानसशास्त्राशी व या दोन्ही शास्त्रांचा जीव व समाज शास्त्रांशी संबंध असल्याचे दर्शविण्यासाठी फ्रॉइडच्या मानसशास्त्राबद्दलचे विचार, कलह, उपजतप्रवृत्ती दाबून टाकणे, मनाचा सुप्त भाग, मनोगंडाची घडण वगैरे विषय मूळ लेखकाने निवडले आहेत. यासाठी एकूण चार प्रश्नांचे स्पष्टीकरण सदर पुस्तकात केले आहे. पहिल्या भागात कुटुंबसंस्था, विवाह वगैरेबाबत चर्चा करण्यात आली आहे. दुसऱ्या भागात दंतकथा, पौराणिक गोष्टी, काही रानटी व क्रूर चालीरीती वगैरे गोष्टींवर होणारा कुटुंबसंस्थेचा परिणाम या सर्व गोष्टींचा विशेष विचार करण्यात आला आहे. तसेच, सदर दोन्ही प्रश्नांचा सर्वसाधारण विचार इतर दोन भागांत केला आहे. यासाठी जगातील काही अस्पृश्य जमातींची उदाहरणे मूळ लेखकाने घेतली असून समर्थनार्थ उपयुक्त व उपलब्धतेनुसार अधिकाधिक माहिती देण्यात आली आहे. कठीण शास्त्रीय विषयही सोपा करून मांडण्याची हातोटी भाषांतरकर्त्यांपाशी आहे. अनुवादाची भाषा साधी, सरळ व प्रवाही आहे व त्यामुळे अनुवाद वाचनीय झाला आहे. या इंग्रजी पुस्तकाचा "असंस्कृत समाजातील लैंगिकता" या शीर्षकाने मंडळाच्या भाषांतरमालेत प्रकाशित करण्यास मंडळास आनंद होत आहे.

मंत्रालय, मुंबई,
१३ कार्तिक, १९००
४ नोव्हेंबर, १९७८

**लक्ष्मणशास्त्री जोशी**
अध्यक्ष
महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ.

# प्रस्तावना

गेल्या दहा वर्षांत मनोविश्लेषणाच्या तत्त्वाला लोकांमध्ये विलक्षण मान्यता लाभलेली आहे. त्या तत्त्वाचा प्रभाव आधुनिक वाङ्मय, शास्त्र व कला ह्यांवर दिवसेंदिवस वाढत्या प्रमाणात दिसत आहे. थोडक्यात म्हणजे काही दिवस मनोविश्लेषण ही एक नवी टूमच लोकांच्यात बनली आहे. ह्यामुळे कित्येक मूर्ख माणसे अगदी भारून गेली आहेत, तर कित्येक विद्वानांना धक्का बसून ते त्यापासून अलग राहिले आहेत. प्रस्तुत लेखक हा पहिल्या वर्गात मोडत असला पाहिजे कारण काही कालपर्यंत त्याच्यावर फ्रॉइड, रिव्हर्स, युंग आणि जोन्स ह्यांच्या उपपत्तींचा बराच पगडा बसला होता. पण कोणत्याही विद्यार्थ्यावर अखेर पांडित्याचाच मुख्य परिणाम होतो आणि लवकरच जास्त विचार केल्यावर माझा प्राथमिक उत्साह थंड झाला.

हा सर्व बदल व त्यातील सर्व घडामोडी प्रस्तुतच्या लहानशा ग्रंथाचे काळजीपूर्वक वाचन करणाऱ्याला समजून येतील. पण काही नाट्यमय घटनेने माझे मतपरिवर्तन झाले अशी अपेक्षा वाचकाने करू नये. मी मनोविश्लेषणाच्या प्रत्यक्ष प्रयोगांचा अनुयायी कधीच नव्हतो किंवा त्याच्या उपपत्तींचा अभिमानीही नव्हतो. आणि सध्या जरी मनोविश्लेषणाच्या बाजूने केलेली विधाने मला भरमसाट वाटली किंवा त्याची परिभाषा व गोंधळाची तर्कपद्धती मला पूर्णपणे नापसंत असली तरी मला हे कबूल केलेच पाहिजे की मनोविश्लेषणाने मला ऋणी केले आहे व त्यापासून मानवी मानसशास्त्राच्या काही बाजूंच्या अभ्यासात मला उत्साह व मौल्यवान शिक्षण मिळालेले आहे.

मनोविश्लेषणशास्त्राने आपल्याला मनाबद्दलच्या एका गतिमान उपपत्तीचे दर्शन घडविले आहे. मनातील व्यापारांबद्दलच्या अभ्यासाला एका सत्यसृष्टीत आणले आहे आणि आपण आता लहान मुलांच्या मनाची परिस्थिती आणि व्यक्तीच्या मनःस्थितीचा इतिहास ह्यांकडे लक्ष देऊ लागलो आहो. आणि शेवटी— हे कमी महत्त्वाचे नाही खास— त्या शास्त्राने आपल्याला मानवी जीवनातील सुप्त व न कळलेल्या अशा बाजूंकडे लक्ष द्यावयास लावले आहे.

लैंगिकतेचा उघड उल्लेख व अभ्यास, आणि मानवातील अनेक लाजिरवाणे नीच गुण व खोटे अभिमान— ज्यांकरता मनोविश्लेषणशास्त्राला कडवा विरोध होऊन त्याला तुच्छ मानण्यात येते— हे माझ्या मते शास्त्रीय दृष्ट्या फार महत्त्वाचे आहेत, आणि म्हणून मानवाचा अभ्यास करणाऱ्या जिज्ञासूला ते आवडावेत; अर्थात त्याला आपल्या संशोधन विषयाचा अभ्यास कोणचाही आडपडदा न ठेवता करावयाचा असेल तर जरी त्यांच्याशी लैंगिकतेच्या अभ्यासात माझे मतभेद असले तरी हॅवेलॉक एलिसचा शिष्य आणि अनुयायी असल्यामुळे मी फ्रॉइडवर सर्वच क्षेत्रात

लैंगिकता आणल्याचा आरोप करणार नाही. तसेच फ्रॉइडची मते स्वीकारताना मी विरोधाचे प्रदर्शन करून त्याच्या अमंगल वाणीशी स्पर्धा न करता हात धुऊन मोकळा होणार नाही. मानव हाही एक प्राणीच आहे आणि अर्थातच कधीकधी तो अशुद्ध असू शकतो. ही गोष्ट प्रामाणिक मानववंशशास्त्राला लक्षात घेणे भागच आहे. अभ्यासकाची मनोविश्लेषणशास्त्राबद्दलची तक्रार अशी नाही की त्या शास्त्राने लैंगिकतेची चर्चा उघडपणे केली; ती तक्रार अशी आहे की, ती चर्चा चुकीची आहे.

प्रस्तुत ग्रंथाचा चित्रविचित्र इतिहास असा आहे की, त्याची पहिली दोन प्रकरणे इतर भागांच्या बरीच आधी लिहिली गेली. त्यात उल्लेखिलेली मते व कल्पना मी प्रवाळखडकांच्या द्वीपसमूहावर राहणाऱ्या मेलानेशियातील जनसमूहांचा अभ्यास करताना बनलेल्या होत्या. माझे स्नेही प्राध्यापक सेलिग्मान ह्यांनी मला पाठवलेल्या सूचना व त्यांनीच प्रेमाने पाठवलेले काही वाङ्मय ह्यांवरून ईडिपस मनोगंडाचा व मनात दडलेल्या अज्ञात प्रवृत्तींचा आविष्कार मातृसत्तेवर आधारलेल्या समाजांत कसा होईल ह्याबद्दल विचार करण्यास मला उत्तेजन मिळाले. ( मुलांना मातापित्यांपैकी भिन्नलिंगी व्यक्तीबद्दल आकर्षण वाटणे ह्याला ईडिपस मनोगंड अशी संज्ञा मनोविश्लेषण शास्त्रात दिली जाते. ) माझ्या माहितीप्रमाणे मेलानेशिन जमातींच्या मातृसत्ताक समूहात केलेले निरीक्षण हे असंस्कृत जीवनाच्या अभ्यासात वापरलेले मनोविश्लेषणाचे पहिलेच उदाहरण आहे, आणि म्हणून मानवाच्या, त्याच्या मनाच्या आणि त्याच्या संस्कृतीच्या, अभ्यासाला ते उपयुक्त ठरण्याची शक्यता आहे. माझे निष्कर्ष मी ज्या परिभाषेत मांडले ती बरीच मनोविश्लेषणाच्या धर्तीची आहे व आज बहुधा ती मी वापरली नसती तरीही मी " मनोगंड " ( कॉम्प्लेक्स ) व दडपून टाकणे ( रिप्रेशन ) ह्या शब्दांपलीकडे जात नाही; आणि ते शब्दही मी अगदी सुस्पष्ट व प्रयोगसिद्ध अशा रीतीनेच वापरले आहेत.

जसजसे मी अधीक अधीक वाचन करू लागलो तसतसे फ्रॉइडचे सिद्धांत सरसकट मान्य करण्याकडे माझा कल होईनासा झाला. आणि त्याच्या अनुयायांच्या मनोविश्लेषणाचे प्रकार व उपप्रकार तर मला अजीबातच पटेनासे झाले. मी मानववंशशास्त्रज्ञ असल्यामुळे माझे स्पष्ट मत आहे की, असंस्कृत मानवांसंबंधींच्या महत्त्वाकांक्षी उपपत्या, मानवी समाजांतील संस्थांची उत्पत्ती, त्यांच्या संस्कृतीचा इतिहास, ही सर्व आदिवासींच्या जीवनाच्या तपशीलवार अभ्यासावर व माहितीवर, व तसेच मानवी मनाच्या उघड आणि सुप्त प्रवृत्तींच्या ज्ञानावर आधारलेली असली पाहिजेत. खरे पाहिले तर सांघिक विवाह, कुलचिन्ह म्हणून वापरलेल्या वस्तू, पुरुषाने सासूचा चेहेरा न पाहणे, किंवा जादूचे प्रयोग ह्या गोष्टी काही मनाच्या " सुप्त भागात " घडत नाहीत. ह्या सर्व समाजशास्त्रीय व सांस्कृतिक अशा उघडउघड दिसणाऱ्या घटना आहेत आणि त्यांच्याशी तात्त्विक पातळीवर मुकाबला करताना जो अनुभव जरूर लागतो तो डॉक्टरच्या सल्ला देण्याच्या खोलीत ( कन्सल्टिंग रूम ) मिळत नसतो. माझे

हे विचार योग्य आहेत व माझ्या शंकांना योग्य आधार आहे, हे मला फ्रॉइडच्या Totem and Taboo ( कुलचिन्ह व निषेध ), आणि Group-psychology and the Analysis of the Ego ( संघाचे मानसशास्त्र व स्वत्वाचे पृथक्करण ) ह्या पुस्तकांच्या, तसेच रोहाइमच्या Australian Totemism ( ऑस्ट्रेलियातील कुलचिन्हे ), आणि राइक्, रँक, जोन्स ह्यांच्या मानववंशशास्त्रीय ग्रंथांच्या वाचनाने स्पष्ट कळून आले. माझे निष्कर्ष योग्य आधारावर उभारलेले आहेत हे वाचकाला प्रस्तुत ग्रंथाच्या तिसऱ्या भागावरून कळून येईल.

ह्या पुस्तकाच्या शेवटच्या भागात मी संस्कृतीच्या उत्पत्तीबद्दलचे माझे ठाम विचार मांडणार आहे. त्यात संस्कृतीमुळे उत्पन्न झालेल्या नवीनच परिस्थितीमुळे मानवाच्या मूळच्या प्राणीसदृश स्वभावात होऊन गेलेल्या बदलांची रूपरेषा दिलेली आहे. विशेषतः मी असे दाखवण्याचा प्रयत्न केलेला आहे की लैंगिकतेची जन्मजात प्रवृत्ती दाबून टाकण्यामुळे कोणता तरी मनोगंड मानवाच्या मनात संस्कृतीचा एक दुय्यम परिणाम म्हणून उत्पन्न झाला असला पाहिजे.

प्रस्तुत पुस्तकातील शेवटचा भाग म्हणजे जन्मजात प्रवृत्ती व संस्कृती हा माझ्या मते सर्वांत जास्त महत्वाचा आहे. पण अर्थातच त्यावर मतभेद होण्याची शक्यताही सर्वांत अधिक आहे. मानववंशशास्त्राच्या दृष्टिकोनातून पाहिले तर हे संशोधन अगदी नवीन व मार्गदर्शक असे आहे. हा प्रयत्न म्हणजे मानव व इतर प्राणी ह्यांच्यामधील तज्ञांना अज्ञात असलेल्या प्रदेशाचे संशोधन आहे. बहुधा माझी विचार-सरणी बऱ्याच अंशी मला बदलावी लागेल यात संशय नाही, पण मला असा विश्वास वाटतो, की तिच्यामुळे फार महत्त्वाचे मुद्दे उपस्थित होतील व ते केव्हा ना केव्हा जीवशास्त्रज्ञ, प्राण्यांच्या मानसशास्त्राचे व संस्कृतीचे अभ्यासक ह्यांना लक्षात घ्यावेच लागतील.

प्राण्यांचे मानसशास्त्र व जीवशास्त्र ह्यांबद्दलची माहिती मी ग्रंथांच्या वाचनानेच मिळवली. मी मुख्यत्वे डार्विन व हॅवेलॉक एलिस ह्यांच्या पुस्तकांचाच उपयोग केला आहे; तसेच प्राध्यापक लॉइड मॉर्गन, हेरिक, व थॉर्नडाइक; डॉ. कीप, डॉ. क्योलर, आणि श्री. पायक्रॉफ्ट; त्याच प्रमाणे वेस्टमार्क, हॉब्हाउस, एस्पिनास इत्यादींच्या समाजशास्त्र विषयक लिखाणाचाही उपयोग केला आहे. मी पुस्तकातील मजकुरात तपशीलवार संदर्भ दिलेले नाहीत आणि येथेच मी वरील सर्व ग्रंथांचे ऋण मान्य करतो. विशेषतः प्रा. लॉइड मॉर्गन ह्यांचा मी अत्यंत ऋणी आहे. त्यांची जन्मजात प्रेरणेबद्दलची कल्पना मला अत्यंत समर्पक अशी वाटते आणि त्यांचे विचार मला फार उपयुक्त वाटतात. मला फार उशीराने कळून आले की **सवय** आणि **जन्मजात** प्रेरणा ( किंवा उपजतबुद्धी ) ह्यांचा मी ज्या अर्थाने उपयोग करतो त्यात व प्रा. लॉइड मॉर्गन ह्यांच्या कल्पनेत फरक आहे. तसेच **उपजतबुद्धीच्या लवचीकपणा**बद्दलही त्यांच्या-माझ्यात मतभेद आहेत. पण हे मतभेद मूलगामी आहेत असे मला वाटत नाही. माझे

असे मत आहे की संस्कृतीमुळे उपजतबुद्धीला एक नवीन दिशा प्राप्त होते आणि ह्या प्रश्नात प्राण्यांच्या मानसशास्त्राच्या अभ्यासकाला मानववंशशास्त्रज्ञांनी केलेल्या संशोधनापासून बराच फायदा करून घेता येईल.

हा ग्रंथ तयार करताना माझे स्नेही श्रीमती ब्रेंडा झेड्. सेलिग्मान् ( ऑक्सफर्ड ), डॉ. आर्. एच्. लोवी व प्रा. क्रोबर ( कॅलिफोर्निया विद्यापीठ ), श्री. फर्थ ( न्यूझीलंड ), डॉ. डब्यू. ए. व्हाइट ( वॉशिंग्टन ), डॉ. एच्. एस्. सलिव्हन् ( बाल्टिमोर ), प्रा. हेरिक् ( शिकागो विद्यापीठ ), डॉ. गीन्सबर्ग ( लंडन स्कूल ऑफ इकॉनॉमिक्स, ) डॉ. जी. व्ही. हॅमिल्टन आणि एस्. ई जेलिफ् ( न्यूयॉर्क ), डॉ. ई. मिलर ( हार्ले स्ट्रीट ), श्री. व श्रीमती जेमे डि अंगूलो ( बर्क्ले, कॅलिफोर्निया ), श्री. सी. के ओग्डेन ( केंब्रिज ), प्रो. रॅडक्लिफ ब्राउन ( केपटाऊन व सिडनी ) व श्री. लॉरेन्स के. फ्रँक ( न्यूयॉर्क शहर ) ह्या सर्वांकडून मला प्रोत्साहन व मदत मिळालेली आहे. ज्या प्रत्यक्ष निरीक्षणावर व दूरच्या प्रदेशातील कामावर प्रस्तुत ग्रंथ आधारलेला आहे त्याचा खर्च श्री. रॉबर्ट मोंड ह्यांच्याकडून मिळाला.

माझे स्नेही व्हिएन्नाचे श्री. पॉल खूनर ह्यांना हे पुस्तक मी अर्पण केले आहे. त्यांनी ह्या व इतरही अनेक विषयांवरील माझ्या अनेक कल्पना सुस्पष्ट करण्यात आपल्या अधिकारी टीकेने मला सहाय्य केले आहे.

मानववंशशास्त्र विभाग,
लंडन स्कूल ऑफ इकॉनॉमिक्स,
युनिव्हर्सिटी ऑफ लंडन.
फेब्रुवारी १९२७.

ब्रा. मा.

दीर्घकालपर्यंत उत्तेजक शक्तींकडे दुर्लक्ष करून फक्त संवेदनांचा विचार केल्यावर आधुनिक मानसशास्त्र आता उपजत बुद्धीने घडणाऱ्या क्रियांची यादी करून त्यांचे वर्णन करण्यात गुंतले आहे. ही थोडी सुधारणा आहे हे खासच. पण जेव्हा हे शास्त्र व्यक्तीच्या व समाजाच्या जीवनातील गुंतागुंतीच्या घडामोडी फक्त नैसर्गिक शक्तींच्या मदतीने समजून घेऊ पाहते तेव्हा त्याने दिलेला अर्थ अस्पष्ट आणि ओढून ताणून आणलेला असल्याचे दिसून येते........ कोणत्याही समाजातील मानसशास्त्रीय मूल-तत्त्वांवर विचार करण्यापूर्वी आपल्याला त्या समाजाची परिस्थिती व तिच्यामुळे घडणाऱ्या मूळ प्रक्रिया व प्रवृत्ती ह्यांचे ज्ञान झाले पाहिजे. हाच समाजाच्या मानस-शास्त्राचा खरा अर्थ आहे. नैसर्गिक मानवी प्रवृत्ती कच्चा माल पुरवते पण चालीरीती यंत्रे आणि रचना ह्यांच्याकडून पुरवल्या जातात...... मानव हा सवयीचा दास आहे, तर्कबुद्धीचा नाही, किंवा उपजत बुद्धीचाही नाही.

मनोविश्लेषण शास्त्रज्ञांकडून लैंगिकतेचा जो विचार होतो तो मोठा उद्‌बोधक आहे. कारण त्यामुळे कृत्रिम रीतीने एखादा प्रश्न सोपा करण्याचे परिणाम अगदी भडक रीतीने दिसून येतात. तसेच सामाजिक परिणामांच्या मागे मानसिक कारणे आहेत असे परिवर्तनही घडते. पुरुष लेखक स्त्रियांच्या मानसशास्त्राबद्दल अशा रीतीने लिहीत सुटतात की जणू काय त्या म्हणजे प्लेटोने मांडलेली सर्व विश्वात सारखीच असणारी वस्तू आहे...... आधुनिक पाश्चिमात्य समाजातील घटनांचे ते अशा रीतीने वर्णन करतात की जणू काय त्या सर्व मानवजातीच्या उत्तेजक प्रेरणा असाव्यात.

जॉन ड्यूई— ह्यूमन नेचर अॅण्ड कॉण्डक्ट
(मानवाचा स्वभाव व वर्तणूक.)

# अनुक्रमणिका

भाग ४

# प्रकरण १ ले

## प्रश्न

मनोविश्लेषण शास्त्र वैद्यकीय व्यवसायातून निघालेले आहे आणि त्याच्या-बद्दलच्या उपपत्त्या मुख्यत्वे मानसशास्त्राशी संबंधित आहेत. तरीही ज्ञानाच्या दुसऱ्या दोन शाखांशी म्हणजे जीवशास्त्र व समाजशास्त्र ह्यांच्याशी त्यांचा निकट संबंध आहे. आपल्याला असेही म्हणता येईल की, ह्या तीन ज्ञानशाखांमधील संबंध मनोविश्लेषण शास्त्राने अधिक दृढ केले आहेत. फ्रॉइडचे मानसशास्त्राबद्दलचे विचार—कलह, उपजत प्रवृत्ती दाबून टाकणे, मनाचा सुप्त भाग, मनोगंडाची घडण—हे मनोविश्लेषण शास्त्राचे सर्वात उत्तम व तपशीलवार विशद केलेले भाग आहेत आणि अर्थातच हे त्या शास्त्राचे योग्य क्षेत्रच आहे. जीवशास्त्रीय तत्त्व—लैंगिकतेचा विचार आणि तिचे उपजत बुद्धीशी नाते, लैंगिक इच्छाशक्ती आणि तिची स्थित्यंतरे—ह्या वरील उपपत्तीचा भाग पुरेसा उत्क्रांत झालेला नाही. त्यात बरेच अंतर्विरोध आहेत; बऱ्याच उणीवा आहेत आणि त्यावर बरीच टीका होते; त्यातली काही खोटी व काही समर्थनीय आहे. ह्या उपपत्तीची जी समाजशास्त्रीय बाजू आहे तिच्यातच आपल्याला जास्त रस आहे आणि तिच्याकडेच आपण अधीक लक्ष दिले पाहिजे. त्यातला आश्चर्यकारक भाग असा की, जरी मनोविश्लेषणशास्त्राला समाजशास्त्र आणि मानववंशशास्त्र ह्यांचा सर्वात अधिक आधार मिळाला असला आणि जरी ईडिपस मनोगंडाच्या मतप्रणालीला समाजशास्त्रीय बाजू असली तरी ह्या बाजूकडे फारच कमी लक्ष दिले गेलेले आहे.

मनोविश्लेषणशास्त्राचे मुख्य तत्त्व म्हणजे मानवी मनावर कौटुंबिक जीवनाच्या होणाऱ्या परिणामाबद्दलची उपपत्ती हेच आहे. कौटुंबिक जीवनात मुलाच्या मनातील तीव्र भावना, ताण आणि झगडे ह्यांचा त्याचे आईबाप व भाऊ बहीण ह्यांच्या संबंधावर परिणाम होऊन त्याच्या मनात काही कायमची भूमिका किंवा कल कसे तयार होतात ह्याविषयी मनोविश्लेषणशास्त्र आपल्याला माहिती देते. ह्या भावना आणि कल काही प्रमाणात पुढे व्यक्तीच्या स्मरणात राहतात व काही अंतर्मनात दडलेले असतात आणि त्यामुळे व्यक्तीच्या आयुष्यात तिचा समाजाशी जो संबंध येतो त्यावर परिणाम होत राहातो. मी येथे **भावना** ( सेंटिमेंट ) हा शब्द श्री. ए. एफ्. शँड ह्यांनी त्याला दिलेल्या विशिष्ट तांत्रिक अर्थाने वापरलेला आहे. त्या शब्दाच्या अर्थात त्यांनी मनोविकार व उपजतबुद्धी ह्यांच्या संबंधात " भावना " ह्या शब्दाला जो व्यापक अर्थ दिला आहे तोच येथे अभिप्रेत आहे.

मनोविश्लेषणाच्या मतप्रणालीचा समाजशास्त्रविषयक संबंध अगदी उघड आहे—फ्रॉइडच्या उपपत्तीचा सर्व खेळ एका विशिष्ट प्रकारच्या समाजव्यवस्थेत खेळला जातो, व ती व्यवस्था म्हणजे बाप, आई व मुले ह्यांपासून बनलेले छोटे कुटुंब. अर्थात् कुटुंब हा विशिष्ट गट,— फ्रॉइडच्या मते सर्वात महत्त्वाची मानसशास्त्रीय घटना— म्हणजे काही विशिष्ट प्रकारच्या सामाजिक प्रक्रियांमुळे बनलेला समूह, मानवाच्या मनावर परिणाम करतो. शिवाय प्रत्येक व्यक्तींच्या मनावर लहानपणी उमटलेला ठसा पुढील आयुष्यात तिच्यावर सामाजिक परिणाम घडवतो. त्यामुळे काही विशिष्ट बंधने स्वीकारण्यास त्याच्या मनाची तयारी होते; आणि परंपरा, कला, विचार आणि धर्म ह्यांविषयी त्याच्या मनाची ग्रहणशक्ती व नवोत्पादक शक्ती ह्या दोहोंची घडण होते.

अशा रीतीने समाजशास्त्राला वाटते की, ह्या प्रश्नाचा केवळ मानसशास्त्रीय दृष्टीतून विचार न करता त्यात आणखी दोन समाजशास्त्रीय मुद्द्यांची भर घातली पाहिजे. कुटुंबाच्या समाजशास्त्रीय घटनेच्या दृष्टीतून विचार करून एक प्रस्तावना जोडली पाहिजे, आणि ह्या गुंतागुंतीच्या प्रश्नाचा समाजावर काय परिणाम होतो त्याबद्दचा उपसंहार जोडला पाहिजे. अर्थात समाजशास्त्रज्ञाला इथे दोन प्रश्न विचारात घ्यावे लागतात.

**पहिला प्रश्न :**

जर कौटुंबिक जीवन मानवाला इतके निर्णायक ठरते तर त्याच्या वैशिष्ट्याचा आणखी खोलात जाऊन विचार करणे आवश्यक आहे. कारण वस्तुस्थिती अशी आहे की, " कुटुंब " हे सर्व मानवी समाजात एकाच प्रकारचे नसते. समाजाच्या विकासाची पातळी व त्या समाजाच्या घटकांच्या संस्कृतीचे वैशिष्ट्य ह्यांनी कुटुंबाची घटना ठरली जाते; एवढेच नव्हे तर एकाच समाजातील निरनिराळ्या थरांत ती वेगळी वेगळी असू शकते. मानववंशशास्त्रज्ञांच्या आजच्या उपपत्तींप्रमाणे कुटुंब प्रचंड प्रमाणावर बदलत गेलेले आहे, प्रथम लैंगिक व आर्थिक समाजवादामध्ये अनिर्बंध असे कुटुंब होते. पुढे त्यातून संघ-कुटुंब बनले व त्याच्या मुळाशी सांघिक विवाह होते; त्यानंतर रक्ताच्या संबंधाच्या व्यक्तींचा " पुनालुआ " विवाह; त्यानंतर एकत्र कुटुंब ( जर्मन भाषेत ग्रोस्फामील्य किंवा ग्रेट फॅमिली ) व कुल ( क्लॅन ) आणि अखेरीस आजचे छोटे कुटुंब की, ज्यात एकपत्नीव्रत व एकपतिव्रत पाळले जाते व बाप कुटुंबप्रमुख असतो. या मानववंशशास्त्राच्या ऐतिहासिक पुनर्रचनेत काही वस्तुस्थिती व काही गृहीत घटना आहेत. पण एवढे मात्र निर्विवाद आहे की आजच्या असंस्कृत समाजाचे प्रत्यक्ष निरीक्षण केले तर कुटुंबाच्या रचनेत अनेक निरनिराळे प्रकार दिसून येतात. हे फरक सत्तेची विभागणी कशी होते ह्यावर अवलंबून असतात. अधिकार जर बापाकडे असेल तर पितृसत्ताक कुटुंबाचे निरनिराळे उपप्रकार संभवतात. तर उलट अधिकार मातेकडे असेल तर मातृप्रमुख कुटुंबाचे निरनिराळे उपप्रकार उद्भवतात. कुळ ठरविण्याच्या

अनेक भिन्नभिन्न पद्धती आहेत : बाप कोण हे माहीत नसल्यामुळे ठरणारी मातृकुलाची पद्धती; किंवा बापाबद्दलचे अज्ञान असूनही पितृकुलाची पद्धती; सत्तेमुळे ठरणारी पितृकुल-पद्धती व आर्थिक कारणांमुळे ठरणारी पितृकुल पद्धती, शिवाय, वसतीमुळे होणारे फरक, घरांचा पुरवठा, अन्नाची उपलब्धता, कामाची वाटणी इत्यादींमुळे मानवी कुटुंबाच्या रचनेत खूप फरक पडतो; तसेच निरनिराळे मानववंश व लोकसमूह ह्यांतही कुटुंबरचना भिन्न असू शकते.

म्हणजे असा प्रश्न उद्भवतो की, कुटुंबाच्या निरनिराळ्या प्रकारांत व्यक्तींमधील कलह, मनोविकार आणि आकर्षणे वेगळी वेगळी असतात, की सर्व मानवी समाजांत ती एकसारखीच असतात ? जर ती बदलत असली, आणि ती बदलतात हे संशयातीत आहे, तर मग छोट्या केंद्रित कुटुंबात ती जशी असतात तशी सर्व मानवी समाजात असणे शक्य नाही. कुटुंबाच्या घडणीप्रमाणे ती बदललीच पाहिजेत. मनोविश्लेषण शास्त्राचे मुख्य काम म्हणजे ह्या बदलाच्या मर्यादा कोणत्या ह्याचा अभ्यास करणे; त्याबद्दलचे सूत्र बनवणे आणि शेवटी कुटुंबाच्या निरनिराळ्या महत्त्वाच्या प्रकारांचा निर्देश करणे व त्यांच्याशी जुळणाऱ्या केंद्रित कुटुंबाच्या मनोगंडांचा अभ्यास करणे.

ह्याला कदाचित एक अपवाद असू शकेल[1] पण हा प्रश्न ह्या स्वरूपात कोणी उपस्थित केलेला नाही, निदान अगदी स्पष्ट व सरळसरळ अशा रीतीने खासच नाही. जो मनोगंड फ्रॉइडच्या विचारसरणीत निरपवाद समजला जातो, आणि जो सर्व प्रकारच्या मानवसमूहांना लागू पडतो असे समजले जाते, म्हणजे ईडिपस मनोगंड, हा खरोखर आपल्या पितृसत्ताक आर्यन कुटुंबाला लागू आहे व त्याला रोमन कायदे व ख्रिस्ती लोकांच्या नीतिविषयक कल्पना ह्यांनी आधार दिलेला आहे. शिवाय सध्याची आर्थिक परिस्थिती व सुस्थितीतील मध्यम वर्ग ह्यांमुळेही ती विशिष्ट कुटुंबरचना परिणामकारक बनलेली आहे. आणि तरीही हा मनोगंड सर्व असंस्कृत व रानटी समाजांत अस्तित्वात आहे असे मानले जाते. हे खचितच बरोबर असणे शक्य नाही; आणि ह्या पहिल्या प्रश्नाचा तपशीलवार विचार केला की ही गृहीत कल्पना किती चूक आहे हे आपल्याला कळून येईल.

## दुसरा प्रश्न :

दंतकथा, पौराणिक गोष्टी, यक्ष-यक्षिणींच्या गोष्टी, काही रानटी व क्रूर अशा चालीरीती, समाजाची घटना आणि उत्पन्न केलेल्या वस्तूंची भौतिक संस्कृती ह्या सर्वांवर कौटुंबिक गंडाचा काय परिणाम होतो ? हा प्रश्न मनोविश्लेषणावर लेखन करणाऱ्या शास्त्रज्ञांनी अगदी उत्तम रीतीने ओळखला होता कारण ते आपली तत्त्वे दंतकथा, धर्म व संस्कृती ह्यांच्या अभ्यासात वापरीत होते. पण कुटुंबाच्या घटनेचा कुटुंबातील मनो-

---

१. टीपा पुस्तकाच्या शेवटी पाहा.

गंडामार्फत संस्कृतीवर व समाजावर काय परिणाम होतो ह्याचे तपशीलवार विवरण केले गेलेले नाही. ह्या दुसऱ्या प्रश्नाबद्दलच्या विचारांची मुळापासून समाजशास्त्राच्या दृष्टिकोणातून उकळणी केली पाहिजे. ह्या प्रश्नाची फ्रॉइड, रँक व जोन्स ह्यांनी दिलेली वस्तुस्थितिदर्शक उत्तरे पुष्कळच स्वीकारणीय आहेत, पण त्यांनी पुढे मांडलेले सर्व-साधारण तत्त्व : "दंतकथा ह्या समाजाचे निधर्मी स्वप्न आहेत" हे मात्र तितकेसे बरोबर नाही.

आदिवासी मानवाचे लक्ष स्वतःवर व आजूबाजूच्या लोकांवर केंद्रित झालेले आहे आणि ते वस्तुस्थितीला धरून आणि गतिमान आहे ह्या मुद्द्यावर मनोविश्लेषण शास्त्राने भर दिला आहे. ह्यामुळे आदिवासी मानवाच्या मनोरचनेला सुयोग्य असा पाया लाभला आहे. पूर्वी ह्याबद्दल चुकीची समजूत प्रचलित होती की, मानवाला सृष्टीबद्दल निःपक्षपाती भावना होती, आणि आपले ध्येय काय ह्याबद्दलच्या तत्त्वज्ञान विषयक विचारात तो गुंतलेला होता. पण पहिला प्रश्न अजिबात टाळल्यामुळे व ईडिपस मनोगंड अस्तित्वात आहे असे गृहीत धरल्यामुळे मनोविश्लेषण शास्त्रांच्या मानववंशशास्त्रीय लिखाणात चुका झाल्या आहेत. उदाहरणार्थ, ईडिपस मनोगंड खरोखर मुख्यत्वे पितृसत्ताक समाजात असतो. तरी तो मातृसत्ताक समाजाला लागू करण्याच्या प्रयत्नामुळे त्याचे निष्कर्ष कधीच बरोबर येत नाहीत. किंवा ते जेव्हा सांघिक विवाह अथवा सार्वत्रिक लिंग-संयोग अशा उपपत्या पुढे मांडतात तेव्हा असे वाटते की, आपल्या स्वतःच्या समाजातील आपल्याला मनोविश्लेषणाने दाखवलेल्या परिस्थितीपेक्षा अगदी भिन्न अशी परिस्थिती असलेल्या समाजाचे निरीक्षण करताना जणू काय काही विशेष काळजी घेण्याचे कारणच नाही, असे त्यांना वाटत असावे. अशा प्रकारच्या अंतर्विरोधात अडकल्यामुळे मानववंशशास्त्रात लुडबूड करणारा मनोविश्लेषणज्ञ एक तात्त्विक उपपत्ती गृहीत धरतो. ही उपपत्ती एखाद्या आदिवासी भटक्या टोळीबद्दल, किंवा कुलचिन्हाला दिलेल्या बळीच्या पूर्वेतिहासाबद्दल, किंवा दंतकथेच्या स्वप्नरूपाबद्दल असते व प्रत्यक्ष मनोविश्लेषणशास्त्राच्या मूलभूत तत्त्वांशीही ती जुळत नाही.

प्रस्तुत ग्रंथाच्या पहिल्या भागात असंस्कृत समाजात केलेल्या प्रत्यक्ष निरी-क्षणाच्या आधारे पहिल्या प्रश्नाचा विचार केला जाईल— कुटुंबाच्या रचनेचा केंद्र-गंडावर होणारा परिणाम. दुसरा प्रश्न दुसऱ्या भागात विचाराकरता राखून ठेवला आहे. त्यानंतरच्या उरलेल्या दोन भागांत ह्याच दोन प्रश्नांच्या जोडीचा सर्वसाधारण विचार केला जाईल.

▲ ▲

## प्रकरण २ रे

# पितृसत्ताक व मातृसत्ताक पद्धतींतले कुटुंब

पहिला प्रश्न, म्हणजे कौटुंबिक गंड एका विशिष्ट समाजातील कुटुंबाच्या रचनेमुळे कसा बनवला जातो व कसा बदलतो, ह्याचा अभ्यास करणे. ह्या अभ्यासाकरता ह्या गोष्टीत प्रत्यक्ष वस्तुस्थिती काय आहे हे पाहणे, प्रातिनिधिक कुटुंबात ह्या गंड कसा बनतो व बदलतो ह्याचे निरीक्षण करणे, आणि निरनिराळ्या संस्कृतींतील ह्या घटनेचा तुलनात्मक विचार करणे जरूर आहे. प्रस्तुत ग्रंथात सर्व प्रकारच्या कुटुंबरचनांचा विचार करण्याचा माझा बेत नाही; तर मला ज्या दोन प्रकारांची प्रत्यक्ष माहिती आहे त्यांचाच, म्हणजे आधुनिक सुधारलेल्या समाजातील पितृसत्ताक कुटुंब व वायव्य मेलानेशियातील काही विशिष्ट बेटांवरील जमातींतील मातृसत्ताक कुटुंब ह्यांचाच फक्त मी विचार करणार आहे. ही दोन प्रकारची कुटुंबे बहुधा समाजशास्त्राला माहीत असलेल्या कुटुंबप्रकारांची दोन टोके आहेत; व त्यामुळे आपले काम सुलभ होईल. ईशान्य न्यू गिनी ( किंवा वायव्य मेलानेशिया ) येथे वास्तव्य करणाऱ्या ट्रोब्रियांड द्वीपवासी लोकांबद्दल येथे काही माहिती सांगणे जरूर आहे; व वर सुचवलेल्या तुलनेमध्ये आपल्या संस्कृतीच्या विरुध्द बाजूचा तो भाग असेल.

हे आदिवासी लोक मातृवंशीय आहेत; म्हणजे ते ज्या समाजात राहातात त्यात वंशावळ फक्त मातेकडून ठरवली जाते आणि अनुक्रम अथवा परंपरा आणि वारसा ह्या स्त्रियांच्याकडूनच एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे जातो. ह्याचा अर्थ असा की, मुलगा किंवा मुलगी आईच्या कुटुंबाचे, कुळाचे किंवा जमातीचे घटक असतात. मुलग्याला आईच्या भावाचे अधिकार व सामाजिक दर्जा मिळतो आणि मुलाला त्याच्या मालकीच्या वस्तू मामाकडून अथवा मावशीकडून मिळतात.

ट्रोब्रियांड जमातीतील प्रत्येक पुरुष अथवा स्त्री केव्हा ना केव्हा विवाह करतात, पण त्यापूर्वी बालवयात ती एकमेकांशी लैंगिक क्रीडा करतात व त्यानंतर कुमारावस्थेत त्यांना पूर्ण लैंगिक स्वातंत्र्य असते; आणि त्याच्याहीनंतर दोन किंवा तीन प्रेमी युगुले कमीअधिक प्रमाणात कायम संबंध जोडून एका " अविवाहित गृहात " ( बॅचलर्स हाउस ) राहतात. वैवाहिक स्थितीत एका पुरुषाला एकच पत्नी व एका स्त्रीला एकच पति असतो, व ती जन्मभर एकत्र राहतात. अपवाद फक्त जमातीच्या प्रमुखाच्या बाबतीत केला जातो व त्याला अनेक बायका असतात. विवाहित जोडपे वेगळ्या घरात राहाते व आर्थिक दृष्टया स्वतंत्र असते. वरवर पाहणाऱ्याला असे वाटेल की, ही पध्दती

आपल्या समाजातील पध्दतींसारखीच आहे, पण प्रत्यक्षात मात्र ती पूर्णपणे वेगळी आहे. प्रथम म्हणजे आईचा नवरा हा मुलांचा बाप ही कल्पना आपण ज्या अर्थाने वापरतो त्या अर्थाने त्यांच्या समाजात वापरली जात नाही. त्या समाजातील लोकांचे शरीर-व्यापारविषयक अज्ञान असल्यामुळे मुलांच्या जन्माचा पुरुषाशी काही संबंध असतो हे त्यांना माहीत नसते. तद्देशीयांच्या मते मातेच्या गर्भाशयात बहुधा कोणत्या तरी मृत स्त्रीपूर्वजाकडून मूल सूक्ष्म जीवाच्या स्वरूपात घातले जाते.[१] नंतर तिच्या नवऱ्याचे काम मुलांचे संरक्षण करणे, ती जन्मतील तेव्हा "त्यांना आपल्या हातांनी स्वीकारणे"; पण त्यांच्या उत्पत्तीत त्याचा वाटा नसल्यामुळे ती "त्याची" मुले समजली जात नाहीत.

अशा प्रकारे बाप म्हणजे एक प्रेमळ व सदिच्छाप्रवृत्त असा स्नेही असतो, पण तो मुलांचा नातेवाईक आहे असे समाजात समजले जात नाही. मुलांशी त्याचे जे वैयक्तिक संबंध असतात त्यांमुळे तो त्यांच्यावर सत्ता गाजवू शकतो; पण त्यांचा जनक ह्या सामाजिक स्थानामुळे नव्हे. खरे नाते म्हणजे "रक्ताचा संबंध" हे फक्त आईच्या मार्फतच प्रस्थापित होते. मुलांवरची खरी सत्ता आईच्या भावाच्या म्हणजे मामाच्या हातातच असते. पण भाऊ-बहिणींमध्ये निकट संबंध आसण्यावर निषेध असल्यामुळे मामाची आईशी आणि म्हणून घरांतील इतर व्यक्तींशीही फारशी जवळीक होऊ शकत नाही. आई त्याची सत्ता मान्य करते व एखादा सामान्य प्रजानन जमातीच्या मुख्यासमोर जसा वाकून अदबीने वागतो तशी ती भावाशी वागते; पण त्यांच्यात भावनात्मक प्रेम असत नाही. तरी पण तिची मुले हे त्याचे वारस व मागून येणारे मालक असतात आणि तो त्यांच्यावर प्रत्यक्ष अधिकार गाजवतो. तो मेल्यानंतर त्याच्या मालकीच्या सर्व वस्तू त्याच्या बहिणीच्या मुलांकडे जातात आणि त्याच्या जिवंतपणी त्याचे जे काही विशेष गुण असतात किंवा विशेष कला असतात, उदाहरणार्थ नाच, गाणी, दंतकथा, जादू किंवा हस्तकौशल्य हे त्याला त्या मुलांना द्यावे लागतात. तसेच बहीण व तिच्या घरातील माणसे ह्यांना अन्नपुरवठा करण्याची जबाबदारी त्याची असते; व त्याच्या बागेमधील उत्पन्नाचा बहुतेक भाग त्याकरता वापरला जातो. अर्थातच बापाकडून मुले फक्त प्रेमळ सहवास व मायाळू काळजी ह्यांचीच अपेक्षा करतात. त्यांच्या आईचा भाऊ हा कुटुंबातील शिस्त, सत्ता आणि अधिकार ह्यांचा प्रतिनिधी असतो.[२]

नवऱ्याशी बायकोची वागणूक एखाद्या दासासारखी आजिबात नसते. तिच्या स्वतःच्या मालकीच्या वस्तू असतात, आणि तिचा प्रभाव पडेल अशी खाजगी व सार्वजनिक क्षेत्रे असतात. आपल्या बापाने आईचा छळ केला असे दृश्य मुलांना कधीही दिसत नाही. उलट बापाने मिळवलेले अन्न त्या कुटुंबात फारच थोड्या प्रमाणात उपलब्ध होते. कारण त्याला मुख्यत्वे आपल्या स्वतःच्या बहिणींकरता काम करावे लागते. कुटुंबात वाढणाऱ्या मुलग्यांनाही ठाऊक असते की, पुढे आपल्याला आपल्या बहिणींच्या घराकरता काम करावे लागणार आहे.

विवाह हा पितृस्थानीय असतो; म्हणजे मुलगी विवाहानंतर नवऱ्याच्या घरी राहावयास जाते. जर ती दुसऱ्या जमातीतली असेल तर त्याच्या जमातीत ती मिसळून जाते. ही परिस्थिती बहुतेक सर्वसाधारण आहे असे म्हणता येईल. ह्याचा परिणाम असा होतो की, मुले ज्या जमातीत वाढतात तेथे कायदेशीर रीत्या ती दुसऱ्या म्हणजे आईच्या मूळच्या जमातीतली असतात. बापाच्या जमातीत त्यांचा जमिनीवर हक्क नसतो व त्या खेड्याबद्दल त्यांना अभिमानही वाटत नाही. त्यांचे खरे घर, त्यांचा पारंपरिक गोष्टींबद्दलचा स्थानिक अभिमान, त्यांच्या मालकीच्या वस्तू आणि आपल्या पूर्वजांबद्दलची निष्ठा ही सर्व दुसऱ्या ठिकाणी असतात. ह्या दुहेरी प्रभावाचा परिणाम होऊन विलक्षण प्रकारचे संयोग आणि घोटाळे उत्पन्न होतात.

अगदी लहान वयापासून एकाच आईचे मुलगे व मुली वेगळ्या केल्या जातात. कारण ह्यांच्यात जवळीक उत्पन्न होण्यावर अतिशय सक्त असा निषेध आहे. विशेषत: लिंगविषयक कोणच्याही गोष्टींत त्यांना एकाच वेळी रस वाटता कामा नये अशी रीत आहे. ह्याचा परिणाम असा होतो की, भाऊ जरी बहिणीवर सत्ता गाजवीत असला तरी वरील निषेधामुळे तिच्या विवाहाच्या वेळी त्याला आपला अधिकार वापरता येत नाही. म्हणजे मुलीच्या विवाहाच्या बाबतीत आई-बापांचीच संमती लागते; व ह्या एकाच गोष्टीत बापाचा म्हणजे आईच्या नवऱ्याचा अधिकार चालतो.

दोन प्रकारच्या कौटुंबिक रचनेत जो फरक आहे आणि ज्याची आपण तुलना करणार आहोत तो आता स्पष्ट होऊ लागला आहे. आपल्या म्हणजे यूरोपीय कुटुंब व्यवस्थेत समाजाकडून मान्यता पावलेला पती व बाप ह्याच्या हाती सत्ता आणि अधिकार केंद्रित झालेले असतात.[3] शिवाय आपल्या समाजातील अर्थव्यवस्था अशी असते की, तोच कुटुंबाचा अन्नदाता असतो आणि निदान तत्त्वत: तरी तो ह्या अन्नाचा पुरवठा कमी करू शकतो किंवा उदार हस्ताने त्यात वाढ करू शकतो. ह्याच्या उलट ट्रोब्रियांड जमातीत आई स्वतंत्र असते. तिचा नवरा तिच्याजवळ राहातो आणि त्याचा मुलांच्या जननाशी काही संबंध नसतो असे ते समजतात. तो अन्नदाता नसतो, त्याला आपली मालमत्ता मुलांना मागे ठेवता येत नाही, आणि सामाजिक दृष्ट्या त्याची मुलांवर काहीएक सत्ता नसते. ह्याच्या उलट आईच्या नातेवाइकांचा मुलांवर पुष्कळ दाब असतो, विशेषत: तिचा भाऊ मुलांवर सत्ता गाजवतो, कुटुंबाला जरुरीच्या वस्तू पुरवतो आणि त्याच्या मृत्यूनंतर बहिणीच्या मुलग्यांना त्याची मालमत्ता मिळते. ह्यावरून हे उघड आहे की, आपली कुटुंबरचना व वर वर्णन केलेली कुटुंबरचना ही दोन्ही अगदी भिन्न आहेत.

सत्कृद्दर्शनी असे वाटते की- मातृसत्ताक पद्धती असलेल्या समाजातील कुटुंब-संस्थेचा अभ्यास करणे बोधप्रद होईल. पण आपल्या समाजातील कुटुंबसंस्थेचे वर्णन करणे अनावश्यक आहे; कारण त्याची सर्वांना माहिती आहे. मानस विश्लेषणाच्या वाङ्मयात त्याचा अनेकदा उल्लेख आलेला आहे, ते आपण गृहीत धरून चालू शकतो.

पण एक तर जेव्हा जेव्हा आपण दोन गोष्टींची तुलना करतो तेव्हा त्या दोन्ही आपल्या डोळ्यासमोर स्पष्टपणे ठेवणे जरूर असते. शिवाय मातृसत्ताक समाजाच्या संबंधी साधनसामग्रीचे संकलन मानव वंशशास्त्र विषयक क्षेत्रातल्या कार्याची विशेष पद्धती लावून केले असल्यामुळे त्याच पद्धती लावून आपल्या यूरोपीय समाजाचे निरीक्षण केले आहे, व त्याच दृष्टिकोणातून त्याच्याकडे पाहिलेले आहे असे समजून त्यासंबंधीची सामग्री तयार करणे अत्यावश्यक आहे. पूर्वी सांगितल्याप्रमाणे मनोविश्लेषण विषयक लिखाणात मला कोठे समाजातील वेगळ्या वेगळ्या पातळींचा उल्लेख आढळलेला नाही. मग केंद्रित कुटुंबातील मनोगंडाबद्दलचा तपशीलवार विचार किंवा समाजातील निरनिराळ्या थरांत तो कसा बदलतो ह्याचे वर्णन कोठे आलेले नाही हे सांगावयास नकोच. पण हे अगदी उघड आहे की, लहान मुलांच्या मनांतील अंतर्विरोध श्रीमंत माणसाच्या घरी, किंवा गरीब शेतकऱ्याच्या झोपडीत किंवा मजुराच्या एका खोलीच्या गाळ्यात एकाच प्रकारचा असणे शक्य नाही. मनोविश्लेषणाच्या तत्त्वांचा खरेपणा पडताळून पाहण्याकरता आपल्याला समाजातील खालच्या व कमी शिकलेल्या पातळीवरच्या कुटुंबांचा विचार केला पाहिजे. ह्या कुटुंबातील मूल कायम आईबापांच्या सान्निध्यात असते, त्यांच्याबरोबर त्याचे खाणे, पिणे, राहाणे होत असते, त्यांच्याच बिछान्यात ते निजते, आईबापांची जागा घेईल अशी कोणतीच व्यक्ती त्या कुटुंबात नसते व त्यामुळे एकंदर चित्रात कोणतीच गुंतागुंत निर्माण होत नाही. सभ्यतेच्या चालीरीतींनी पाशवी आघातात बदल होत नाही आणि लहान लहान गोष्टींतील एकमेकांचा हेवा व स्पर्धा ह्यामुळे जरी मन कठीण बनत असले तरीही थोड्या प्रमाणात ही शत्रुत्वाची भावना दवली जाते.[४]

आणखी येथे असा विचार मनात आणला पाहिजे की जेव्हा आपण छोट्या केंद्रित कुटुंबातील मनोगंडाचा अभ्यास करतो व त्याला पायाभूत असलेल्या सामाजिक व जीवशास्त्रीय प्रत्यक्ष परिस्थितीचे निरीक्षण करतो आणि त्याचे निष्कर्ष लोककथा व समजुती ह्यांना लावण्याचा प्रयत्न करतो, तेव्हा तर अशिक्षित आणि खेडवळ वर्गाकडे दुर्लक्ष करून कधीही चालणार नाही. कारण आजकालच्या चालीरीती मध्य व पूर्व यूरोपमधील शेतकऱ्यांच्यात परिस्थितीसारख्या समाजातच किंवा गरीब हस्तव्यवसाय करणाऱ्या कारागिराच्या कुटुंबात उद्भवलेल्या आहेत. आधुनिक व्हिएन्ना, लंडन किंवा न्यूयॉर्क येथील जादा अन्न खाणाऱ्या मानसिक ताणाने सतावलेल्या कुटुंबांत खासच ह्या चालीरीतींचा उगम झालेला नाही.

तुलना अधिक स्पष्ट करण्याकरता मी बालवयाच्या इतिहासाचे भाग पाडणार आहे, व त्या भागाचा वेगळावेगळा विचार करून दोन्ही प्रकारच्या समाजांतल्या त्या त्या भागांची तुलना करणार आहे. कौटुंबिक जीवनाच्या निरनिराळ्या अवस्था एकमेकांपासून अलग अलग ठेवणे केंद्रित कुटुंबातील मनोगंडाच्या अभ्यासाच्या दृष्टीने महत्त्वाचे आहे; कारण मनोविश्लेषणशास्त्राने मानवी मनाचे निरनिराळे पापुद्रे उलगडलेले आहेत ( व त्यातच त्याची खरी महत्त्वाची कामगिरी आहे ); आणि हे निरनिराळे-

वापुढे लहान मुलांच्या वाढीतील बदलांशी जुळणारे आहेत. लैंगिकतेचे स्पष्ट दिसणारे बदल, व पेचप्रसंग, त्यांच्याबरोबरच येणारे भावना मारून टाकण्याचे किंवा ते विसरून जाण्याचे प्रयत्न, त्यांतले काही गुप्त मनात दडविण्याच्या घटना, ह्या सर्वांमुळे मुलांच्या जीवनाचे निरनिराळे भाग आपोआपच पडतात.[५] सध्या आपल्याला लहान मुलांच्या वाढीचे चार निरनिराळे कालखंड लक्षात घेतले म्हणजे पुरे होईल. हे कालखंड जीवशास्त्र व समाजशास्त्र यांच्या निकषावर ठरवलेले आहेत.

**१. शैशव :** ( इन्फन्सी ) ह्यात बाळाला आईच्या स्तनातून अन्नाचा पुरवठा होत असतो, तर संरक्षणाकरताही त्याला आईबापांवर अगर त्यांच्यापैकी एकावर अवलंबून राहावे लागते. ह्या स्थितीत मुलाला स्वतंत्रपणे हालचाल करता येत नाही, किंवा आपल्या इच्छा व विचार बोलून दाखवता येत नाहीत. हा कालविभाग जन्मापासून आईचे दूध तोडण्यापर्यंत मानता येईल. असंस्कृत किंवा रानटी समाजात हा काळ दोन ते तीन वर्षांपर्यंत टिकतो. सुसंस्कृत समाजात हा बराच कमी म्हणजे सुमारे एक वर्षाइतकाच असतो. पण लहान मुलांच्या जीवनाचे भाग पाडताना नैसर्गिक घटनाच विचारात घेणे योग्य ठरते. ह्या कालखंडात मूल कुटुंबाशी शारीरिक प्रक्रियेने बांधलेले असते.

**२. बाल्यावस्था :** ( बेबीहुड ) ह्या कालात मूल जरी आईवर अवलंबून असते व त्याला स्वतंत्रपणे जीवन जगता येत नाही, तरी ते इकडे तिकडे जाऊ शकते, बोलू शकते व आईच्या भोवती खेळू शकते. हा कालखंड साधारणपणे तीन ते चार वर्षे इतका धरला तर मूल सुमारे सहा वर्षांचे होते. ह्याच कालविभागात कुटुंबाचे पाश थोड्याबहुत प्रमाणात कमी होतात. मूल कुटुंबापासून वेगळे होण्यास शिकते व त्याच्या मनात हळूहळू आत्मसंतुष्टतेची भावना निर्माण होते.

**३. बालपण :** ( चाइल्डहुड ). ह्या कालात तुलनात्मक दृष्टीने मूल पुष्कळच स्वतंत्र होते व इकडे तिकडे भटकणे किंवा इतर मुलांशी खेळणे ह्या गोष्टी ते करू लागते. ह्याच कालात मानवाच्या सर्व शाखांत व समाजाच्या सर्व वर्गांत मूल कोणत्या ना कोणत्या पद्धतीने समाजाचा स्वतंत्र घटक म्हणून त्याला प्रवेश मिळतो. काही रानटी समाजात ह्याच कालात दीक्षा देण्यास विधी करण्यास सुरवात होते. इतरांच्यात व युरोपातील आपल्या शेतकरी व कारागीर यांच्या समाजात मुलाला त्याच्या पुढील आयुष्यातील आर्थिक जीवनाच्या तयारीकरता शिकाऊ उमेदवार म्हणून ठेवण्यात येते. पश्चिम युरोप व अमेरिका येथे ह्याच वयात मुलांच्या शाळेतील शिक्षणाची सुरुवात होते. कुटुंबापासून फारकत होण्याचा हा दुसरा टप्पा असून तो मूल वयात येईपर्यंत टिकतो. ही एक नैसर्गिक मर्यादाच बनते.

**४. कुमारावस्था :** ( अॅडोलेसन्स ). हा कालविभाग म्हणजे शारिरिक दृष्ट्या वयात आल्यापासून समाजाचा पूर्ण व स्वतंत्र घटक बनेपर्यंत टिकतो. पुष्कळशा रानटी जमातींत ह्याच कालात दीक्षा देण्याचे निरनिराळे मुख्य विधी किंवा संस्कार

केले जातात तर इतर काही जमातीत कुमार किंवा कुमारी ह्यांच्यावर जमात आपला हक्क सांगून त्यांना ताब्यात घेतले जाते. आधुनिक सुधारलेल्या समाजात हा काल दुय्यम आणि उच्च शिक्षणाचा असतो किंवा पुढील आयुष्याची अखेरची उमेदवारी करण्याचा काल असतो. ह्या काळात कौटुंबिक वातावरणापासून व्यक्तींची पूर्ण मुक्तता होते. रानटी समाजात व आधुनिक समाजातील खालच्या पातळीवर हा काल विवाह झाल्यानंतर संपतो, व एका नव्या कुटुंबाची सुरुवात होते.



# प्रकरण ३ रे

# कौटुंबिक नाटकाचा पहिला प्रवेश

सस्तन प्राण्यांचे एक वैशिष्ट्य असे आहे की, त्यांची पिल्ले जन्मतःच स्वतंत्र व स्वावलंबी नसतात. त्यांना अन्न, संरक्षण, ऊब, स्वच्छता आणि शरीरस्वास्थ्य ह्यांकरता आपल्या आईवर अवलंबून राहावे लागते. ह्यावरूनच आई आणि मूल ह्यांच्या शरीराची ठेवण किंवा व्यवस्था ठरली जाते. शरीरव्यापारदृष्ट्या आईच्यामध्ये मुलाबद्दल तीव्र भावनात्मक व जन्मजात आकर्षण असते, आणि संततीमध्ये आईच्या अंगावर पिण्याकरता, तिच्या शरीराच्या उबेकरता आणि विशेष म्हणजे तिचे दूध व स्तन ह्यांविषयी विलक्षण ओढ असते. प्रथमतः आईच्या मनातील भावना फक्त तिच्या स्वतःच्या संततीबद्दलच असतात व तीच तिला आवडते; पण मुलाला कोणत्याही दूध देणाऱ्या स्त्रीच्या अंगावर पिण्याने समाधान होऊ शकते. पण लवकरच मुलालाही आई ओळखता येते आणि मग त्याचे आईबद्दलचे आकर्षण आईच्याइतकेच वैयक्तिक व केंद्रित होते. ह्यावरून हे समजून येईल की, जन्म ही घटना माता आणि संतती ह्यांच्यात सर्व आयुष्यभर टिकणारा एक दुवा बनवते.

हा दुवा ज्या वस्तुस्थितीवर आधारलेला असतो ती अशी की, नवीन जन्मलेली सस्तन प्राण्यांची पिल्ले मदतीशिवाय जगू शकत नाहीत व अर्थातच प्राणिजात टिकून राहणे हे एका अति तीव्र अशा जन्मजात प्रेरणेवर म्हणजे मातृप्रेमावर अवलंबून असते. पण सृष्टीच्या ह्या प्रयत्नांना दुजोरा देण्याचे काम समाजही लवकरच थोड्याफार प्रमाणात करू लागतो. सर्व मानवी समाजात, मग ते रानटी असोत, सुसंस्कृत असोत, कायदा, नीती आणि पुष्कळदा धर्मसुद्धा माता व बालक ह्यांच्यातील संबंधांची अगदी मूल गर्भाशयात असल्यापासून दखल घेतात. आईला, आणि पुष्कळदा बापालासुद्धा ह्या काळात पुष्कळदा निरनिराळ्या तऱ्हेचे नियम व निषेध पाळावे लागतात; आणि त्यांचा उद्देश गर्भातील जीवाचे स्वास्थ्य व हित साधावे हाच असतो. नव्या जीवाचा जन्म ही एक मोठी महत्त्वाची घटना समजली जाते व पुष्कळदा तिच्याशी अनेक पारंपरिक व धार्मिक संस्कार निगडित झालेले असतात. ह्या सर्वांचा अर्थ असा की, माता व संतती ह्यांमधील अगदी प्रत्यक्ष असा जीवशास्त्रीय संबंध त्याचा समाजशास्त्रीय आणि शरीरव्यापारशास्त्रीय विचार केल्याखेरीज पूर्णपणे वर्णन करता येत नाही. त्याचप्रमाणे त्या त्या समाजातील परंपरा व चालीरीती ह्यांचाही त्याच संदर्भात विचार करावा लागतो.

प्रथम आपल्या स्वतःच्या समाजात मुलाच्या जन्माशी संबंधित अशा सामाजिक सहनिश्चिती करणाऱ्या गोष्टी विचारात घेऊ. मातृत्व हे समाजाचे नैतिक, धार्मिक आणि कलाविषयकसुद्धा ध्येय आहे; आणि गर्भवती स्त्रीला कायद्याचे व चालीरीतींचे संरक्षण मिळते, एवढेच नव्हे तर ती म्हणजे एक पवित्र वस्तू आहे असे मानले जाते. ती स्वतःही आपल्या स्थितीबद्दल सुखी असून अभिमानाने वागते. हे ध्येय प्रत्यक्षात येते हे ऐतिहासिक व मानववंशशास्त्राच्या पुराव्यावरून सिद्ध होते. आधुनिक यूरोपातसुद्धा पोलंडमधील पुराणमतवादी ज्यू समाजात ह्या सर्व गोष्टी आचरणात आणल्या जातात आणि गर्भवतीबद्दल सर्वजण आदर बाळगतात व तिला आपल्या स्थितीबद्दल अभिमान वाटतो. ख्रिस्ती आर्येन समाजातील खालच्या वर्गात गर्भधारणा हे एक ओझे असून त्रासदायक आहे अशी भावना असते. वरच्या वर्गात गर्भधारणा म्हणजे एक अडचणीत टाकणारी गोष्ट आहे व तीपासून स्त्रीचे स्वास्थ्य नाहीसे होते असे समजतात, व नेहमीच्या सामाजिक जीवनात तिला भाग घेता येत नाही. ज्या अर्थी आपल्या संततीबद्दलचा मातेचा दृष्टिकोण गर्भावस्थेतील तिच्या मनोभूमिकेवर अवलंबून असतो आणि ज्या अर्थी निरनिराळ्या समाजात किंवा एकाच समाजाच्या निरनिराळ्या पातळीवर तो भिन्न असू शकतो त्या अर्थी ह्या सामाजिक प्रश्नाचा आपल्याला जास्त खोलात जाऊन विचार करावयास हवा.

मुलाचा जन्म होताच आईच्या जीवशास्त्रीय आणि उपजतबुद्धीच्या भावनांना समाजाकडून आधार मिळतो एवढेच नव्हे तर त्या अधीक कार्यक्षम होतात. समाजाच्या चालीरीती, नैतिक नियम व ध्येये ह्यांमुळे आई मुलाची दाई बनते आणि सर्वसाधारणपणे असे म्हणता येईल की, युरोपातील समाजाच्या खालच्या व वरच्या अशा दोन्ही पातळींवर हे विधान सत्य असल्याचे दिसते. तरीही इतका मूलभूत आणि जीवशास्त्रदृष्ट्या इतका दृढ संबंध असूनदेखील काही समाज असे आहेत की, तेथे चालीरीती आणि जन्मजात भावनांतील ढिलाई ह्यामुळे लक्षात येतील अशी विचलने दिसतात. उदाहरणार्थ मूल जन्मल्यापासून सुमारे एक वर्षाचे होईपर्यंत त्याला एका दाईकडे (फॉस्टर-मदर) पाठवायची आपल्यात चाल आहे, व ती पूर्वी फ्रान्समधील मध्यम वर्गात खूपच प्रचलित होती; किंवा आईच्या स्तनांचा आकार बिघडू नये म्हणून दूध देणारी स्त्री पगार देऊन नेमणे, किंवा मुलाला वरचे दूध किंवा कृत्रिम अन्न देणे (ही चाल श्रीमंत लोकांच्यात बऱ्याच प्रमाणात होती)—वगैरे. आता ह्या सर्व पद्धती अनैसर्गिक म्हणून समजल्या जातात. ह्या संबंधातही समाजशास्त्रज्ञाला आपला वाटा उचलावा लागतो व मातृत्वाचे खरे चित्र निरनिराळ्या राष्ट्रांत, आर्थिक व नैतिक दृष्ट्या कसे बदलते ते स्पष्ट करावे लागते.

आता आपण माता आणि संतती ह्यांचे हेच नाते पॅसिफिक महासागराच्या किनाऱ्यारील मातृसत्ताक समाजात कशा प्रकारचे असते ते पाहू. मेलानेशियन स्त्री आपल्या मुलाबद्दल अति उत्कट अशी प्रेमाची भावना मनात बाळगते, आणि तिच्या

भोवतालचा समाज ह्या भावनेला दुजोरा देतो, तिच्या मनाच्या कलाला उत्तेजन देतो आणि चालीरीती व वहिवाट ह्यांनी त्याला प्रोत्साहनच मिळते. गर्भधारणा झाल्या क्षणापासून भावी मातेला आपल्या पोटातील अर्भकाच्या स्वास्थ्याकडे लक्ष द्यावे लागते, आणि विशिष्ट प्रकारचे अन्न टाळणे इत्यादी नियम पाळावे लागतात. गर्भवती स्त्री ही एक सन्मागनीय व्यक्ती आहे असे हा समाज समजतो; आणि तद्देशीय लोकांची वागणूक व विचार ह्या समजुतीला अनुसरूनच असतात. पहिल्या गर्भारपणाच्या वेळी एक महत्त्वाचा समारंभ केला जातो. त्याचा उद्देश बराच गुंतागुंतीचा आणि समजायला कठीण असतो. पण एवढे मात्र अगदी स्पष्ट दिसते की गर्भ राहणे ह्या घटनेचे महत्त्व सर्वजण ओळखतात आणि गर्भवतीचा सन्मान करून तिचे वैशिष्ट्य मानतात.

मुलाच्या जन्मानंतर आई आणि बाळ ही सुमारे एक महिनाभर बाजूला म्हणजे वेगळी राहतात. त्या वेळी आई मुलाची एकसारखी काळजी घेते, त्याला दूध पाजते व त्या झोपडीत फक्त काही स्त्री नातेवाईकांनाच प्रवेश दिला जातो. मुलांना दत्तक देण्याची चाल जवळजवळ नाहीच म्हटले तरी चालेल. आणि जरी एखादे वेळी मूल दत्तक दिले तरी ते आईच्या अंगावर पिण्याचे बंद झाल्यानंतर व तेही अगदी जवळच्या नात्यातल्या व्यक्तींनाच दिले जाते. अगदी अनोळखी व्यक्तींना मूल दत्तक देत नाहीत. बाळंतपणात व त्यानंतर करावयाचे बरेच संस्कार असतात. आई व मूल ह्यांना विधियुक्त स्नान घालणे, आईने काही विशिष्ट निषेध पाळणे आणि नात्यातल्या माणसांनी भेटी देणे इत्यादी चालीरीतींमुळे आई व मूल ह्यांमधील नैसर्गिक संबंध आणखीच दृढ होतात.[1]

अशा रीतीने दोन्ही प्रकारच्या समाजात शारीरशास्त्रीय संबंधांच्या जोडीला चालीरीती, नीतिनियम व वागण्याच्या पद्धती ही सर्व आई आणि मूल ह्यांना एकत्र आणतात आणि त्या दोहोंच्यामधील उत्कट प्रेमाच्या भावनेची जोपासना करतात. सामाजिक आणि जीवशास्त्रीय अशा दोन्ही शक्तींचा हा मिलाफ माता आणि संतती ह्या दोघांनाही पूर्ण समाधान व सुख देणारा ठरतो. गर्भातील सुखदायक परिस्थिती, जी मुलाच्या जन्मानंतर एकदम निराळी होते ती काही प्रमाणात परत आणण्यात समाज सहकार्य करतो. डॉ. रँक ह्यांच्या एका ग्रंथात त्यांनी गर्भावस्थेतील वास्तव्य व त्या वेळच्या घटनांचे स्मरण ह्यांचा उल्लेख केलेला आहे व त्याचे मनोविश्लेषणाच्या दृष्टीने फार महत्त्व आहे[2]. जन्माच्या वेळी मनाला बसलेल्या प्रचंड धक्क्याबद्दल आपल्याला काहीही वाटले तरी जन्मानंतरच्या काही महिन्यांतील होणारे व सामाजिक व शारीरिक शक्तींनी वाढवलेले विलक्षण सुख मुलाला आईच्या अंगावरून तोडल्याच्या वेळी त्याला जो एकदम प्रचंड आघात होतो त्याने नाहीसे केले जाते. ह्या परिस्थितीमुळे होणारी अपवादात्मक मानसिक विचलने फक्त सुधारलेल्या समाजांतील वरच्या थरांतच आढळतात.

ह्या कालखंडात पितृसत्ताक व मातृसत्ताक समाजांमध्ये पितृत्वामध्ये बराच फरक

दिसून येतो, आणि अनपेक्षित रीत्या आपल्या समाजापेक्षाही बापाचे व मुलांचे नाते अधिक जवळचे असल्याचे दिसून येते. येथे हेही लक्षात ठेवले पाहिजे की, बापाचा मुलाशी काही शारीरिक संबंध आहे ही गोष्ट असंस्कृत म्हणजे रानटी समाजातील लोकांना ठाऊक नसते, आणि समाज मातृसत्ताक असतो. कारण आपल्या समाजात अगदी लहान मुलाच्या जीवनात बापाचा वाटा अगदीच सूक्ष्म असतो. चालीरीती, परंपरा व वागण्याच्या सर्वमान्य पद्धती ह्यांनी सुस्थितीतील पित्याला लहान मुलांच्या खोलीपासून दूर ठेवले जाते व शेतकरी किंवा कारागीर ह्यांना दिवसाचा जवळ जवळ सर्व भाग मूल आईजवळच ठेवावे लागते. कदाचित आपली बायको मुलाकडे जास्त लक्ष देते व त्यात तिचा वेळ जातो ह्या गोष्टीचे त्याला वैषम्य वाटत असेल; पण तो तान्ह्या मुलाची काळजी घेण्यातही वेळ घालवीत नाही किंवा आई आणि मूल ह्यांच्या भानगडीतही पडत नाही.

मेलानेशियन समाजात पूर्वी सांगितल्याप्रमाणे “पितृत्व” हे संपूर्णपणे सामाजिक नाते असते. ह्या नात्याचा एक भाग म्हणजे आपल्या पत्नीच्या मुलांबद्दलची त्याची कर्तव्ये. तो “त्यांना आपल्या बाहूंमध्ये स्वीकारण्याकरता” तेथे असतो. ह्या शब्दरचनेचा मागेही एकदा उल्लेख आलेला आहे. जेव्हा जमात एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी जाते तेव्हा मुलांची आई थकली तर पिता मुलांना उचलून घेतो, त्याचप्रमाणे घरात मुलांची काळजी घेण्यातही त्याला आईला मदत करावी लागते. तो त्यांच्या नैसर्गिक गरजा पुऱ्या करतो, त्यांना स्वच्छ ठेवतो आणि त्यांच्या भाषेत पितृत्व व त्याने होणारे कष्ट, त्याचप्रमाणे मुलांची बापाविषयीची कर्तव्ये ह्याबद्दलचे पुष्कळच वाक्प्रचार प्रचलित आहेत. ट्रोब्रियांड जमातीतील एका प्रातिनिधिक पित्याबद्दलचा आपण विचार केला तर तो कष्टाळू व अंगमेहेनत करणाऱ्या दाईप्रमाणे वाटतो आणि हे आपले कर्तव्य करण्यात तो त्या समाजातील चालीरीतींचे व परंपरेचेच अनुकरण करीत असतो. अर्थात वस्तुस्थिती अशी आहे की बापाला मुलांबद्दल नेहेमीच कुतूहल वाटत असते. कधीकधी त्याच्या भावना अतिशय उत्कट असतात आणि तो आपली कर्तव्ये हौसेने व प्रेमाने करीत असतो.

अशा रीतीने पितृसत्ताक व मातृसत्ताक समाजांची ह्या प्राथमिक अवस्थेत आपण तुलना केली तर मुख्य फरक बापाच्या बाबतीत दिसून येतो. आपल्या समाजात बापाला एकंदर थोडे दूरच ठेवले जाते व त्याची भूमिका किती म्हटले तरी दुय्यमच असते. ट्रोब्रियांड जमातीत तो अधिक कार्यक्षम भूमिका बजावतो व तिला फार महत्त्व असते; कारण तीमुळे त्याच्यात व मुलांच्यात अधिक निकटचे संबंध प्रस्थापित होतात. दोन्ही प्रकारच्या समाजांत काही अपवाद सोडले तर शरीरशास्त्रीय कल व सामाजिक परिस्थिती ह्यांत झगडा होण्यास फारशी जागा राहात नाही.

## प्रकरण ४ थे

# मातृसत्ताक समाजातील पितृत्व

मूल आईच्या अंगावरून तोडल्यावर त्याच्या चालू-बोलू लागलेल्या अवस्थेपर्यंत आपण आता पोचलो आहो. तरी पण जीवशास्त्रदृष्ट्या ते मातेच्या शरीरापासून अगदी सावकाश वेगळे होत असते. ते तिला बिलगते व तिच्या शरीराचा स्पर्श व तिच्या बाहूंची नाजुक मिठी यांचा त्याला मोठा हव्यास असतो.

अर्थातच ह्या भावना अगदी नैसर्गिक व जीवशास्त्रास अनुसरूनच आहेत. पण आपल्या समाजात कोणत्या तरी अवस्थेत मुलाच्या इच्छा दाबण्यात येऊन त्यांना विरोध केला जातो. प्रथम आपण हे लक्षात घेतले पाहिजे की, ज्या कालखंडाबद्दल आपण विचार करीत आहो त्यात सुरवातीलाच आईच्या अंगावरील दूध मुलाला देण्याचे बंद करण्यात येते. ह्यामुळे अर्थातच शैशवावस्थेतील एक सुखकारक सुसंवाद नाहीसा होतो. उच्च वर्गात मुलाला अंगावरचे दूध बंद करण्याची क्रिया इतकी सावकाश होते व तिची आधीपासून हलके हलके तयारी केली जाते की, त्यामुळे मनाला धक्का बसत नाही. पण आपल्या समाजातील खालच्या वर्गातील स्त्रिया आणि मुले ह्या दोघांनाही अंगावरील दूध देणे बंद केल्यामुळे पुष्कळच मनःस्ताप होतो. पुढे पुढे आई आणि मूल ह्यांच्या निकट संबंधात इतरही अडथळे येतात व त्याच वेळी मुलामध्ये बरेच निरनिराळे शारीरिक बदल घडून येत असतात. ते स्वतंत्रपणे इकडे तिकडे जाऊ शकते, स्वतः अन्नाचे सेवन करू शकते, त्याच्या मनातील काही कल्पना व विचार बोलून दाखवते आणि भोवतालच्या जगाचे निरीक्षण करून त्याबद्दलच्या समजुती बनवू लागते. आपल्या समाजातील वरच्या वर्गात लहान मुलाला वेगळी खोली मिळते व हळूहळू ते आईपासून दूर जाते. त्यामुळे मानसिक धक्का बसण्याचे टाळले जाते. पण तरीही मुलाच्या जीवनात एक पोकळी राहते आणि एक प्रकारची अतृप्त उत्कंठा व गरज राहते. खालच्या वर्गात मूल बहुधा आईबापांच्या बिछान्यातच निजते व कित्येकदा आईबापांना त्यामुळे अडचणीत पडल्यासारखे होते. मग त्याला जेव्हा वेगळे निजवले जाते तेव्हा त्याला एकदम जोराचा मानसिक धक्का बसतो.

न्यू गिनीमधील पोवळ्याच्या बेटावरील समाजातील मातृत्व आपल्या समाजातील मातृत्वाशी ह्या कालखंडात ताडून पाहिले तर काय आढळते? एक तर आईच्या अंगावरील दूध तोडण्याचा काल खूपच उशीरा असतो व त्या वेळी मूल बऱ्याच बाबतीत स्वतंत्र होऊन इकडेतिकडे चालू लागलेले असते, बहुतेक सर्व पदार्थ खाऊ

लागलेले असते व त्याला इतर गोष्टीत स्वारस्य वाटू लागलेले असते. म्हणजे अंगावरचे पिणे बंद करण्याच्या वेळी मुलाला आईच्या स्तनांची गरजही नसते किंवा त्याला अंगावरचे दूध फारसे नकोही असते. अर्थातच अंगावर पाजणे बंद केल्यामुळे मुलाच्या मनाला धक्का बसत नाही.

मातृसत्ताक कुटुंबपध्दती, मातेचा अधिकार म्हणजे काही आई राक्षस होते, असे नाही. ट्रोब्रियांड जमातीतील आई आपल्या मुलांना उचलून घेते, त्याचे लाड करते आणि ह्या वयात देखील पूर्वीप्रमाणेच त्याच्याशी प्रेमाने खेळते. त्या समाजातील चालीरीती व नियम ह्यांना हे सर्व उघडउघड मान्य असते. त्याचप्रमाणे कायदा, परंपरा व व प्रत्यक्ष व्यवहार ह्यांनी आईचे मुलाशी नाते आपल्या नवऱ्याशी असलेल्या नात्यापेक्षा अधिक निकटचे असते. नवऱ्याचे हक्क मुलाच्या हक्कांच्या मानाने दुय्यम समजले जातात. विवाहातील निकटच्या संबंधांचे वैशिष्ट्य ह्या समाजात आपल्यापेक्षा अगदी निराळे असते आणि बापाकडून आईबद्दल मुलाच्या मनात विरोधी भावना उत्पन्न होणे ही घटना जवळजवळ क्वचीच पहाण्यास येत नाही.

मेलानेशियम व यूरोपियन आई ह्यांच्यातला आणखीही एक फरक म्हणजे मेलानेशियन आई मुलाचे जास्त लाड करते. मुलाला ह्या कालखंडात जवळजवळ कोणत्याच प्रकारचे शिक्षण दिले जात नाही; मग नीतिशिक्षणाचा प्रश्नच उद्भवत नाही. जे काय थोडेसे शिक्षण दिले जाते ते नंतरच्या कालात व तेही इतरांकडून; अर्थातच आई-बापांनी मुलाला जरब बसवण्याचा प्रसंग येत नाही. आईकडून मुलाला शिस्त लावण्याची वेळच येत नसल्यामुळे आपल्या समाजात ज्या प्रकारची कडकपणाची विचलने (ॲबेरेशन्स) कधी कधी आढळतात ती त्यांच्यात नसतात. पण दुसऱ्या बाजूला मुलाच्या मनात आईबद्दल विशेष कुतूहल नसते व तिला खूष करून तिच्याकडून शाबासकी मिळवावी अशीही त्याला इच्छा होत नाही. आपल्या समाजात मुलाच्या मनातली ही इच्छा हे आईशी मुलाचे निकट नाते उत्पन्न करते आणि पुढील आयुष्यात त्या दोघांत कायमचे संबंध उत्पन्न होण्याची त्यामुळे बरीच शक्यता असते. आता पित्याच्या नात्याबद्दल विचार करताना आपल्या लक्षात येईल की, आपल्या समाजात राष्ट्रीयत्व किंवा समाजातील वर्ग ह्यांच्यामुळे बापाच्या अधिकारात व सत्तास्थानात फरक पडत नाही.[१] तो कुटुंबप्रमुख असतो, त्याच्यामधून वंशसंबंध ठरला जातो व तोच कुटुंबाचा अन्नदाता असतो. तो कुटुंबावर पूर्ण सत्ता गाजवीत असल्यामुळे पुष्कळदा तो जुलमी असण्याची शक्यता उत्पन्न होते व मग त्याच्यात आणि त्याची बायको व मुले ह्यांच्यात मतभेदाचे व कलहाचे प्रसंग उत्पन्न होऊ शकतात. अर्थात ह्यांचा तपशील सामाजिक पातळीवर अवलंबून असतो. युरोपियन समाजातील श्रीमंत वर्गात मुले निराळ्या खोलीत (नर्सरी) असल्यामुळे बऱ्याच प्रमाणात बापापासून वेगळी ठेवली जातात. जरी त्यांच्यावर दाईची देखरेख असली तरी सर्वसाधारणपणे मुलांची आई त्यांची काळजी घेते व त्यांच्याकडे लक्ष पुरवते. अर्थातच लहान मुलांचे आईवर अधीक प्रेम असते. ह्याच्या

उलट मुलाचा पित्याशी फारच क्वचितच संबंध येतो व तोसुद्धा अगदी औपचारिक असा असतो आणि पिता फक्त किंचित अनोळखी अशा प्रेक्षकाची भूमिका बजावतो. त्याच्या समोर मुलांनी त्याचा मान ठेऊन वागावयाचे असते आणि आपण काय शिकलो त्याचे प्रदर्शन करावे अशी अपेक्षा असते. पित्याच्या ठिकाणी सत्ता केंद्रित झालेली असते व तो शिक्षा करू शकतो. अर्थातच तो एक प्रकारचा बागुलबोवा बनतो. बहुधा प्रत्यक्षात ह्या सर्व गोष्टींचे मिश्रण पाहावयास मिळते. तो म्हणजे सर्वगुणसंपन्न समजला जातो व घरातील सर्व गोष्टी त्याच्याकरताच केल्या जातात. पण त्याच वेळी तो एक राक्षस असून त्याला मुले भितात आणि त्यांना लवकरच कळून येते की घर व घरातील सर्व व्यवस्था त्याच्या स्वास्थ्याकरता करावयाची असते. प्रेमळ व सहानुभूती दाखवणारा पिता सहज एखाद्या उपदेवतेची पूर्वीची भूमिका करू शकतो. त्याच्या उलट जो पिता स्वतःच्याच मोठेपणात गुंतलेला असतो व वागणुकीत ताठर आणि व्यवहारचातुर्यहीन असतो त्याचा मुलांना लवकरच संशय येतो व ती त्याचा द्वेष करू लागतात. बापाच्या बाबतीत आईचा संबंध कधी मध्यस्थासारखा असतो व ती वरच्या कोर्टात जाऊन मुलांना शिक्षा करून घेऊ शकते तर कधी त्यांची बाजू घेऊन बापाकडून होणारी शिक्षा टाळू शकते.

मध्य यूरोपच्या व पूर्व यूरोपच्या एका खोलीच्या व एकच बिछाना असलेल्या घरातील चित्र जरी ह्याहून वेगळे असले तरी अंतिम परिणाम सारखाच होतो. इतर ठिकाणच्या खालच्या म्हणजे कामकरी वर्गांचीही स्थिती वरीलप्रमाणेच असते. बापाचा व मुलांचा संबंध अधिक निकटचा असतो हे खरे, व क्वचित त्यांच्यातील प्रेम अधिक असू शकते. पण सर्वसाधारणपणे त्यांच्यातील संबंध तणातणीचे व मतभेदांचेच असतात. जेव्हा बाप कामावरून दमून घरी येतो किंवा वाटेतील गुत्त्यात दारू पिऊन जरासा झिंगून परततो तेव्हा तो आपला चिडखोरपणा कुटुंबावर म्हणजे बायका-मुलांवर संतापून उगवतो. बापाच्या क्रूरपणाची उदाहरणे सापडणार नाहीत असे एकही खेडे किंवा शहरातील गरीब वस्तीचा भाग नसेल. माझ्या स्वतःच्या आठवणीत मी अशी किती तरी उदाहरणे दाखवू शकेन की, शेतकरी बाप सायंकाळी कामावरून दारू पिऊन आल्यावर केवळ मजेखातर मुलांना चोप देत असे अगर त्यांना बिछान्यातून उठवून बाहेरील गारठ्यात घरातून वालवून देत असे.

अगदी कमींत कमी म्हणजे बाप कामावरून घरी आल्यावर मुलांनी आरडा-ओरडा न करता आपले धांगडधिंग्याचे खेळ बंद करून चुपचाप बसावयाचे असे, व मुलांना साहजिक असे आनंदाचे किंवा दुःखाचे उमाळे दाबून ठेवावे लागत. गरीब कुटुंबातसुद्धा बाप हाच मुलांना शिक्षा करणारा वरचा अधिकारी असतो व आई मुलांचा कैवार घेते, व कधी कधी तिलाही मुलांना मिळणाऱ्या शिक्षेत सहभागी व्हावे लागते. शिवाय गरीब कुटुंबात अन्नदाता म्हणून बापाचा आर्थिक आणि सामाजिक दर्जा जास्त स्पष्टपणे ओळखला जातो आणि त्यामुळे त्याचे वैयक्तिक महत्त्व वाढते.

ह्या कालखंडात मेलानेशियन बापाची भूमिका यूरोपातील कुटुंबांतील बापाच्या श्रेष्ठ स्थानाहून अगदी वेगळी असते. चौथ्या ( म्हणजे प्रस्तुत ) प्रकरणात पिता आणि पती ह्या दोन्ही दृष्टींनी त्याचा दर्जा किती वेगळा आहे हे मी स्पष्ट केलेच आहे. घरात तो कोणती भूमिका करतो त्याचेही वर्णन केले आहे. तो कुटुंब प्रमुख नसतो, मुले त्याच्या वंशाची आहेत असे समजले जात नाही, व तो कुटुंबाचा अन्नदाताही नसतो. ह्यामुळे अर्थातच त्याचे कायदेशीर हक्क व त्याचे आपल्या पत्नीशी संबंध अगदी वेगळे असतात. ट्रोब्रियांड पुरुष जवळजवळ कधीच आपल्या बायकोशी भांडत नाही, तिला छळीत नाही आणि कधीही तिच्यावर जुलमी सत्ता गाजवू शकत नाही. लैंगिक संभोगसुद्धा तद्देशीय कायद्याप्रमाणे व परंपरेने आपल्या समाजाप्रमाणे नवऱ्याचा हक्क किंवा बायकोचे कर्तव्य असे त्यांच्यात समजले जात नाही. ट्रोब्रियांड जमातीतील लोकांची परंपरेने बनलेली अशी समजूत आहे की, स्त्री लैंगिक संयोगाने पुरुषावर मेहेरबानी करीत असते व त्याने त्याबद्दल तिचे आभारी असले पाहिजे; व त्याचा मोबदला म्हणून त्याकरता परिश्रम केले पाहिजेत. मोबदला देण्याचा एक खरोखर मुख्य मार्ग म्हणजे तिच्या मुलांचे संगोपन करणे व त्यांच्यावर प्रेम करणे. त्यांच्यात अशा बऱ्याच म्हणी व लोककथा आहेत की, त्यांच्यात वरील प्रकारचे विचार व्यक्त होतात. मूल अगदी लहान असताना आईचा नवरा त्याची काळजी घेतो व त्याच्याशी प्रेमळपणे वागून त्याच्यावर माया करतो. थोडे मोठे झालेल्या मुलाला तो उचलून घेऊन इकडे तिकडे फिरवतो आणि त्याला तऱ्हेतऱ्हेचे खेळ शिकवून त्याचे मनोरंजन करतो.

अशा प्रकारे ह्या जमातीची नीतिविषय व चालीरीतींचा परंपरा आणि समाज-रचनेच्या सर्व शक्ती एकवटून पुरुषाला त्याच्या वैवाहिक आणि पित्याच्या भूमिकेत अगदी निराळीच दिशा देतात. कुटुंबप्रमुख ह्या आपल्या समाजातील स्थानाहून ती अगदी वेगळी असते. आणि जरी ह्या घटनेचे वर्णन अगदी ढोबळ व सर्वसाधारण शब्दात केलेले असले तरी ती घटना म्हणजे एक कायद्यातील तत्त्व आहे व जीवनाशी त्याचा संबंध नाही असे मात्र नाही. दैनंदिन जीवनाच्या प्रत्येक तपशिलात ते अनुभवले जाते; कुटुंबातील सर्व व्यक्तींच्या एकमेकांशी असलेल्या संबंधात दिसून येते आणि त्या व्यक्तींच्या भावनांवर त्याचा पगडा असतो. मुलांना कधीही बापाने आईला वाईट वागवले किंवा तिच्यावर जुलूम केला किंवा ती नवऱ्यावर सर्वस्वी अवलंबून आहे असे चित्र दिसत नाही. जमातीच्या मुख्याच्या बायकांबद्दलही हे विधान सत्य आहे. त्याचा हात त्यांच्यावर कधी उगारला जात नाही; तो मुळी त्यांचा नातेवाईकच समजला जात नाही. मग त्यांचा मालक किंवा उपकारकर्ता समजणे तर दूरच राहिले. त्याला कोणतेच हक्क अथवा अधिकार नसतात. पण तरीही सर्व जगांतील पित्यांप्रमाणेच त्याला आपल्या मुलांबद्दल प्रेम वाटते. ह्यामुळे व त्याच्या पारंपरिक कर्तव्यांमुळे त्याला त्यांच्याकडूनही प्रेम हवे असते व त्यातून तो त्यांच्यावर आपली छाप पाडण्याचा प्रयत्न करीत असतो.

मेलानेशीय व यूरोपीय पितृत्वाची तुलना करताना दोन महत्त्वाच्या गोष्टी लक्षात ठेवल्या पाहिजेत; आणि त्या म्हणजे ह्या दोहोतील जीवशास्त्रीय व समाजशास्त्रीय भेद. जीवशास्त्रीय दृष्ट्या प्रत्येक माणसाला आपल्या मुलांबद्दल प्रेम आणि माया वाटते पण मुलांच्या आगमनामुळे व अस्तित्वामुळे जे कष्ट करावे लागतात त्यापेक्षा हे प्रेम आणि माया नेहमीच वरचढ ठरतील असे मात्र नाही. जेव्हा समाज ह्या नात्यात पडतो, बाप हा मुलांचा संपूर्णपणे धनी आहे असे सांगतो व मुले ही त्याच्या फायद्याकरता, त्याचे भले व्हावे ह्याकरता, त्याच्या सुखाकरता किंवा त्याची कीर्ती पसरावी ह्याकरता आहेत असे ठरवतो, त्या वेळी मात्र पिता व मुले ह्यांच्यातील नैसर्गिक प्रेमाचा समतोल बिघडतो व त्याची जागा तिरसटपणा किंवा उतावीळपणा ह्यांनी घेतली जाते. ह्याच्या उलट मातृसत्ताक समाज पित्याला कोणतीच विशेष सत्ता देत नसल्यामुळे व त्याला आपल्या मुलांच्या प्रेमावर हक्क सांगता येत नसल्यामुळे त्याला ते प्रेम मिळवावे लागते. तसेच त्या असंस्कृत समाजात त्याच्या मनावर विशेष ताण पडत नसल्यामुळे व त्याची महत्त्वाकांक्षा आणि आर्थिक जबाबदाऱ्या फार मोठ्या नसल्यामुळे त्याला बाप ह्या नात्याने जे नैसर्गिक प्रेम मुलांबद्दल वाटते त्याला पूर्ण वाव देता येतो. आपल्या समाजात मूल अगदी लहान असताना जीवशास्त्रीय व समाजशास्त्रीय शक्तींचा सुंदर मिलाफ दिसतो, पण त्यात पुढे बदल होऊन तणाव उत्पन्न होऊ लागतो. मेलानेशियन समाजात पिता आणि संतती ह्यांच्यातील प्रेमाचे संबंध टिकून राहतात.

आपण पाहिले आहे की बापाचे हक्क कुटुंबात कलह उत्पन्न करतात. कारण समाज बापाला जी सत्ता देतो ती त्याच्या जीवशास्त्रीय नैसर्गिक कलाच्या मानाने अधिक असते व शिवाय त्याला मुलांबद्दल वाटणाऱ्या किंवा मुलांना त्याच्याबद्दल वाटणाऱ्या प्रेमाच्या मानानेही ती जास्त असते.



## प्रकरण ५ वे

# बाल्यावस्थेतील लैंगिकता

फ्रॉइड व मनोविश्लेषणज्ञ ह्यांनी आधीच पुढे मांडलेल्या विचारांप्रमाणेच मी मागील प्रकरणांतून जरी विचार मांडलेले असले तरी माझ्या विषयाचा सामाजिकदृष्टया विचार करण्याकरता मी मुद्दाम लैंगिक बाजू टाळली होती. त्यात थोडीशी अशी कल्पना होती की, आई व मूल ह्यांच्यातील संबंधांत तात्त्विक फरक किंवा लैंगिक आकर्षण ही येऊ नयेत. पण आता ह्या कालखंडात मुले बरीच स्वतंत्र होऊन स्वतंत्रपणे खेळू-हिंडू लागली आणि आजूबाजूचे लोक आणि त्यांचे काम ह्यात लक्ष घालू लागली म्हणजे बाह्य निरीक्षकांच्या लक्षात येतील अशी लैंगिकतेची चिन्हे समाजाचा अभ्यास करणाऱ्या शास्त्रज्ञाला दिसू लागतात.[1] यूरोपातील मुलांचे काळजीपूर्वक निरीक्षण करणाऱ्याला व स्वतःचे बालपण न विसरलेल्या शास्त्रज्ञाला हे मान्य केलेच पाहिजे की, एका विशिष्ट वयात— साधारणपणे मूल तीन ते चार वर्षांचे असताना— त्याच्या मनात एक विशेष कुतूहल व जिज्ञासा उत्पन्न होते. कायदेशीर, सर्वसामान्य व छान अशा गोष्टींबरोबरच काही लाजिरवाण्या इच्छा, गुप्त कुतूहल, आणि गुप्त किंवा पृष्ठभागाच्या आत दडलेल्या प्रेरणाही उत्पन्न होतात. "सभ्य आणि असभ्य", "श्लील आणि अश्लील", "शुद्ध आणि अशुद्ध" ह्या कल्पना हळूहळू स्पष्ट होऊ लागतात व त्या जन्मभर मनात टिकतात. काही लोकांच्यात "अश्लील" हे पूर्णपणे दडपले जाते आणि श्लील मूल्यांचे खरे स्वरूप बदलून त्यांना कर्मठपणाच्या प्रखर सद्गुणाचे किंवा त्याहीपेक्षा किसळवाण्या ढोंगी, सर्वसामान्य नीतिमत्तेचे स्वरूप येते. किंवा जे खरोखर श्लील व सभ्य असते ते अजीबात मारून टाकले जाते व त्याची जागा बीभत्स समाधानाने घेतली जाते. ह्या दुसऱ्या प्रकारात मनाची लैंगिकता अतिशय वाढते व ढोंगी "सद्गुणां"इतकीच तीही किळसवाणी वाटते.

ज्या बालवयाबद्दल मी प्रस्तुत विचार करीत आहे, म्हणजे माझ्या हिशेबाप्रमाणे वयाच्या सुमारे चार ते सहा वर्षांच्या वेळी "असभ्य" विचार बहुधा शरीरातून बाहेर टाकल्या जाणाऱ्या गोष्टींभोवती (मूत्र, विष्ठा) केंद्रित झालेले असतात; तसेच आपली इंद्रिये दाखवणे किंवा ती दुसऱ्यांच्या नजरेस पडतील असे खेळ खेळणे, किंवा कधीकधी क्रूरपणाच्या गोष्टी करणे हे प्रकारही आढळतात. ह्या वयात लिंगभेदाकडे किंवा प्रजाजननाकडे फारसे लक्ष दिले जात नाही. जो शेतकऱ्यांच्यात बरीच वर्षे राहिलेला आहे आणि ज्याने त्यांचे बालपण जवळून पाहिले आहे त्याला सहज कळून येईल की

वर वर्णन केलेली परिस्थिती अगदी सर्वसाधारण समजली जाते, पण उघडपणे मात्र नाही. कामकरी वर्गातही परिस्थिती अशीच असते.[२] वरच्या वर्गात मात्र असभ्य किंवा अश्लील गोष्टी जास्त जोराने दडपून टाकल्या जातात, पण मुळात परिस्थिती फारशी वेगळी नसते. शेतकरी-कामकरी वर्गापेक्षा वरच्या वर्गाबद्दल तपशीलवार निरीक्षण करणे जरा अधिक कठीण आहे; पण शैक्षणिक, नैतिक व सुप्रजाजननाच्या दृष्टीने ते आवश्यक आहे. त्याकरता योग्य अशा संशोधनपद्धती शोधून काढल्या पाहिजेत. अशा संशोधनाने फ्रॉइड व त्याचे अनुयायी ह्यांच्या मताला व विधानांना विशेष जोराचा आधार मिळेल असे मला वाटते.[3]

मुलाच्या मनातील नवीनच उद्भवलेल्या लैंगिकतेचा अथवा "अश्लीलते"चा कौटुंबिक संबंधांवर काय परिणाम होतो? मुलाच्या मनातील "श्लील" आणि "अश्लील" ह्या वर्गीकरणात आई ही पूर्णपणे "श्लील" ह्या वर्गात बसते आणि मुलाच्या मनात तिला "अश्लीलते"चा स्पर्शही होत नाही. आपल्या मनातील असभ्य विचार किंवा खेळ आईला कळू शकतील हा विचार मुलाला अतिशय अप्रिय असा वाटतो. तसेच तिच्याशी अगर तिच्यादेखत लैंगिक गोष्टींबद्दल बोलण्याची लाज वाटते. बाप ह्याही "अश्लीलते"च्या वर्गाच्या बाहेर ठेवला जातो व शिवाय त्याच्या नैतिक अधिकारामुळे आपले लैंगिक विचार किंवा खेळ त्यालाही आवडणार नाहीत अशी मुलाची समजूत असते. कारण "अश्लील" किंवा "असभ्य" याच्या मागे एक दोषीपणाची कल्पना असते.[४]

फ्रॉइड व त्याच्या मनोविश्लेषण उपपत्तीच्या विचारसरणीत बाप आणि मुलगा व आई आणि मुलगी ह्यांच्यामधील स्पर्धेला फार महत्त्व दिलेले आहे. माझे मत असे आहे की, आई व मुलगी ह्यांच्यातील स्पर्धा मुलीच्या इतक्या लहान वयात सुरू होत नाही. निदान मला त्याची चिन्हे कोठेही आढळली नाहीत. बाप आणि मुलगा ह्यांचे संबंध जास्त गुंतागुंतीचे आहेत. मी पूर्वी सांगितल्याप्रमाणे जरी मुलग्याच्या मनात आईबद्दल "अश्लील" या वर्गात मोडतील अशा, काही प्रेरणा, इच्छा अथवा विचार नसतात, तरी हे मात्र खरे की, आईच्या निकट शारिरिक संबंधामुळे लैंगिक जागृती होत असली पाहिजे ह्यात संशय नाही. शेतकरी कुटुंबांच्या जमातीत बडबड्या म्हातार्‍यांनी तरुण आयांना दिलेला एक सुप्रसिद्ध उपदेश असा आहे की, मुलगा सुमारे तीन वर्षांचा झाला म्हणजे आईने त्याला वेगळे निजवावे. ह्या जमातीत लहान मुलग्यांच्या इंद्रियाचे उत्थापन होणे, त्याप्रमाणेच मुलग्याने मुलीपेक्षा निराळ्या रीतीने आईला बिलगणे ही अगदी सर्वांना माहीत असलेली गोष्ट आहे. अशा परिस्थितीत बाप आणि त्याचा लहान मुलगा ह्यांच्यात लैंगिक स्पर्धेचा काही अंश असणे शक्य आहे हे बाहेरून निरीक्षण करणाऱ्या समाजशास्त्रज्ञालाही कळून येईल. मनोविश्लेषणज्ञ ह्याबद्दल ठाम विधान करतात. श्रीमंत लोकांच्यात अगदी सरळ सरळ भांडणे क्वचितच होतात, अथवा होतच नाहीत. पण ती कल्पनेत उद्भवतात, त्यांचे स्वरूप अधिक

सुधारलेले पण तरीही नकळत हानिकारक असते.

इथे हे लक्षात ठेवले पाहिजे की, ह्या वयात मुलाच्या स्वभावात, वागण्यात आपापल्या लिंगाप्रमाणे फरक पडत असतो आणि आईबापांच्या भावनाही मुलगे व मुली ह्यांच्या बाबतीत वेगवेगळ्या होऊ लागतात. बापाला मुलाबद्दल वाटते की, तो पुढे आपला वारस होणार व कुटुंबात आणि वंशात आपली जागा घेणार आहे त्यामुळे तो मुलग्याच्या बाबतीत जास्त दोषदर्शी बनतो आणि त्याचे दोन परिणाम होऊ शकतात : जर मुलगा शारीरिक किंवा मानसिक दृष्ट्या कमी प्रतीचा असेल व बापाच्या त्याच्याबद्दलच्या अपेक्षांना धक्का देणारा असेल तर मग बापाच्या भावना निराशेच्या होतात व त्याच्या मनात मुलग्याबद्दल थोडे प्रतिकूल विचार येतात. ह्याच्या उलट ह्या अवस्थेतसुद्धा थोडीशी स्पर्धा, पुढे आपली जागा घेणाऱ्याबद्दलचा सुप्त विरोध आणि मावळत्या पिढीचा नेहमीचा खिन्नपणा ह्यामुळेही शत्रुत्व उत्पन्न होते. ह्या दोन्ही प्रकारचे शत्रुत्व अर्थातच अंतर्मनात दाबून टाकले जाते. बाप मुलाच्या बाबतीत कठोर बनतो व त्यामुळे मुलाच्याही मनात बापाविषयी विरोधी भावना बळावते. ह्याच्याविरुद्ध आईच्या मनात मुलग्याविषयी विरोधी भावना उत्पन्न होण्याचे काहीच कारण नसते, एवढेच नव्हे तर आपला मुलगा पुढे एक पुरुष होणार म्हणून तिच्या मनात त्याच्याविषयी आकर्षणच उत्पन्न होते. बापाची मुलीबद्दलची भावना— आपलीच स्त्रीलिंगी प्रतिकृती— नाजूक तर असतेच पण त्याचा अभिमानही जागृत करणारी असते. अशा रीतीने सामाजिक आणि शारीरिक अशा दोन्ही बाजूंनी बापाचे मुलीशी नाते मुलग्यापेक्षा अधिक प्रेमाचे होते, आणि आईच्या बाबतीत ह्याच्या उलट परिस्थिती असते. अर्थात हे इथे लक्षात ठेवणे जरूर आहे की, भिन्नलिंगी प्रजेबद्दलचे आईबापांचे प्रेम म्हणजे लैंगिक प्रेम आहे असे म्हणणे चूक होईल.

मेलानेशियामध्ये मुलामध्ये अगदी वेगळ्याच प्रकारचा लैंगिक विकास दिसून येतो. शरीरशास्त्रीय प्रेरणा वेगळ्या नसतात हे निस्संशय आहे. पण मला अशा गोष्टी अजीबात आढळल्या नाहीत की ज्यांना बालवयातील असभ्य किंवा अश्लील वर्तन म्हणता येईल, किंवा एखाद्या छुप्या जगात मुले आपल्या मलमूत्र विसर्जनासंबंधी खेळ खेळताहेत, अथवा आपल्या इंद्रियांचे प्रदर्शन करताहेत. अर्थात अशा प्रकारच्या निरीक्षणात काही अडचणी येतात हे मी मान्य करतो. कारण रानटी समाजातील मुलांशी संपर्क साधणे फार कठीण असते; आणि त्या समाजात आपल्याप्रमाणे अश्लीलतेचे जग असले तरी आपल्या समाजात ज्याप्रमाणे एखादा बाप, एखादी आई किंवा दाई ह्यांच्याकडे चौकशी करून मुलांच्या छुप्या लैंगिक क्रियांबद्दल किंवा खेळांबद्दल माहिती मिळवणे जसे जवळजवळ अशक्य असते तीच परिस्थिती थोड्या प्रमाणात रानटी समाजात त्या साधारण मोठ्या माणसाकडून माहिती मिळण्याबद्दल असते. पण एक गोष्ट तेथे अगदी वेगळी असते, व त्यामुळे ह्या बाबतीत निरीक्षकाची चूक होण्याची शक्यता नाहीशी होते : ही गोष्ट म्हणजे त्यांच्यात लैंगिकता दाबून

टाकली जात नाही, लैंगिकतेबद्दल दोषारोप केला जात नाही, नैतिक दृष्ट्या मुलांमधील लैंगिकता आपण आत्ता विचार करतो आहो त्या वयाच्या जरा मोठेपणी दिसून आली तरी गर्ह्य समजली जात नाही—म्हणजे पाचव्या किंवा सहाव्या वर्षी. म्हणजे ह्याच्या आधी जर मुलाकडून काही अश्लील अथवा असभ्य वर्तन घडले तर ते त्याच्या पुढच्या वयातील लैंगिकतेप्रमाणेच निरीक्षकाला पाहणे शक्य होते.

तर मग रानटी समाजात फ्रॉइड ज्याला "पूर्व-लैंगिक इंद्रियविषयक" (प्रीजेनिटल) किंवा "गुदद्वार-वैषयिक प्रेमाचे" (एनल-इरॉटिक) कुतूहल म्हणतो ते का दिसून येत नाही? मुलाच्या ह्यानंतरच्या वयातील लैंगिकतेचा आपण विचार करू लागलो म्हणजे ह्याचे उत्तर देणे आपल्याला सोपे होईल; कारण ह्या वयातील लैंगिकतेमध्ये मेलानेशियन मुले व आपल्या समाजातील मुले ह्यांच्यात खूपच फरक असतो.

❀ ❀

## प्रकरण ६ वे

# पुढील जीवनाकरता उमेदवारी

आता आपण बालवयाच्या तिसऱ्या अवस्थेपर्यंत पोचलो आहोत. ही अवस्था पाचव्या किंवा सहाव्या वर्षापासून सुरू होते. ह्या वयात मूल स्वतंत्र झालेले असते, ते निरनिराळे खेळ मनांतून काढू शकते. आपल्याच वयाच्या इतर मुलांशी खेळू लागते व मोठ्या माणसांशिवाय समवयस्कांबरोबर ते इकडे तिकडे भटकू शकते. ह्याच कालात खेळाचे रूपांतर अधिक महत्त्वाच्या उद्योगात व जीवनाच्या अंगांबद्दलच्या कुतूहलात होते.

ह्याच वयाच्या युरोपातील मुलांचा आपण प्रथम विचार करू. ह्या वयात सधन कुटुंबांतील मुले शाळेत जाऊ लागतात तर खालच्या वर्गातील मुले काही तरी धंदा शिकण्याकरता उमेदवारी करू लागतात. म्हणजे दोन्ही वर्गात कुटुंबाचा त्याच्याशी संबंध बराच कमी होतो. मुलगा व मुलगी ह्या दोघांचेही आईला बिलगून राहण्याचे प्रमाण खूपच कमी होते. मुलग्याच्या बाबतीत पुष्कळदा आईच्या बदली कोणावर तरी त्याचे प्रेम बसते व त्याच्या भावना मायाळू बनतात; पण त्यांत लैंगिकतेचा अंश नसतो. ही प्रेमाची भावना पुढील काही वर्षांत तरुण मुले वयाने आपल्यापेक्षा मोठ्या स्त्रियांच्या प्रेमात सापडतात त्यासारखी अजीबात नसते. पण त्याच वेळी आईच्या संपूर्ण मालकी हक्कासारख्या प्रेमातून सुटून स्वतंत्र होण्याची इच्छा उत्पन्न होते व मूल आईबापांना आपल्या मनातील सर्व गोष्टी सांगेनासे होते. शेतकरी-कामकरी वर्गात मुलाचे आईपासून दूर होणे वरच्या वर्गाच्या मानाने जरा आधी होते, पण त्या दोहोमध्ये मूलभूत फरक नसतो. जेव्हा आईला मुलाबद्दल, विशेषतः मुलग्याबद्दल विशेष आकर्षण वाटत असते तेव्हा तिला मुलाच्या ह्या दूर होण्याबद्दल थोडा हेवा व चीड वाटते आणि ती काही वेळा त्या घटनेत विघ्नेही आणू शकते. पण ह्याचा परिणाम म्हणजे दोघांतील ताटातुट अधिक दुःखदायक व तीव्र होते.

पश्चिम पॅसिफिक महासागराच्या किनाऱ्यावरील पोवळ्यांच्या बेटावरील मुलांचा कलही असाच असतो. एवढेच काय, तिथे तर ही घटना अधिकच स्पष्ट रीतीने पाहायला मिळते. कारण तेथे सक्तीचे शिक्षण नसल्यामुळे व कोणत्याही प्रकारची कडक शिस्त नसल्यामुळे बाल्यावस्थेतील प्रेरणांना अधिकच वाव मिळतो. पण मेलानेशिया-तील मातेला मात्र मुलांच्या ह्या स्वातंत्र्याबद्दल हेवा, विरोध किंवा चिंता वाटत नाही आणि इथे आपल्याला स्पष्टपणे दिसून येते की मूल आणि आई, ह्यांच्यात कोणतेही खोल शैक्षणिक बंध नसतात. ह्या वयात ट्रोब्रियांड द्वीपसमूहातीतल्या जमातीतली मुले

आपला स्वतःचा एक छोटा गट बनवतात. ते लहान लहान टोळ्या करून भटकतात, लांबच्या समुद्रकिनाऱ्यावर किंवा जंगलाच्या एका बाजूच्या भागात खेळतात, जवळच्या खेड्यातील समवयस्क मुलांच्या टोळ्यांत मिसळतात. आणि ह्या सर्वांत ती जरी आपल्या बाल पुढाऱ्यांचे हुकूम मानतात तरी मोठ्या माणसांच्या सत्तेपासून बऱ्याच प्रमाणात स्वतंत्र असतात. त्यांचे आईबाप त्यांना घरात ठेवून घेण्याचा प्रयत्नही करीत नाहीत, त्यांच्यात मध्ये पडत नाहीत किंवा त्यांच्याकरता काही नित्याचा शिरस्ता घालून देत नाहीत. प्रारंभी अर्थातच कुटुंबाचा व मुलांचा बराच निकट संबंध राहतो पण मुले स्वतंत्र होण्याची प्रक्रिया हळूहळू व एकसारखी होत असते व तिच्यावर कोणत्याही प्रकारची बंधने पडत नाहीत.

ह्या घटनेमध्ये व युरोपातील वातावरणात खूपच फरक असतो. कारण युरोपात कुटुंबाच्या दाट मैत्रीच्या वातावरणातून मूल शाळेच्या भावनारहित शिस्तीत किंवा तशाच प्रकारच्या उमेदवारी पद्धतीत शिरते. ह्याच्याउलट मेलानेशियात मुलाचे कुटुंबापासून होणारे विभक्तीकरण क्रमाक्रमाने, सुखकारक व बंधनांविरहित होते.

आणि मुलांच्या ह्या वयात बापाची मनःस्थिती कशी असते! ब्रिटन व अमेरिका ह्यांतील कौटुंबिक जीवनाच्या काही आधुनिक बाजू वगळता, आपल्या समाजात पित्याला कुटुंबप्रमुख म्हणून कुटुंबात पूर्ण सत्ता असते. कुटुंबाच्या बाहेर शाळेत किंवा कारखान्यात जेथे मुले उमेदवारी करतात तेथे, किंवा शेतकऱ्यांची मुले शेतातील काम शिकतात त्या ठिकाणी प्रत्यक्ष बाप किंवा बापाच्या बदली दुसरा एखादा सत्ता गाजवतो. वरच्या वर्गात ह्या वयाच्या बापाच्या अधिकाराचे व बापासारखे होण्याचे ध्येय मनात बनण्याची महत्त्वाची प्रक्रिया सुरू होते. पूर्वी मुलाने जे केवळ तर्काने ओळखले होते ते त्याला आता प्रत्यक्ष दिसू लागते की बापाची कुटुंबप्रमुख म्हणून सत्ता प्रस्थापित झालेली आहे व आर्थिक बाजूवर त्याचाच अधिकार चालतो. बापाचा बिनचूकपणा, शहाणपणा, न्यायीपणा आणि बल ह्यांबद्दल निरनिराळ्या प्रमाणात आणि निरनिराळ्या मार्गांनी आईकडून किंवा दाईकडून मुलाच्या मनावर ठसा उमटवला जातो. कुटुंबातील रोजच्या जीवनात ज्याचा संताप किंवा दोष इतरांना दिसून येत असतात अशा व्यक्तीला आदर्श पिता ही भूमिका बजावणे फार कठीण असते. अर्थात आदर्श पित्याची भूमिका मुलांच्या मनात तयार झाल्यावर थोड्याच कालाने ती नाहीशी होऊ लागते. मुलाला बापाच्या रागाबद्दल किंवा दोषांबद्दल एक प्रकारची अस्वस्थता वाटू लागते, त्याच्या संतापाची भीती वाटू लागते, अन्यायाची अस्पष्ट चीड येते आणि बाप रागाच्या भरात आपले भान विसरला तर त्याबद्दल लाजही वाटते. लवकरच बापाबद्दलची नेहेमीची भावना मुलांच्या मनात बनून राहते व त्यात अनेक परस्परविरोधी भावनांचे मिश्रण असते— आदर व तुच्छता, प्रेम व नावड, माया आणि भीती. ह्या वयातच पितृसत्ताक समाजातील सर्वसाधारण प्रवृत्तीमुळे मुलांच्या मनावर पित्याबद्दलच्या भावना ठसविल्या जातात. मुलगा आणि बाप ह्यांच्यातील

पूर्वी वर्णन केलेली वारस आणि जनक ह्यातील स्पर्धा आणि परस्परांमधील हेवा जास्त स्पष्ट रूप घेऊ लागतात व बाप आणि मुलगी ह्यांच्यातील संबंधापेक्षा मुलगा आणि बाप ह्यांमध्ये ऋण तत्त्वे ( negative elements ) जास्त प्रभावी बनतात.

समाजाच्या खालच्या वर्गात बापाला आदर्श बनवण्याची प्रक्रिया अधिक ओबडधोबड असते पण म्हणून तिचे महत्त्व मात्र कमी नसते. मी मागे सांगितल्या-प्रमाणे सर्वसाधारण खेडवळ, शेतकरी कुटुंबातील बाप हा उघड उघड जुलमी सत्ताधारी असतो. आई ह्या त्याच्या स्थानाशी जुळवून घेते एवढेच नव्हे तर मुलांच्या मनात-देखील ही परिस्थिती बिंबवते. मुले बापाबद्दल आदर बाळगतात पण त्याचबरोबर त्याच्या जोरदार पाशवी शक्तीला ती भीत असतात. इथेसुध्दा मनाच्या भावना दोलायमान होतात आणि बापाला त्याच्या मुली किंचित जास्त आवडू लागतात.

मेलानेशियात बापाची भूमिका कोणची असते ? प्रस्तुत संदर्भात तीबद्दल विशेष विवेचन करण्याची जरुरी नाही. तो मुलांचा मित्र म्हणून मागील कालाप्रमाणेच वागत राहतो, त्यांना मदत करतो, व त्यांना जे आवडेल ते व तितके त्यांना शिकवतो. मुलांना त्याच्याबद्दल विशेष आपुलकी ह्या वयात वाटत नाही, व त्यांना आपले समवयस्क खेळगडी जास्त आवडतात हे खरे. पण बाप मदत व उपदेश करणारा, अर्धवट खेळगडी व अर्धवट संरक्षक म्हणून सदैव हजर असतो हेही विसरता कामा नये.

तरी पण ह्या वयाला जमातीचा कायदा व सत्ता, बाह्य शक्तींचा दाब व काही इष्ट गोष्टींचा निषेध हीही मुलगे व मुली ह्यांच्या जीवनात प्रवेश करतात. पण समाजाची ही सत्ता व हे निषेध बापाच्याकडून गाजवले जात नाहीत. तर ते अगदी वेगळ्या व्यक्तीकडून म्हणजे आईच्या भावाकडून मुलांवर लादले जातात; आणि मातृसत्ताक समाजात मामा हाच कुटुंबप्रमुख असतो. त्याच्या हातात सर्व सत्ता असते व तो तिचा वापरही भरपूर प्रमाणात करतो.

आपल्या समाजातील बापाची सत्ता व मेलानेशियन समाजातील मामाची सत्ता ह्यात बरेच साम्य असले तरी त्यांच्यात फरकही असतात. एक तर युरोपियन बापापेक्षा मेलानेशियन मामाचा मुलांशी संबंध बराच उशीरा येतो. शिवाय तो कुटुंबाच्या निकट जीवनात कधीही प्रवेश करीत नाही, तर दुसऱ्या एखाद्या झोपडीत किंवा पुष्कळदा दुसऱ्या खेड्यात राहतो. कारण ट्रोब्रियांड जमातीत विवाह पितृस्थानीय असल्यामुळे त्याची बहीण व तिची मुले, ( तिचा ) नवरा व ( मुलांचा ) बाप ज्या खेड्यात असेल तेथेच राहतात. म्हणजे अर्थातच त्याची सत्ता लांबून गाजवली जाते आणि अर्थातच जेथे लहान-सहान बाबतीत ती त्रासदायक ठरण्याची भीती असते त्या प्रकारचा प्रसंग रोजच्या जीवनात येत नाही. मुलगा असो किंवा मुलगी असो, तो त्यांच्या जीवनात दोन गोष्टी आणतो. प्रथम म्हणजे कर्तव्य, बंधने व निषेध; दुसरे म्हणजे विशेषतः मुलग्याच्या जीवनात महत्त्वाकांक्षा, अभिमान व सामाजिक मूल्ये. थोडक्यात म्हणजे ट्रोब्रियांडरला ज्याकरता जीवन जगावेसे वाटते त्यापैकी जवळजवळ निम्मा भाग.

तो मुलग्याचा म्हणजे आपल्या भाच्याचा उद्योगधंदा नियमित करू लागतो त्या वेळी त्यावर बंधने येतात, तो त्याच्यापासून काही विशिष्ट सेवांची अपेक्षा करतो आणि जमातीचे कायदे व निषेध ह्यांची हळूहळू माहिती करून देतो. ह्यांपैकी काहींची माहिती मुलाला त्याच्या आईबापांकडून आधीच झालेली असते पण " काडा " ( आईचा भाऊ ) हा त्याला त्या कायद्यांचा व नियमांचा खरा प्रतिनिधी म्हणून दाखवला जातो.

सहा वर्षांच्या मुलाला त्याचा मामा पुष्कळदा एखाद्या सफरीवर नेतो, आपल्या बागेत त्याला थोडे काम शिकवतो आणि पीक हालवण्यात मदतीला घेतो. मामाच्या गावात आणि त्याच्या कुलातील इतर माणसांबरोबर ह्या सर्व गोष्टी करताना त्याला कळून चुकते की आपण आपल्या कुळाच्या " बुटुरा "त ( कीर्तीत ) भर घालीत आहोत. त्याला ते गाव आपलेसे वाटू लागते व त्यातले लोकही आपले लोक अशी त्याची समजून होते. तेथेच त्याला ह्या त्याच्या कुलाच्या परंपरा, दंतकथा व पौराणिक गोष्टी कळून येतात. ह्याच कालात मुलगा आपल्या बापाच्या कामातही सहकार करीत असतो आणि ह्या दोन मोठ्या माणसांच्याबद्दलची त्याच्या मनाची वेगवेगळी भूमिका पाहणे मोठे मनोरंजक असते. बापाशी त्याचे नाते अधिक जवळचे असते, त्याला त्याच्याबरोबर काम करायला, त्याला मदत करायला व त्याच्यापासून शिकायला आवडते; पण त्याला लवकरच हेही कळून चुकते की हे सर्व सहकार्य सदिच्छेवर अवलंबून असते, कायद्यावर नाही. त्यापासून मनाला जे सुख मिळते तेच त्याचे बक्षीस. पण त्याचे श्रेष्ठपण दुसऱ्या म्हणजे अनोळखी लोकांच्या कुलाकडे जाते. शिवाय मुलाला हेही दिसत असते की, आईला तिचा भाऊ हुकूम करीत असतो, त्याच्याकडून ती उपकार स्वीकारीत असते, त्याला अतिशय मान देत असते व त्याच्यापुढे एखाद्या सत्ताधीशापुढे नमावे तशी नम्रतेने वागत असते. ह्या सर्वांवरून त्याला हळूहळू समजू लागते की, आपणच पुढे मामाचा वारस होणार आहो व आपणही पुढे आपल्या बहिणींवर हुकमत गाजवणार आहो. ह्या वयापासूनच त्याची व बहिणींची बऱ्याच प्रमाणात फारकत झालेली असते. कारण ट्रोब्रियांड जमातीत भावाबहिणींमध्ये निकट संबंध असण्यावर कडक निर्बंध असतात.

आपल्या समाजात ज्याप्रमाणे मुलग्याच्या समोर बापाचा आदर्श ठेवला जातो तसेच मेलानेशियन समाजात मामाचा आदर्श ठेवला जातो. मुलग्याने मामाला खूष ठेवावे व पुढे त्याच्यासारखे होण्याचा प्रयत्न करावा, असे सर्वांकडून त्याच्या मनावर ठसवले जाते. म्हणजे आपल्या समाजात बापाची भूमिका योग्य प्रकारे वठवणे हे जसे कठीण असते तसेच त्यांच्या समाजात मामालाही आपली भूमिका वठवणे कठीण वाटते. त्याच्या हातात सत्ता असते, तो आदर्श म्हणून समजला जातो, मुले आणि आई त्याचे हुकूम मानतात; तर दुसरीकडे मुलांचा बाप ह्या सर्व कठीण जबाबदाऱ्यांतून व वैशिष्ट्यांतून पूर्ण मोकळा असतो. पण मामा आपल्या भाच्याला जीवनाची एक नवी बाजू दाखवतो व त्यामुळे जीवनाचे क्षेत्र विस्तारते, ते जास्त चित्तवेधक होते व

त्यामुळे मन अधिक आकर्षित होते– सामाजिक महत्त्वाकांक्षा, पारंपरिक कीर्ती, आपल्या वंशाबद्दल व नातेवाइकांबद्दल अभिमान, भविष्यकाली मिळणारी संपत्ती व सत्ता आणि सामाजिक दर्जा.

हे लक्षात ठेवले पाहिजे की, ज्या वयात आपल्या यूरोपीय समाजातील मूल आपल्या समाजातील गुंतागुंतीच्या परिस्थितीची ओळख करून घेत असते त्याच वयात मेलानेशियन मुलगा किंवा मुलगी नात्याच्या संबंधीची तत्त्वे समजून घेत असतात. कारण हे संबंध म्हणजेच त्यांच्या सामाजिक व्यवस्थेचा पाया असतात. हे संबंध कुटुंबातील आपुलकीचे व निकटचे संबंध तोडून टाकतात व मुलाचे सामाजिक जग, जे त्याचे कुटुंब, त्याच्याशी संबंधित जवळची माणसे, शेजारी व गावातली इतर माणसे ह्यांनी बनलेले होते, ते पार बदलून जाते. मुलांना आता कळू लागते की, आपल्या पूर्वीच्या जगाच्यावर आणि पलीकडे दोन मुख्य प्रकार आपण लक्षात घेतले पाहिजेत. एक प्रकार म्हणजे त्याच्या प्रत्यक्ष नात्यातली माणसे ( veyola ). ह्यात त्याची आई, भावंडे, मामा व त्याचे नातेवाईक ह्यांचा समावेश होतो. ही सर्व मंडळी त्याच्याच शरीराच्या वस्तूंची, " त्याच शरीराची " आहेत. ह्यातील पुरुषांच्या आज्ञा त्याला पाळाव्या लागतात, त्याच्याबरोबर काम करावे लागते, त्यांना मदत करावी लागते, लढाई किंवा वैयक्तिक भांडणांत त्यांची बाजू घ्यावी लागते. त्याच्या कुलातील आणि नात्यातील स्त्रियांशी लैंगिक संयोग कधीही होऊ शकत नाही. कारण त्याचा कडक निषेध केलेला आहे. दुसरा सामाजिक वर्ग म्हणजे तिऱ्हाइतांचा किंवा " बाहेरच्यांचा " ( Tomakava ). ह्या शब्दांत जे जे लोक मातेच्या मार्फत नात्याचे नसतात किंवा निराळ्या कुलातले असतात त्यांचा समावेश होतो; पण ह्याच समूहात मुलांचा बाप व त्याचे नातेवाईक हेही असतात, व त्यात स्त्रिया आणि पुरुष अशा दोहोंचा समावेश होतो. ह्याच समूहात ज्या स्त्रियांशी मुलग्याचा लैंगिक संयोग अथवा विवाह होऊ शकतो त्याही असतात. ह्या समूहातील लोकांचे, विशेषतः बापाचे मुलांशी अगदी निकटचे संबंध असतात पण कायदा व पारंपरिक नीतिनियम त्याकडे संपूर्ण दुर्लक्ष करतात. अशा रीतीने एका बाजूला सामाजिक महत्त्वाकांक्षा व अभिमान ह्यांच्याशी नात्याचा संबंध जोडला जातो व त्याबरोबर, बंधने व लैंगिक निषेध हीही येतात; तर दुसऱ्या बाजूला बाप आणि बापाच्या नात्यातल्या लोकांशी मैत्री करण्यास पूर्ण मोकळीक, साहजिक वाटणारे आकर्षण व लैंगिक स्वातंत्र्य, पण त्यांच्याशी एकरूपता नाही किंवा पारंपारिक निकट संबंधही नाहीत.

♠ ♠

प्रकरण ७ वे

# नंतरच्या बालपणातील लैंगिकता

आता आपण बालपणाच्या तिसऱ्या कालखंडातील म्हणजे मागील प्रकरणात वर्णिलेल्या वयाच्या नंतरच्या कालातील लैंगिकतेचा विचार करू. हा कालखंड म्हणजे स्वतंत्रपणे भटकण्याचा व खेळण्याचा काल असून तो पाचव्या वर्षापासून वयात येईपर्यंत टिकतो. ह्यापूर्वीच्या वयाबद्दल विचार करताना सामाजिक दबावाचा परिणाम व लैंगिकता ही मी वेगळी ठेवली होती. ह्या वेळीही मी तीच पद्धती स्वीकारणार आहे म्हणजे शरीर व समाज ह्यांचा परिणाम वेगळावेगळा अभ्यासता येईल.

फ्रॉइडच्या मताप्रमाणे यूरोपीय समाजात ह्या वयात एक चमत्कारिक घटना दिसून येते : लैंगिकता कमी होते, एक सुप्त लैंगिकतेचा कालखंड येतो आणि लैंगिकतेचे नैसर्गिक कार्य व प्रेरणा ह्यांच्या विकासात शान्ततेचा काल येतो. फ्रॉइडच्या मज्जातंतूविषयक विकृतीच्या उत्पत्तीत ह्या कालखंडाला विशेष महत्त्व येण्याचे कारण असे की, त्याच्या मते ह्या वेळी लैंगिक प्रवृत्ती सुप्त झाल्यामुळे व पूर्वीच्या अनुभवाचे विस्मरण झाल्यामुळे अगदी लहान वयात जे काही लैंगिक अनुभव मनाला आलेले असतील त्यांवर पडदा पडतो व ते मनातून पार नाहीसे होतात. ह्यात लक्षात घेण्यासारखी गोष्ट अशी की, फ्रॉइडचे हे विधान इतर संशोधक मान्य करीत नाहीत. उदाहरणार्थ, मोल् हा आपल्या "बाल्यावस्थेतील लैंगिकता"[१] ह्या अतिशय तपशीलवार व अधिकारयुक्त अशा निबंधात कोणत्याही वयात लैंगिकतेच्या विकासात मध्येच खंड पडल्याचा उल्लेख करीत नाही. उलट त्याने दिलेल्या वर्णनात मुलांमधील लैंगिकता एकसारखी व सावकाश वाढत असते, आणि त्याचा आलेख मध्ये न वाकता सरळ चढत जातो असे म्हटले आहे. त्यातही गंमत अशी आहे की, ह्या बाबतीत काही वेळा स्वतः फ्रॉइडच्याही मतात बदल झाल्याचे दिसते. उदाहरणार्थ, ह्या विशिष्ट वयाबद्दलचा विचार फ्रॉइड एखाद्या वेगळ्या प्रकरणात करीत नाही; आणि एक दोन ठिकाणी तर फ्रॉइड असा काही वेगळा कालखंड आहे हेही मान्य करीत नाही.[२] शाळेतील सुशिक्षित मुलग्यांच्या माझ्या स्वतःच्या निरीक्षणावरून मी असे म्हणू शकतो की, हा लैंगिकतेच्या सुप्ततेचा कालविभाग सुमारे वयाच्या सहाव्या वर्षी सुरू होतो व दोन ते चार वर्षे टिकतो. ह्या कालखंडात अश्लीलतेबद्दलचे कुतूहल कमी होते, त्याचे पूर्वीचे भडक आणि आकर्षक रंग फिकट होतात व त्यांच्या जागी मुलग्यांचे मन ओढून घेणाऱ्या व रमवणाऱ्या व शक्ती गुंतवणाऱ्या दुसऱ्या गोष्टी उत्पन्न होतात.

स्वतः फ्रॉइडची मते व लैंगिकतेच्या इतर अभ्यासकांची मते ह्यांतील तफावतीचा आपण कसा अर्थ सांगणार ?

एक गोष्ट इथे स्पष्ट आहे की, ज्या घटनेचा आपण विचार करीत आहो ती माणसाच्या शरीररचनेत खोलवर रुजलेली नाही. सामाजिक वातावरण व प्रक्रिया ह्यांमुळेच तिचा उद्भव झालेला असावा असे म्हणणे बहुधा क य, पण खात्रीने योग्य ठरेल. जर आपण समाजातील निरनिराळ्या वर्गांचा तुलनात्मक अभ्यास केला तर असे दिसून येते की, खालच्या वर्गात, विशेषतः शेतकरी वर्गात हा लैंगिकतेचा सुप्त काल पुष्कळच कमी प्रमाणात दिसून येतो. एकंदर सर्व गोष्टी स्पष्टपणे दिसण्याकरता आपण पुन्हा एकदा ह्या पूर्वीच्या कालखंडातील शैशवातील व जन्मापूर्वीच्या लैंगिकतेचा विचार करू, आणि ह्या दोहोंचा काय संबंध आहे ते पाहू. आपण पाच्या प्रकरणात पाहिले की, समाजातील खालच्या आणि वरच्या वर्गातही मुलांच्या मनात अश्लील किंवा असभ्य ह्याबद्दल विशेष कुतूहल व जिज्ञासा असते. शेतकऱ्यांच्या मुलात ही जिज्ञासा जरा उशीरा उत्पन्न होते व तिचे स्वरूपही जरा निराळे असते. समाजाच्या खालच्या व वरच्या वर्गातील मुलांमध्ये फ्रॉइड जिला "गुदद्वार लैंगिकता"[३] म्हणतो तिची तुलना करू. सांपत्तिक सुस्थितीतील बाळाच्या मनात मलमूत्र विसर्जनाबद्दलच्या कुतूहलाचे कौतुक केले जाते व नंतर ते एकदम थांबवले जाते. दाई किंवा आई एका विशिष्ट स्थितीपर्यंत मलमूत्रविसर्जनाला उत्तेजन देत असते व बाळाने ह्या गोष्टी केल्यावर त्याची स्तुती करीत असते; आणि त्याच्या कृतीचा परिणाम त्याला दाखवीत असते. पण लवकरच तिच्या लक्षात येते की बाळाचे ह्या गोष्टींकडे जादा प्रमाणात लक्ष गेलेले असते व ते ज्या गोष्टी अगदी सहज म्हणून करते त्या मोठ्या माणसांना अस्वच्छ व अनिष्ट अशा वाटू लागतात. ह्यानंतर लहान मुलांच्या खोलीतील अधिकारी व्यक्ती मुलाला एक थप्पड मारते, त्याची कृती हा एक गुन्हा आहे असे त्याच्या मनात ठसवते आणि मलमूत्रविसर्जनातील मुलाची जिज्ञासा एकदम दाबून टाकली जाते. मूल नंतर मोठे होते, पण शरिराच्या नैसर्गिक क्रियांबद्दल मोठ्या माणसांच्या कपाळाच्या आठ्या, त्याबद्दल न बोलण्याची पध्दती आणि कृत्रिमपणा ह्यांमुळे मुलाच्या मनात त्याबद्दल छुपे कुतूहल व गूढ जिज्ञासा ही उत्पन्न होतात.

ज्यांना आपल्या स्वतःच्या बालपणातल्या आठवणी असतील त्यांच्या लक्षात येईल की, मुले अशा गर्भित सूचना व ध्वनित केलेला अर्थ किती पटकन ओळखतात व त्यामुळे अश्लील वा असभ्य ह्या कल्पना मोठ्या माणसांकडून लहान मुलांच्या मनात भरवल्या जातात हीही गोष्ट ते मान्य करतील. मुलांच्या वागणुकीचे निरीक्षण करून व आपल्या बालपणाची आठवण करून हे सहज लक्षात येईल की, मुले मोठ्यांच्या वर्तनाच्या कृत्रिम भूमिकेचे अनुकरण करून लवकरच जादा शिष्ट, नीतिबाज व मोठेपणाचा आव आणणारी बनतात. शेतकऱ्यांच्यात मात्र परिस्थिती अगदीच वेगळी असते. मुलांना लहान वयातच लिंगविषयक शिक्षण मिळते. त्यांच्या राहण्याच्या परिस्थितीत

त्यांच्या आईबापांचा व इतर नातेवाइकांचा लैंगिक संयोग त्यांच्या नजरेस पडल्याशिवाय राहात नाही. त्यांच्या कानावर जे भांडणाचे व कलहाचे शब्द पडतात त्यांत लैंगिक व अश्लील वस्तूंचा व कृतींचा भरपूर उपयोग केलेला असतो. त्यांचा पाळीव प्राण्यांशी रोज संबंध येतो व त्यांच्यापासून प्रजोत्पादनाबद्दल घरात अगदी मोकळेपणाने चर्चा होते. कारण तो सर्वांनाच फार महत्त्वाचा असा विषय असतो. ज्या अर्थी ते ह्या सर्व नैसर्गिक गोष्टींमध्येच राहात असतात त्या अर्थी पुष्कळशा गोष्टी चोरून न करता उघडपणे करून आपली करमणूक करण्यात त्यांना काही लाज वाटत नाही. कामकरी लोकांची मुले, सुस्थितीतील वर्ग आणि शेतकरी ह्यांच्यामध्ये कोठे तरी असतात. त्यांचा प्राण्यांशी जरी संबंध येत नसला तरी निजण्याच्या खोलीत व सार्वजनिक मद्यपानगृहांत त्यांना भरपूर माहिती मिळते.

सुस्थितीतील वर्गांची मुले व शेतकरी-कामकरी वर्गांची मुले ह्यांच्यात जो हा फरक आहे त्याचा परिणाम काय होतो ? प्रथम म्हणजे नैसर्गिक जिज्ञासा दाबून टाकल्यामुळे मध्यम व उच्च वर्गातील मुलांमध्ये जी अश्लीलता किंवा बीभत्सपणा उत्पन्न होतो तो खालच्या वर्गात विशेषसा दिसत नाही आणि बऱ्याच उशीरा लैंगिकता व प्रजोत्पत्ती ह्यांचा संबंध कळल्यावर उत्पन्न होतो. वरच्या वर्गात एकदा अश्लीलतेबद्दलची जिज्ञासा तृप्त झाली आणि मूल आपल्या खेळाच्या खोलीबाहेर पडू लागले की, जीवनात नवी आकर्षणे उत्पन्न होतात, व सुप्त लैंगिकतेचा कालखंड सुरू होतो. ह्या नव्या आकर्षणांनी मुलाचे मन व्यापून टाकले जाते आणि सुशिक्षित आईबापांच्या मुलांमध्ये नेहेमी आढळणाऱ्या अज्ञानामुळे प्रजाजननाविषयीचे कुतूहल इतक्या लवकर उत्पन्न होत नाही.

खालच्या वर्गातील मुलांमध्ये लैंगिकता व प्रजोत्पत्तीचे ज्ञान एकाच वेळी अस्तित्वात असतात आणि त्यामुळे त्यात खंड न पडता मूल वयात येईपर्यंत त्याचा एकसारखा विकास होतो.

सामाजिक वातावरणाचा परिणाम व वर दिलेले सत्य परिस्थितीचे वर्णन ह्यांमुळे सुस्थितीतील मुलांच्या बाबतीत मात्र लैंगिकतेच्या विकासात खंड पडतो. सहा वर्षे वयापर्यंत त्याचे आयुष्य केवळ खेळ आणि करमणूक ह्यांतच गेलेले असते. आता त्याला शाळेत जाऊन शिकावे लागते व घरी अभ्यास करावा लागतो. शेतकऱ्याची मुले ह्या आधीच घरात स्वयंपाकात मदत करणे किंवा लहान भावंडांना संभाळणे किंवा मेंढ्या, बदके इत्यादींच्या मागे जाणे ही कामे करू लागलेलीच असतात. ह्या वेळी त्यांच्या जीवनाच्या प्रवाहात कोणत्याही प्रकारचा खंड पडत नाही.

अशा प्रकारे जरी शेतकरी-कामकरी वर्गाच्या मुलांत अश्लीलाबद्दलचे कुतूहल आधी जागृत होते व ते निराळ्या स्वरूपात असते तरी ते फारसे लपवलेले नसते, त्यात आपण काही अयोग्य वर्तन करीत आहो अशी भावना नसते व त्यात मलविसर्जनाचा व गुदद्वाराचा संबंध कमी असून ते सरळसरळ लैंगिकच असते. त्याचे रूपांतर

सहजरीत्या व मध्ये खंड न पडता लैंगिक क्रीडेत होते आणि सुप्त लैंगिकतेचा काल जवळजवळ नसतोच; किंवा असलाच तर अगदीच अस्पष्ट असतो. ह्यावरून आपल्याला कळून येते की, मनोविश्लेषण सुखवस्तू लोकांबद्दलच असल्यामुळे ह्या सुप्त कालखंडाचा शोध लागला. पण डॉ. मोल ह्याचे संशोधन सर्वसाधारण लोकांबद्दल असल्यामुळे त्यांना तो आढळला नाही.

पण आपल्या समाजाच्या वरच्या व खालच्या वर्गात अशा प्रकारचा फरक आहे ह्याबद्दल जर कोणाच्या मनात संशय असला तर आपण मेलानेशियन समाजाचे निरीक्षण केले की तो तावडतोब दूर होईल. ह्या समाजातील वस्तुस्थिती आपल्या सुशिक्षित वर्गापेक्षा अगदीच निराळी आहे. पाचव्या प्रकरणात आपण पाहिलेच आहे की अगदी लहान वयातील लैंगिक अयोग्य वर्तन, छुपे खेळ आणि कुतूहल ही असत नाहीत. इतकेच काय पण आपल्याला असेही म्हणता येईल की, सभ्य–असभ्य, शुद्ध–अशुद्ध हे भेदच त्यांना ठाऊक नसतात. ज्या कारणांमुळे आपल्या शेतकरी कामकरी वर्गातील मुलांनाही हे भेद फारसे जाणवत नाहीत त्याहीपेक्षा अधिक प्रमाणात मेलानेशियन मुलांच्यात ते अजिबातच नसतात. मेलानेशियात सर्वसाधारणपणे लैंगिकतेचा निषेध केला जात नाही. शरीराच्या नैसर्गिक क्रियांभोवती आडपडदा घातला जात नाही, लहान मुलांच्या बाबतीत तर आजिबातच नाही. तेथील मुले नागडी इकडे तिकडे भटकत असतात, त्यांच्या मलमूत्र विसर्जनाबद्दल ती नैसर्गिक कृत्ये आहेत असे सर्वजण समजतात आणि शरीराच्या कोणत्याही भागाबद्दल किंवा नागवेपणाबद्दल कोणत्याही प्रकारची मनाई व्यक्त केली जात नाही. शिवाय आपण हेही लक्षात घेतले की, तीन किंवा चार वर्षे वयाच्या मुलांना लैंगिकता व जननेंद्रिये ह्यांचा संबंध हळूहळू कळू लागलेला असतो व बालवयातील इतर सुखदायक खेळांप्रमाणेच ह्याही प्रकारच्या खेळातून आपल्याला लवकरच आनंद मिळू लागेल ही अपेक्षा त्यांच्या मनात उत्पन्न होऊ लागते. ह्या सर्वांवरून दोन समाजातील फरक आपल्या सहज लक्षात येतील.

मेलानेशियन समाजातील ज्या वयाचा मी इथे विचार करीत आहे— म्हणजे आपल्या समाजातील सुप्त लैंगिकतेचा काल— त्यात मुलगे आणि मुली स्वतंत्रपणे एक प्रकारच्या प्रजासत्ताक राज्यात एकमेकांशी खेळत असतात. ह्या मुलांचे एक मुख्य कुतूहल म्हणजे लैंगिक खेळ हे असते. अगदी लहान वयात मुले एकमेकांपासून किंवा एखाद्या जरा मोठ्या सवंगड्यापासून लैंगिक ज्ञान मिळवतात. अर्थातच ह्या वयात त्यांना संभोगाची क्रिया नीटपणे करता येत नाही; पण ते निरनिराळ्या प्रकारच्या क्रीडांनी स्वतःचे समाधान करून घेतात व मोठी माणसे ह्या बाबतीत त्यांना पूर्ण स्वातंत्र्य देतात. अशा रीतीने त्यांना आपली जिज्ञासा व आपली विषयासक्ती ही उघडपणे आडपडदा न ठेवता भागवता येतात.

ह्या क्रीडांची मुख्य गोडी " जननेंद्रियविषयक " आहे, त्याचप्रमाणे त्या मोठी

किंवा मोठी माणसे ह्यांच्या अनुकरणाचा परिणाम असतात, व यूरोपातील वरच्या
ील मुलांच्या बाबतीत हा कालखंड अजीबात आढळत नाही. यूरोपातील
ल्या वर्गीतील मुलांच्यातही तो फारसा दिसून येत नाही असेच फ्रॉइडचे म्हणणे
ह्यात संशय नाही. मुलांच्या ह्या करमणुकीचे वर्णन करताना मेलानेशियातील मोठी
े त्याला पुष्कळदा " संभोगाची करमणूक " ( म्वायगिनी क्वायटा Mwaygini
ayta ) असे म्हणतात. किंवा कधीकधी " ती मुले लग्नाचा खेळ खेळत आहेत "
े म्हणतात.

मुलांचे सर्वच खेळ लैंगिक असतात असे मात्र समजू नये. पण लहान मुलांच्या
जनाचे काही खेळ असे असतात की, त्यांत लिंगाचा बराच संबंध येतो. मेलाने-
तील मुलांना " नवराबायको "चा खेळ खेळायला फार आवडते. एखादा मुलगा
ादी मुलगी एक लहानसा आडोसा बांधतात व त्याला आपले घरकूल म्हणतात.
े नवराबायकोची भूमिका करतात व अर्थातच त्यात सर्वांत महत्त्वाचा भाग
े लैंगिक संयोग हा असतो. दुसऱ्या एखाद्या वेळी बरीच मुले जमून वन-
नाला जातात व तेथे खाण्याबरोबरच एकमेकांशी लढाई करणे व लैंगिक संयोग करणे
कार्यक्रम असतो. किंवा एखादे वेळी ते अदलाबदलीच्या व्यापाराचा खेळ
ात व त्याच्याही शेवटी लैंगिक संयोगच असतो. नुसत्या घसमुसळ्या ( crude )
ाने त्यांचे समाधान होत नाही तर त्यात काही कल्पनाशक्ती व ( भावनात्मकता )
स ह्यांचा मिलाफ त्यांना पाहिजे असतो.

ह्या बालवयातील लैंगिकतेबद्दलचा एक महत्त्वाचा मुद्दा म्हणजे मोठ्या माणसांचा
षयीचा दृष्टिकोन. मी पूर्वी सांगितल्याप्रमाणे हा सर्व खेळ आक्षेपार्ह आहे असे
ाप समजत नाहीत. सर्वसाधारणपणे हे सर्व नैसर्गिकच आहे असे ते मानतात.
ार तर क्वचित ते ह्या सर्व प्रकाराची चेष्टा करून बोलतात व बालवयातील विनोदी
दुःखद घटनांबद्दलचा उल्लेख करतात. कधीही मुलांना रागावण्याचे किंवा त्यांचा
करण्याचे मोठ्या माणसांच्या मनात येत नाही. अर्थात मुलांनी त्यांचे हे खेळ
खेळता कामा नयेत व आपल्या वागणुकीत दक्षता ठेवून रानात जाऊन ते
वे असा मात्र दंडक असतो.

पण त्यांच्या ह्या प्रेमाच्या भानगडीत मुलांना पूर्ण स्वातंत्र्य असते व त्यांच्यात
माणसे मन घालीत नाहीत. आईबाप तर ह्यात पडत नाहीतच पण एखाद्या
ा पुरुषाला अथवा स्त्रीला मुलांच्यात काही विकृत कुतूहल उत्पन्न होते असेही बहुधा
घडत नाही, आणि ती मुलांच्या खेळात मिसळतानाही कधी दिसत नाहीत. मुलांच्या-
ोठ्या माणसांनी अत्याचार करणे ही गोष्ट त्या समाजात माहीतच नाही. आणि
कोणी मोठे माणूस लहान मुलांच्याशी लैंगिक दृष्ट्या सलगी करील तर त्याला
ास्पद व घृणास्पद मानले जाईल.

लहान मुलांच्या लैंगिक क्रीडांच्या बाबतीत एक गोष्ट महत्त्वाची आहे की,

भावाबहिणींच्या संबंधावर कडक निर्बंध आहेत; व हे पूर्वी सांगितलेलेच आहे. अगदी लहान वयात, जेव्हा मुलगी आपला पहिला गवताचा झगा घालू लागते, तेव्हापासून एकाच आईची मुलगा आणि मुलगी एकमेकांपासून वेगळी केली जातात. ह्याचे कारण असे की, त्यांच्यात कोणत्याही प्रकारचा निकट संबंध येण्यावर कडक समाजिक निर्बंध आहे. पूर्वी ती बहीणभाऊ चालू लागून स्वतंत्रपणे हिंडू लागली की ती वेगळ्या वेगळ्या गटात खेळतात. त्यानंतर ती कधीही मोकळेपणाने एकमेकांशी बोलत-वागत नाहीत, व एकाच्या प्रेमप्रकरणात दुसरा रस घेतो अशा प्रकारचा किंचितदेखील संशय येता कामा नये. जरी खेळ आणि बोलणे ह्या बाबतीत मुलांच्यात खूपच स्वातंत्र्य असते तरी एखादा लहान मुलगादेखील आपल्या बहिणींबद्दल बोलताना लिंगविषयक शब्द वापरणार नाही, तर मग त्यांच्यासमोर लैंगिक गोष्टी किंवा संदर्भ करणे अथवा थट्टा करणे दूरच राहिले. हा प्रकार सर्व जन्मभर चालतो व एखाद्या भावाजवळ बहिणीच्या किंवा बहिणीजवळ भावाच्या प्रेमसंबंधांबद्दल बोलणे हे त्याज्य समजले जाते. ह्या निर्बंधामुळे कौटुंबिक जीवन फार लवकर विस्कळित होते; कारण त्यातील मुलगे आणि मुली एकमेकांना टाळण्याकरता आईबापांचे घर सोडून दुसरीकडे राहायला जातात. हे सर्व असले तरी मेलानेशियन समाज व आपला समाज ह्यांच्यात ह्या वयाच्या म्हणजे बालवयाच्या नंतरच्या वर्षांच्या मुलांच्या लैंगिकतेमध्ये असलेला प्रचंड फरक सहज लक्षात येईल. आपल्या समाजातील सुशिक्षित वर्गात ह्या वयात लैंगिकतेमध्ये खंड पडतो व एक सुप्ततेचा किंवा विस्मरणाचा काल येतो ह्याच्या उलट मेलानेशिया-मध्ये प्रजोत्पादन व लैंगिकता ह्यातील कुतूहल अगदी लहान वयापासून जागृत होते व ही घटना आपल्याला पूर्णपणे अज्ञात अशी आहे. मेलानेशियात ह्या वयापासून पूर्ण वाढ होईपर्यंत लैंगिकता सावकाशपणे व एकसारखी वाढत जाते. भाऊबहिणींच्या-बद्दलचा एक निषेध वगळला तर समाज लहान वयातील लैंगिकतेला पूर्ण स्वातंत्र्य देऊन त्याचा विकास होण्यावर कोणतेही बंधन घालीत नाही.

♠ ♠

# प्रकरण ८ वे

# वयात येणे ( प्यूबर्टी )

मानववंश व हवामान ह्यांच्यावर अवलंबून नवव्या वर्षापासून पंधराव्या वर्षा-पर्यंतच्या कालात मूल वयात येते. वयात येण्याची ही घटना एखाद्या विशिष्ट क्षणाला घडून येते असे म्हणता येणार नाही. हा बदल बऱ्याच कालावधीत घडून येतो व त्यात जननेंद्रिये, अंतःस्रावग्रंथी व शरीरातील एकंदर अवयव ह्यांत फरक होत असतो. लैंगिक कुतूहल किंवा लैंगिक संयोग हे वयात आल्याखेरीज होऊच शकत नाहीत ( म्हणजे वयात येणे ही ह्या घटनांची आवश्यक पूर्वतयारी असते ) असे आपण समजू नये. वयात न आलेल्या मुलग्यांचे इंद्रिय पुष्कळदा ताठ होते, ते मुलीच्या इंद्रियात प्रवेश करू शकतात व लहान न आलेल्या मुलीही लैंगिक संयोग करू शकतात. पण ते काहीही असले तरी वयात येणे हा प्रत्येक व्यक्तीच्या लैंगिक इतिहासातला महत्त्वाचा टप्पा समजला पाहिजे.

ह्या वयात जीवनाच्या इतर अंगांशी लिंगाचा इतका निकट संबंध असतो की, ह्या प्रकरणांत लैंगिक व सामाजिक घटनांचा विचार एकत्रच केला जाईल, मागील प्रकरणातल्याप्रमाणे तो वेगळावेगळा केला जाणार नाही. ट्रोब्रियांड जमातीचे मेलाने-शियातील लोक व आपला समाज ह्यांची तुलना करताना एक गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे की, त्यांच्यात कोणत्याही प्रकारचे दीक्षा देण्याचे समारंभ केले जात नाहीत. ( ज्यू लोकांच्यात बार् मिझ्वा, हिंदूंच्यात मुंज व विशेषतः सोडमुंज इत्यादी विधी दीक्षा देण्यासारखेच असतात ). ह्यामुळे आपल्या विवेचनातला एक महत्त्वाचा मुद्दा जरी गळून गेला तरी पण आपल्याला मातृवंशीय व पितृवंशीय ह्यांच्यातील फरक अधीक स्पष्टपणे व तपशीलवार समजू लागेल. ह्याचे कारण असे की, इतर बहुतेक रानटी समाजात ह्या वयात करण्यात येत असलेल्या दीक्षासमारंभामुळे हा कालखंड झाकला किंवा बदलला जातो.

आपल्या समाजात मुलगा व मुलगी ह्यांच्याबद्दल वेगळे वेगळे बोलणे जरूर आहे; कारण ह्या वयात लैंगिक दृष्ट्या त्या दोघांची पूर्ण फारकत होते. पुरुष वयात आल्यानंतर त्याच्या मानसिक शक्ती पूर्ण विकसित होतात, त्याच्या शरीराची पूर्ण वाढ होते, व त्याच्यावर लैंगिक प्रौढत्वाच्या खुणा ( दाढी, मिशा वगैरे ) दिसू लागतात. त्याच्या ह्या पौरुषामुळे त्याचा सर्व जीवनाबद्दलचा दृष्टिकोन बदलतो. त्याचप्रमाणे लैंगिक बाबींबद्दलही त्याचे विचार बदलतात व कुटुंबातील त्याचे स्थान वेगळे होते. इथून

सुरुवात होऊन त्याचे आपली आई, बहीण व इतर स्त्री-नातेवाईक ह्यांच्याबद्दलची मनाची प्रवृत्ती ह्यांतही बराच फरक पडतो. आपल्या सुधारलेल्या समाजातील कुमारावस्थेतील मुलगा आईशी वागताना बराच गोंधळलेल्या मनःस्थितीत असतो, बहिणींशी वागताना तुच्छता व कित्येक वेळा फाजील उद्धटपणा दाखवतो; आणि आपल्या सोबत्यांशी वागताना आपल्या स्त्री-नातेवाइकांबद्दल त्याला जरा लाजच वाटते. आपण मारे डौलाने आपल्या शाळासोबत्यांबरोबर जात असताना आपली आई, बहीण, मावशी, आत्याबाई, काकी, किंवा चुलतबहीण भेटली व तिला अभिवादन करणे भाग पडले तर आपली लाजेने कशी स्थिती होत असे हे आपल्यापैकी कुणाला आठवत नसेल ? आपल्या मनात काही तरी कुकर्म केल्याचा विचार येई, जणू काय कुणी आपल्याला गुन्हा करताना पकडल्यासारखे वाटून आपल्याला लाजेने मान खाली घालावीशी वाटे. काही मुलगे जणू काही आपल्या ओळखीचे कुणी भेटलेच नाही असा आव आणीत, तर दुसरे काही धीट, पण लाजेने लाल होऊन पटकन स्त्री-नातेवाइकाला अभिवादन करून तो प्रकार विसरण्याचा प्रयत्न करीत. पण प्रत्येकाला कळून चुके की, त्याची मानहानी झाली व त्याच्या पौरुषत्वाला व स्वतंत्र वृत्तीला धक्का बसला. ह्या घटनेच्या मानसशास्त्रात न शिरता एवढेच म्हणता येईल की, समाजात वागताना सभ्य रीतीभातीचा भंग झाल्यावर आपल्याला जी लाज वाटेल किंवा मनाचा जो गोंधळ होईल तसलाच वरील प्रकार आहे.

हे नवीन उत्पन्न झालेले पौरुष मुलग्याच्या जगाबद्दलच्या सगळ्या कल्पनाच बदलून टाकते. तो आता स्वतःची मते बनवू लागतो ( वयात आल्यावर मिशा आणि मते फुटू लागतात असा एक जुना विनोद आहे ! ) त्याला व्यक्ती म्हणून काही वैशिष्ट्य प्राप्त होते, तो स्वतःबद्दल अभिमान बाळगू लागतो, मान अपमान समजू लागतो; आणि सत्ताधारी किंवा बुद्धिवादी नेत्यांशी योग्य प्रकारे वागतो. ह्याच वेळी बाप आणि मुलगा ह्यांच्यात एक नवे नाते निर्माण होते. पुन्हा एकवार जीवनाचा हिशेब केला जातो व बाप हा खरोखरीच आदर्श आहे की काय हे पडताळून पाहिले जाते. जर का बाप समाजात वागताना योग्य रीतभात न पाळणारा, व आपलेच घोडे पुढे दामटणारा, ढोंगी किंवा बुरसटलेल्या मनाचा असल्याचे मुलग्याला आढळून आले तर बापाबद्दलचा आदर कायमचा नाहीसा होतो, व समजा, जरी पुढील आयुष्यात बाप मुलगा पुन्हा एकमेकांच्या जवळ आले तरी मुलाच्या मनावर परिणाम करण्याची बापाची शक्ती नाहीशी होते. ह्याच्या उलट जर ह्या वयात मुलाने केलेल्या कडक परीक्षेत बाप उत्तीर्ण झाला तर मग जन्मभर तो मुलापुढे आदर्श म्हणून राहण्याची शक्यता बरीच असते. अर्थात बापही ह्या कालखंडात वाढत्या मुलाकडे परीक्षक ह्या दृष्टीने पाहात असतो व आपला भावी वारसा आपल्या मनातील कल्पना मूर्तस्वरूपात आणू शकेल की नाही हे ठरवीत असतो.

लैंगिक गोष्टींबद्दलची नवी दृष्टी, वयात आल्यावर स्पष्ट झालेली मते इत्यादी-

मुळे मुलग्याचा आपल्या बापाकडे पाहण्याचा दृष्टिकोन बदलतो असे नाही, तर आईकडे पाहण्याची दृष्टीही बदलते. सुशिक्षित मुलगा ह्या वयात आपले आईबाप व आपण ह्यांच्यातले शारिरिक नाते काय आहे हे पूर्णपणे ओळखतो. जर तो आईवर मनापासून प्रेम करीत असेल व तिला पूज्य मानीत असेल, ( आणि हीच परिस्थिती सर्वसाधारणपणे आपल्याला आढळते ), आणि आपला बापही त्याला आदर्श वाटत असेल तर त्या दोघांच्या लैंगिक संयोगापासून आपली उत्पत्ती झाली ही गोष्ट जरी प्रथम त्याला कशीशीच वाटली तरी थोड्याच वेळात ती तो मनातल्या मनात मान्य करतो. ह्याच्या उलट जर का तो बापाचा द्वेष करीत असेल व त्याच्याबद्दल त्याचे मत फारसे चांगले नसेल ( पुष्कळदा ही गोष्ट नकळत आतल्या आत होत असते ) तर मात्र आई त्यामुळे अपवित्र झाली असे वाटून आपल्या अतिशय आवडीच्या गोष्टी खराब झाल्या अशी त्याच्या मनाला रुखरुख लागते.

ह्या नव्या पौरुषामुळे मुलग्याचा मुख्यत्वे लैंगिक दृष्टिकोन बदलतो. नव्या ज्ञानाच्या ग्रहणाकरता त्याची मानसिक दृष्ट्या तयारी झालेली असते व शारीरिक दृष्ट्या ते प्रत्यक्षात आणण्याचीही त्याची तयारी असते. बहुधा ह्याच सुमारास त्याला लैंगिक संयोगाचे पहिले धडे मिळतात व कोणत्या ना कोणत्या स्वरूपात त्याचे लैंगिक जीवन सुरू होते. अर्थात नेहेमीच ते सरळ मार्गाने होते असे नव्हे; तर पुष्कळदा स्वसंभोग किंवा रात्री होणारे रेतस्खलन ह्यांचा त्याला अनुभव मिळतो. मुलग्यांच्या बाबतीत पुष्कळदा ह्या कालखंडात त्याच्या जीवनांत दोन मार्ग फुटण्याची अक्यता असते. एक तर आपल्या तीव्र लैंगिक प्रवृत्तींमुळे मोहाला बळी पडून नीतिमत्तेबद्दल फारशी फिकीर न बाळगल्यामुळे, त्यात तो पुरता बुडून जातो किंवा इतर गोष्टींत मन रमल्यामुळे, व नीतितत्त्वांचा मनावर जोराचा दाब पडल्यामुळे लैंगिकता कह्यात ठेवू शकतो, किंवा पूर्णपणे दाबूनही टाकू शकतो. तो जोपर्यंत पावित्र्याचा आदर्श आपल्यापुढे ठेवतो आणि त्याकरता धडपड करतो तोपर्यंत लैंगिक प्रेरणा वरच्या पातळीवर नेणे त्याला शक्य होते. ह्यात अर्थातच पडणारा मोह, त्याच्या भोवतालचे सामाजिक वातावरण व त्याचे जीवन कशा प्रकारचे आहे त्यावर अवलंबून असते. एखाद्या समाजाची मानववंशीय लक्षणे, त्याची नीतितत्त्वे आणि त्याची सांस्कृतिक मूल्ये ह्यामुळे यूरोपीय सुधारलेल्या मानवसमूहातही बरेच फरक दिसून येतात. काही देशांतील काही वर्गात मुलगा लैंगिकतेच्या आकर्षणाला बळी पडणे ही अगदी नित्याची गोष्ट होते. इतरांच्यात तो आपल्या दैवाची परीक्षा पाहू शकतो. त्याहीपेक्षा इतरांत समाज नीतिमत्तेचे इतके कडक नियम करतो की त्याला जबाबदारीने वागावे लागते.

भिन्न लिंगी व्यक्तींशी त्याचे संबंध प्रथम प्रथम आई आणि बहिणी यांच्याशी असणाऱ्या संबंधासारखेच असतात. म्हणजे थोडी गोंधळलेली मनःस्थिती, पण थोडे आकर्षण व थोडा विरोध. जी स्त्री त्याच्यावर विशेष खोल परिणाम करू शकेल असे

त्याला वाटते तिच्याबद्दल त्याच्या मनात जराशी भीतीच उत्पन्न होते व तिच्याबद्दल संशयही वाटतो. त्याचे नवजागृत पौरुष व स्वातंत्र्य तिच्यामुळे धोक्यात घेईल असे त्याला वाटते.

ह्याच कालखंडाच्या शेवटी, पूर्ण वयात आल्यानंतर लैंगिकता व मायाळूपणा ही दोन्ही मनाचा ताबा घेतात व लहानपणी आईने आपल्यावर केलेले प्रेम व लैंगिकता ह्यांचे मनात मिश्रण होते. कल्पनाशक्ती आणि स्वप्नातल्या अद्भुत गोष्टी ह्यामुळे मनात भयंकर गोंधळ निर्माण होऊन मुलग्याच्या मनावर विलक्षण परिणाम होतो.[1]

हे सर्व वरच्या व सांपत्तिक स्थिती बऱ्यापैकी असणाऱ्या वर्गातील मुलग्यांना लागू असते. जर आपण त्यांची शेतकरी-कामकरी वर्गातील मुलग्यांशी तुलना केली तर असे आढळून येते की, त्यांच्यात मूलभूत स्वरूपाचे भेद नसतात. फक्त व्यक्ती-व्यक्तीत अधीक फरक दिसून येतात व सर्वसाधारण चित्र वस्तुस्थितीला अधीक धरून असते.

अशा रीतीने आईबद्दल व बहिणीबद्दल जरासा अधिक कृत्रिमपणा ओबडधोबड शेतकरी मुलग्याच्या बाबतीत दिसून येतो. बापाबरोबरची भांडणे जास्त जोराची होतात कारण मुलग्याला आपली शक्ती कळू लागलेली असते. आपण पुढे ह्या मिळकतीचा वारस होणार ही जाणीव झालेली असते, आपल्या ताब्यात जास्तजास्त वस्तू आणण्याची इच्छा प्रबल होते व एकंदरीत सर्व गोष्टींवर आपले वर्चस्व असावे असे वाटू लागलेले असते. पुष्कळदा वर्चस्वाकरता एक प्रकारचे युद्धच बाप आणि मुलगा ह्यांच्यात सुरू होते. लैंगिक बाबतीत अशा प्रकारची आणीबाणीची वेळ अथवा पेचप्रसंग येत नाही, आणि त्यामुळे आई, बाप व मुलगा ह्यांच्यातील संबंध दुरावत नाहीत. पण सर्वसाधारणपणे असे म्हणता येईल की, दोन्ही वर्गातील मुलग्यांत ह्या कालखंडांत फारसा फरक पडत नाही.

सुशिक्षित वर्गातील मुलगी आपल्या पहिल्या मासिक पाळीच्या वेळी एका आणीबाणीच्या प्रसंगातून जाते. पाळीमुळे जरी स्वातंत्र्य थोडे कमी होते व जीवनात गुंतागुंत उत्पन्न होते तरी त्यामुळे एक गुप्त आकर्षण उत्पन्न होते व ह्या घटनेची उत्सुकतेने वाट पाहिली जाते. पण वयात येण्यामुळे मुलीच्या सामाजिक जीवनावर कमी परिणाम होतो. ती घरी राहून सुद्धा आपले शिक्षण चालू ठेवते किंवा एखाद्या वसतिगृह असलेल्या शाळेत पूर्वीप्रमाणेच राहते. पण तिचे सर्व उद्योग व प्रशिक्षण नेहमीच्या कौटुंबिक जीवनाशी तिने समरस व्हावे असेच असते. ( अर्थात इथे आधुनिक उच्च धंद्यात पडणाऱ्या मुलीचा विचार केलेला नाही. ) तिचा जीवनातील उद्देश विवाह करणे हाच असतो. कुटुंबातील जीवनातले ह्या कालखंडातले एक महत्त्वाचे अंग म्हणजे आई व मुलगी ह्यांच्यातील स्पर्धा. ही स्पर्धा अगदी उघड स्वरूपात कितीदा दिसून येते हे सांगणे कठीण आहे.[2] पण तीमुळे सर्वसाधारण कुटुंबाच्या जीवनात एक नवीन विकृत घटक निर्माण होतो ह्यात संशय नाही. ह्याच वेळी

पूर्वी कधी नसलेले बाप आणि मुलगी ह्यांच्यातील विशेष आकर्षण वाढू लागते व त्याचा संबंध पुष्कळदा आई–मुलगी ह्यांच्या स्पर्धेशी असतो. ह्यालाच मनोविश्लेषणात इलेक्ट्रा मनोगंड म्हणतात व तो ईडिपस मनोगंडापासून अगदी निराळा असतो. स्त्रियांमधील जास्त प्रमाणात होणाऱ्या अनिर्बंध भावनोद्रेकाचा ( हिस्टेरिया ) विचार येथे आपण बाजूला ठेवू. कारण आपल्याला सर्वसाधारण प्रमाण स्त्रीचाच विचार करावयाचा आहे. पाश्चिमात्य संस्कृतीत इलेक्ट्रा मनोगंड फार वेळा आढळून येत नाही. त्याला फारसे सामाजिक महत्त्वही दिले जात नाही व त्याची छापही फारशी दिसून येत नाही पण ह्याउलट त्याचे वर्चस्व अधिक वेळा दिसून येते आणि बाप मुलगी ह्यांचा अनैतिक संबंध मुलगा–आई ह्या संबंधापेक्षा खूपच अधिक वेळा आढळून येतो व त्याला शरीरशास्त्राची व समाजशास्त्राची अशी दोन्ही प्रकारची कारणे असतात. पण ज्या अर्थी आपल्याला ह्या विवेचनात ह्या मनोगंडाच्या सामाजिक व सांस्कृतिक बाजूंचाच मुख्य विचार करावयाचा आहे त्या अर्थी इलेक्ट्रा व ईडिपस मनोगंडांच्या तुलनेच्या तपशिलात जेथे जाण्याची जरूर नाही. त्याचप्रमाणे समाजातील वरचे वर्ग,– जेथे मानसिक प्रवृत्ती अधिक जोराने दाबल्या जातात, जेथे अनिर्बंध भावनोद्रेकाचे प्रमाण जास्त असते पण प्रत्यक्षात अनैतिक संबंध कमी असतात,—आणि खालचे वर्ग— जेथे मुलीचे लैंगिक कुतूहल जरा आधी जागृत होते पण अधिक वेळा त्याचे समाधानही प्रमाणित पद्धतीने होते, जेथे तिच्यात अनिर्बंध भावनोद्रेक होण्याची शक्यता कमी असते पण तिच्या बापाकडून जुलूम होण्याची शक्यता अधिक असते,[३] – ह्यांची तुलना करण्याचा प्रयत्नही येथे करण्याची जरूरी नाही.

आता आपण ट्रोब्रियांड बेटांकडे वळू. त्यांच्यामध्ये मुलगे आणि मुली आपल्या मानाने लवकर वयात येतात; पण वयात येण्यापूर्वीच त्यांचे लैंगिक कार्यक्रम आधीच सुरू झालेले असतात. काही रानटी समाजात वयात येण्याच्या वेळी दीक्षा देण्याचा समारंभ केला जातो व व्यक्तीच्या सामाजिक आयुष्यात त्यामुळे एकदम बदल होतो, तसा प्रकार ट्रोब्रियांड जमातीत नसतो. अगदी सावकाश मुलगा ज्या प्रमाणात प्रौढ होत जातो तसतसा तो आर्थिक बाबीत व जमातीच्या कामात जास्त गुंतू लागतो. लोकही त्याला तरुण पुरुष मानू लागतात आणि वयात आल्यावर तो जमातीचा पूर्ण सभासद बनतो. आता त्याची विवाह करण्याची इच्छा असते आणि आपली कर्तव्ये व आपले हक्क ह्यांचे पालन करण्याची त्याची तयारी असते. मुलीला वयात आल्यावर कुटुंबाकडून जास्त स्वातंत्र्य आणि स्वायत्तता मिळतात. अर्थात तिला कामही जास्त करावे लागते, ती स्वतःची करमणूक अधिक उत्साहाने करते व पूर्ण वाढ झालेल्या स्त्रीची सर्व कर्तव्ये-उत्सवातील, आर्थिक आणि कायदेशीर– ती पाळू लागते.

पण सर्वांत महत्त्वाचा बदल, आणि जो आपल्याला इथे लक्षात घेणे जरूर आहे तो म्हणजे ज्या वेळी कुमारावस्थेतील मुलगे व मुली कुटुंबाचे नेहमीचे घटक राहात नाहीत त्या वेळी होणारे कुटुंबाचे आंशिक विभंजन होय. भाऊ आणि बहिणी ह्यांच्यामधील

निर्बंध ह्या कालखंडाच्या आधीच सुरू झालेले असतात पण आता त्यांचे पालन अत्यंत कसोशीने केले जाते, कारण दोघांपैकी एक लैंगिक खेळात गुंतलेले असताना त्याचा कधीही दुसऱ्याशी संबंध येता कामा नये. हे करण्याकरता **बुकुमाटूला** ह्या खास संस्थेचा उपयोग केला जातो. कुमारावस्थेतील मुलगे आणि मुली राहण्याच्या जागांना हे नाव दिले जाते. वयात येणारा प्रत्येक मुलगा अशा एखाद्या घरात राहायला जातो. हे घर जरा मोठ्या वयाच्या एखाद्या तरुणाच्या अगर विधुराच्या मालकीचे असते व त्यात सुमारे तीन ते सहा तरुण मुलगे व त्यांच्या प्रियकरणी[४] राहू लागतात. अशा रीतीने आईबापांच्या घरातून कुमारावस्थेतील मुलगे पूर्णपणे निघून जातात. तरी पण ते लग्न होईपर्यंत भोजनाकरता घरी येत राहातात व काही थोड्या प्रमाणात घराकरता कामही करतात. घरातली मुलगी ज्या एखाद्या रात्री ती ह्या अगर त्या बुकुमातुलामध्ये लैंगिक क्रीडेत गुंतलेली नसेल त्या वेळी झोपायला घरी येते.

मेलानेशियन मुलगा किंवा मुलगी ह्यांचा ह्या महत्त्वाच्या कालखंडात म्हणजे वयात येण्याच्या सुमारास आई, बाप, बहीण किंवा भाऊ ह्यांच्याबद्दलच्या भावना काय असतात ? यूरोपियन मुलाप्रमाणे मेलानेशियन समाजातही ह्यापूर्वीच्या कालखंडात ज्या भावना हळूहळू उत्पन्न होत होत्या त्यांचेच दृढीकरण ह्या कालखंडात होते. आईच्या अंगावरून मूल तोडले जाते एवढेच नव्हे तर सर्वच दृष्टींनी ते आई पासून दूर जाते; तरीही पुढील सर्व आयुष्यात आई हाच सर्व नात्याच्या संबंधी मुलग्याचा केंद्रबिंदू राहातो. मुलग्याचा समाजातील दर्जा, त्याची कर्तव्ये व त्याचे हक्क हे सर्व आई आणि तिचे नातेवाईक यांच्या संदर्भातच ठरले जातात. आईच्या उदरनिर्वाहाची व्यवस्था करायला दुसरे कोणी नसले तर त्यालाच ती जबाबदारी उचलावी लागते, आणि तिचे घर हे त्याचे दुसरे घरच बनते. सामाजिक चालीरीतींनी टाकलेली जबाबदारी खऱ्या प्रेमावर व मायेवर आधारलेली असते आणि जेव्हा एखादा पुरुष मरतो किंवा अपघातात सापडतो तेव्हा त्याच्याकरता सर्वांत अधिक शोक आईला होतो व तिचे रडणे विव्हळणे सर्वांत शेवटी संपते. तरीही आपल्या समाजात माता आणि पुत्र यांच्यात जी वैयक्तिक मैत्री, जो परस्पर भरवसा, आणि जे निकट संबंध असतात तसे मेलानेशियन समाजात नसतात. आईपासून विभक्त होण्याची क्रिया आपण पूर्वी पाहिल्याप्रमाणे प्रत्येक कालखंडात अधिक सुलभतेने आणि आपल्यापेक्षा अधिक पक्क्या रीतीने होत असते. त्यामुळे त्यामध्ये मनाला बसणारे धक्के व ताण कमी प्रमाणात होतात आणि अखेरचा परिणाम परिपूर्ण व एकमेकांशी मिळाफ टिकवणारा असा होतो.

ह्या कालात बापाचे महत्त्व जरासे कमी होते. जो मुलगा लहानपणी बराच स्वतंत्र होता आणि एका छोट्या प्रजासत्ताक समूहाचा सभासद होता तो आता एका अर्थाने बुकुमाटूलामध्ये गेल्यामुळे जास्त स्वातंत्र्य भोगू लागतो तर दुसऱ्या बाजूने त्याला त्याच्या मामा ( कुडा ) करता निरनिराळी कामे करावी लागतात. त्याला बापाकडे लक्ष द्यायला फारसा वेळही मिळत नाही व त्याच्याबद्दल विशेष आस्थाही

वाटत नाही. ह्या नंतरच्या काळात, विशेषतः मामाबरोबर मतभेद झाले किंवा त्याच्याशी नीट पटेनासे झाले तर मग त्याचे मन पुन्हा बापाकडे वळते व त्यांची जन्माची मैत्री घट्ट होते. पण ह्या कालखंडात त्याला आपली कर्तव्ये, जमातीच्या परंपरा, त्यांची जादू, त्यांचे हस्तव्यवसाय व कला ही सर्व शिकायची असतात, आणि त्याचा मामा हाच त्याचा मार्गदर्शक व गुरू असल्यामुळे त्यांचा एकमेकांशी दृढ संबंध येतो व ह्याच कालात त्यांचे परस्पर नाते सर्वांत अधीक चांगले असते.[५]

मलोनेशिन मुलग्याचे आपल्या आईबापांशी नाते व आपल्या समाजातील सुशिक्षित मुलग्याचे तेच नाते ह्यात आणखी एक फरक असतो. आपल्या वयात आलेल्या तरुण मुलग्याच्या पुढे, त्याला समाजात प्रौढ म्हणून प्रवेश मिळाल्यामुळे, भविष्यकाळचे एक भडक चित्र उभे राहते, आणि आईबापांविषयी वाटणाऱ्या आपुलकीवर एक चमत्कारिक छाया पडल्यासारखी होते. त्याची स्वतःची लैंगिक प्रवृत्ती जागृत झाल्यामुळे त्याला आपल्या जन्मदात्यांबद्दल एक प्रकारचा संकोच वाटू लागतो व त्याच्या मनात खोल कोठे तरी गोंधळाची परिस्थिती उत्पन्न होते. मातृसत्ताक समाजात हा प्रकार पूर्णपणे अज्ञात असतो. अगदी लहानपणचा "अश्लील" कालखंड नसल्यामुळे व आईबापांच्या सत्तेखाली वागण्याचा प्रश्नच नसल्यामुळे आपल्या समाजातील वर वर्णन केलेली मनःस्थिती उत्पन्न होत नाही. अगदी लहान वयातच लैंगिक विचार मनात उत्पन्न होताच त्यांना पूर्ण स्वातंत्र्य मिळणे; तसेच आपल्या मुलांच्या लैंगिक विचारांबद्दल व कृतींबद्दल आईबापांनी घेतलेली सदिच्छेची भूमिका; आईचे मुलाच्या भावनिक विश्वातून हळूहळू पण निश्चितपणे दूर होणे; बापाने स्मित करून मुलाच्या लैंगिकतेला प्रोत्साहन देणे; ह्या सर्वांचा परिणाम असा होतो की, वयात येण्याच्या घटनेमुळे मुलगा व आईबाप ह्यांच्यामधील संबंधात एकदम कोणत्याही प्रकारचा प्रत्यक्ष बदल होत नाही.

वयात आल्यामुळे जे एक नाते पूर्णपणे बदलते ते म्हणजे भाऊ-बहीण ह्यांचे. लैंगिकता जितकी वाढेल तितके ते अधिक अधिक बदलते. हा जो सामाजिक निर्बंध आहे तो त्यांच्यामध्ये कोणत्याही तऱ्हेचा स्वतंत्र संबंध उत्पन्न होऊ देत नाही— अर्थात त्या दोघांमध्ये लैंगिक आकर्षणाचा प्रश्नच उद्भवत नाही, आणि त्यांचे लैंगिक दृष्टिकोनही त्यामुळे वेगळे होतात. कारण हे आपण प्रथमच लक्षात ठेवले पाहिजे की, हा निषेध म्हणजे लैंगिकतेच्या भोवती काढलेली अनुल्लंघ्य रेषा आहे, व हा त्या समाजाचा कडक नैतिक नियम आहे. शिवाय हे जे भाऊ-बहीण ह्यांचे वेगळेपण लहान वयापासूनच सुरू होते व जे जन्मभर कायम राहते ते त्यांच्या कुलातील ( क्लॅन ) सर्व स्त्रियांना लागू होते. म्हणजे मुलग्याच्या दृष्टीने पाहिले तर लैंगिक बाबतीत तो समाज दोन उपविभागांत गेलेला असतो. त्याच्या स्वतःच्या कुलातील स्त्रिया ह्या ( Moieties ) त्याला सर्वस्वी वर्ज्य असतात; दुसरा उपविभाग म्हणजे जमातीची उरलेली तीन कुले. ह्यातील स्त्रियांशी कायद्याने त्याचा लैंगिक संयोग होऊ शकतो.

आता आपण मेलानेशिया व यूरोप ह्यांमधील भाऊ-बहिणींच्या संबंधाची तुलना करू या. आपल्यामध्ये लहानपणची मैत्री हळूहळू कमी होत जाते आणि भाऊ-बहीण ह्यांचे संबंध थोडे दूरावतात व सामाजिक, मानसशास्त्रीय व शरीरशास्त्रीय कारणांमुळे बहीण भावापासून दूर होते. मेलानेशियात बहीणभाऊ एकत्र खेळायच्या किंवा एकमेकांना काही गुपिते सांगायच्या वयाला आल्याबरोबर त्यांच्यावरचा सामाजिक कडक निर्बंध अमलात येतो. मग भावाच्या दृष्टीने बहीण ही एक असभ्य व्यक्ती बनते, नेहमी जवळ पण कधीही निकटसंबंधी नाही, एका अदृश्य पण शक्तिमान अशा भिंतीने आपल्यापासून दूर गेलेली अशी होते. हा निषेध जरी पारंपरिक आज्ञेसारखा असला तरी त्याला कडक वैयक्तिक व नैतिक स्वरूप प्राप्त होते. लैंगिक आकाशाचा एक कायम झाकलेला भाग म्हणजे बहीण लहानपणच्या आठवणींमुळे मनात जर काही भगिनी-प्रेमाची आच उत्पन्न झाली तर ती क्रूरपणे मारून टाकली जाते. जसे आपण आपल्या समाजात मुलांच्या काही नैसर्गिक प्रेरणा दाबून टाकतो तसे— आणि बहीण ही "अश्लील" किंवा "अयोग्य" ह्या सदरात मोडते. आपण जसे मुलांना अमुक गोष्ट करू नको, तमुक गोष्ट वाईट आहे, असे सांगतो त्याचप्रमाणे तिच्याबद्दलचे विचार, कुतूहल, भावना, ह्या मारल्या जातात. ह्यानंतर मुलग्याला जसजसा लैंगिक अनुभव मिळत जातो तसतशी त्यांच्यातील भिंत जास्तजास्त जाड होत जाते. जरी ती दोघे एकमेकांना एकसारखी टाळीत असतात, तरी तो तिच्या घराचा अन्नदाता असल्यामुळे त्यांना कायम एकमेकांबद्दल विचार करणे व एकमेकांकडे लक्ष देणे भागच पडते. अशा प्रकारचा कृत्रिम व लहानपणापासून केलेला विभक्तपणा मनावर परिणाम केल्याशिवाय राहणे अशक्य आहे. फ्रॉइडच्या मनोविश्लेषणाचे अभ्यासक ह्या परिणामांबद्दलचे भविष्य सहज वर्तवू शकतील.

वरील सर्व विवेचनात मी मुख्यत्वे मुलग्याच्या दृष्टिकोनातून बोललो आहे. जेव्हा मेलानेशियातील मुलगी वयात येते तेव्हा तिची कुटुंबाबद्दलची मनोवृत्ती कशी असते ? अगदी सर्वसाधारणपणे बोलावयाचे तर असे म्हणता येईल की, यूरोपीय समाजातील मुलग्यांमध्ये व मेलानेशियन समाजातील मुलग्यांमध्ये जेवढा फरक वयात येण्याच्या ह्या कालखंडात दिसून येतो तेवढा ह्या दोन समाजातील वयात येणाऱ्या मुलींच्यात दिसून येत नाही. केवळ बहीण भावांच्या वरील निर्बंधामुळे ट्रोब्रियांडच्या मातृसत्ताक समाजातील मुलीच्या मनावर फार मोठा परिणाम होते नाही. कारण एका बाजूला तिच्या भावाला तिच्या लैंगिक जीवनात रस घेणे अथवा तिच्या विवाहाकरता खटपट करणे अशक्य होते तर दुसऱ्या बाजूला तिच्या मामालाही तिच्या विवाहाबद्दल काही योजना आखता येत नाही. ह्याचा त्या समाजाच्या दृष्टीने असा चमत्कारिक परिणाम होतो की, तिचा पिता तिच्या विवाहाच्या बाबतीत तिचा पालक बनतो. म्हणजे जवळजवळ आपल्या समाजात मुलगी आणि बाप यांचा ज्या प्रकारचा संबंध असतो तसाच मेलानेशियन

समाजातही असतो. आपल्या समाजात मुलगी आणि बाप ह्यांच्यात चकमक उडण्याचे प्रसंग फारच क्वचित येतात व ट्रोब्रियांड जमातीतील बाप मुलीचे संबंध पुष्कळसे आपल्याकडल्यासारखेच असतात. मात्र दुसऱ्या एका दृष्टीने ट्रोब्रियांड बाप व वयात आलेली त्याची मुलगी— जी त्याची नातेवाईक समजली जात नाही— ह्यांच्यात मोह पडण्याचे प्रसंग पुष्कळदा येण्याची शक्यता असते. त्यांच्या समाजात मुलगी आणि बाप ह्यांच्यातील अनैतिक संबंध जरी विवाह बाह्यतेच्या ( एक्झॉगमी ) कायद्याने निषिद्ध मानलेला नसला तरी तो अत्यंत गर्ह्य समजला जातो. एवढेच की, त्याला सुव्हासोव्हा म्हणजे विवाबाह्यतेचा भंग असे नाव दिले जात नाही. ह्या निषेधाचे कारण असे दिले जाते की, ज्या स्त्रीशी आपण लैंगिक संयोग करतो तिच्या मुलीशी त्याच प्रकारचा संयोग करणे चूक आहे. पुढे आपल्याला दिसून येईल, व त्याबद्दल आश्चर्य वाटण्याचेही कारण नाही की, जेव्हा आपण कुटुंबातील निरनिराळ्या घटकांच्या एकमेकांविषयीच्या दृष्टिकोनाचे जास्त काळजीपूर्वक निरीक्षण करतो, तेव्हा बाप-मुलगी ह्यांच्यातील अनैतिक संबंध खरोखर घडून येतो, पण अर्थातच ती अगदी नेहमी होणारी गोष्ट आहे असे मात्र नव्हे, व लोककथांतूनही तिला कोठे संदर्भ दिलेला नाही.

मुलगी व आई ह्यांच्यातील संबंध यूरोपातल्या प्रमाणेच असतात असे म्हणता येईल, पण ते यूरोपपेक्षा अधिक नैसर्गिक असतात, एवढेच. त्यात एक मात्र फरक दिसून येतो. वयात आलेली मुलगी आईबापांच्या घरातून बाहेर जाते व तिचे बाहेर अनेक लैंगिक संबंध असतात. त्यामुळे आई व मुलगी ह्यांच्यात हेवा किंवा स्पर्धा फारशी दिसून येत नाही; तरीही बाप-मुलगी ह्यांचे अनैतिक संबंध आजिबात टाळले जात नाहीत. म्हणजे एक तिच्या भावाबद्दलचा तिचा दृष्टिकोण सोडला तर मेलानेशियातील मुलगी व यूरोपातील मुलगी ह्यांच्या भावना फारशा वेगळ्या नसतात असे आपल्याला म्हणता येईल.

♣ ♣

प्रकरण ९ वे

# मातेच्या हक्कांचा मनोगंड

आतापर्यंत आपण यूरोपीय व मेलानेशियन ह्या दोन संस्कृतींची तुलना केली आणि पाहिले की, ज्या नैसर्गिक शक्तींनी मनुष्याचा स्वभाव बनवला जातो त्या वेगळ्या असल्यामुळे त्या दोन संस्कृतींत खोल जाणारे फरक दिसून येतात. जरी दोन्ही संस्कृतींत लैंगिक स्वातंत्र्याला थोडीबहुत जागा दिलेली असते, तसेच जन्मजात लैंगिक प्रेरणेवर काही बंधने असतात व काही बाबतींत तिला प्रतिबंध केला जातो, तरी दोन्ही संस्कृतींतील निषेध व विशिष्ट मर्यादेपर्यंतचे स्वातंत्र्य ह्यात खूपच फरक असतो. तसेच कुटुंबातील सत्तास्थाने दोन्ही समाजांत अगदी वेगळीवेगळी असतात, व त्यांच्याशीच संबंध असलेली नाते ओळखण्याची पद्धतीही अगदी निराळी असते. आपण आत्तापर्यंत दोन्ही समाजांतील निरनिराळ्या कायद्यांखाली व पारंपरिक नियमांखाली वाटणाऱ्या मुलग्यांचा व मुलींचा विचार केला. आपल्याला असे आढळून आले की, ह्या दोन समाजांतील परिस्थिती अगदी भिन्न आहे. कारण जवळजवळ प्रत्येक गोष्टीत जीव-शास्त्रीय प्रवृत्ती व सामाजिक नियमन ही कधीकधी एकमेकांशी जुळतात तर कधीकधी त्यांच्यात विरोध होतो; कधीकधी थोडा वेळ व्यक्तीला अतिशय सुख मिळते तर कधीकधी असमतोल उत्पन्न होतो व पुढे त्यापासून दुःखद परिणाम होण्याची शक्यता असते. मुलांच्या जीवनाच्या अखेरच्या कालखंडात म्हणजे ती वयात आल्यानंतर ट्रोब्रियांड समाजात व आपल्याकडे आई, बाप, भाऊ, बहीण व त्यांच्याकडे मामा ह्या नातेवाइकांबद्दलच्या भावना काही विशिष्ट साच्यात बसतात, व हा साचा प्रत्येक समाजात वेगळा असतो. मनोविश्लेषणशास्त्राच्या भाषेत ह्याला "कुटुंबाचा मनोगंड" (फॅमिली कॉम्प्लेक्स) किंवा "केंद्रीय मनोगंड" (न्यूक्लिअर कॉम्प्लेक्स) असे म्हणतात.

आता ह्या दोन्ही मनोगंडांची वैशिष्ट्ये मी येथे सांगू इच्छितो. आपल्या पितृसत्ताक समाजात अगदी लहानपणी मुलग्याच्या मनात बालपणाच्या पहिल्या व दुसऱ्या अवस्थांच्यामध्ये पण कधीकधी दुसऱ्या अवस्थेत ईडिपस मनोगंड तयार होतो. ह्याचा अर्थ असा की, मुलगा पाच किंवा सहा वर्षांचा असताना त्याच्या भावना पूर्णपणे बनलेल्या असतात, पण त्यांना अगदी अखेरचे रूप प्राप्त झालेले नसते. त्या भावनांत द्वेषाचा काही भाग, तर दाबून टाकलेल्या प्रवृत्तींचा काही भाग असे मिश्रण असते. ह्या बाबतीत आम्हा मानववंशशास्त्रज्ञांचे व मनोविश्लेषणज्ञांचे निष्कर्ष ह्यात फारसा फरक नसतो.[१]

ह्या कालखंडात मातृसत्ताक समाजात जरी मुलाच्या आई व बाप ह्यांच्याविषयींच्या भावना बऱ्याच प्रमाणात पक्क्या झालेल्या असतात तरी त्यांत काहीही दाबून टाकलेले नसते, काहीही ऋण ( निगेटिव्ह ) नसते व निष्फळ झालेल्या इच्छा नसतात. हा फरक कशामुळे उत्पन्न होतो ? आपण मागेच पाहिले आहे की, ट्रोब्रियांड लोकांच्या मातृसत्तेची व्यवस्था शारीरशास्त्रीय विकासाशी जुळणारी असते. ह्याच्या उलट आपल्या पितृप्रधान संस्कृतीत पुष्कळशा नैसर्गिक प्रवृत्ती आणि कल दाबून किंवा मारून टाकले जातात. ह्याच्या आणखी तपशिलात शिरले तर आई-मुलगा ह्यातील अती तीव्र भावना, तिला घट्ट मिठी मारून बिलगावे ही इच्छा पितृप्रधान समाजात ह्या नाही त्या पद्धतीने मोडून काढली जाते, निदान तीत व्यत्यय आणला जातो. आपल्या समाजातील मुलांच्या लैंगिकतेवर घातलेले निर्बंध, विशेषतः खालच्या वर्गातील बापाचे पशुतुल्य वर्तन; आपल्या नवऱ्याला नाखूष करण्याबद्दलची बायकोची भीती— ह्या सर्व कारणांनी आई, बाप व मुले ही एकमेकांपासून दुरावतात. जरी मूल आणि बाप ह्यांच्यातील आईचे लक्ष वेधण्याची स्पर्धा अगदी कमी असली तरीही दुसऱ्या कालखंडात बाप आणि मूल ह्यांच्यामध्ये सामाजिक हितसंबंधात वितुष्ट येतेच. आई-बापांच्या स्वातंत्र्यावर मुलाच्या अस्तित्वामुळे मर्यादा पडतात, त्यांची अडचण होते, आपण आता वयाने वाढलो, म्हणजे हळूहळू म्हातारे झालो ह्याची आठवण होते, आणि जर मुलगा असेल तर भविष्यकालातली बापमुलगा ह्यांतील सामाजिक स्पर्धा होण्याची शक्यता मनात येते. म्हणजे भोगासक्तीच्या दृष्टीने ( सेन्शुअस ) होणाऱ्या स्पर्धेशिवाय बाप व मूल ह्यांच्यात सामाजिक संघर्षही होऊ शकतो. येथे मी मुलगा हा शब्द न वापरता मूल हा शब्द वापरला आहे; कारण आमच्या संशोधनाच्या निष्कर्षाप्रमाणे ह्या वयाच्या मुलाला लिंगाच्या ह्या गोष्टींवर फारसा परिणाम होत नाही किंवा बाप-मुलगी ह्यांच्यातील निकट संबंध ह्या वयाला स्पष्ट झालेले नसतात.

ट्रोब्रियांड मातृप्रधान समाजात ह्या सर्व शक्ती आणि परिणाम अजिबात नसतात. प्रथम म्हणजे लैंगिकता किंवा भोगासक्ती यांचा निषेध केला जात नाही, ( अर्थात् ह्याचा मातृप्रधान समाजव्यवस्थेशी प्रत्यक्ष संबंध नाही हे उघड आहे. ) आणि लहान मुलांच्या लैंगिकतेच्या बद्दलही समाजात भय किंवा किळस ह्यांचे प्रदर्शन केले जात नाही. लाडाने व प्रेमाने मूल आईला बिलगते त्याबद्दल कोणी आश्चर्य व्यक्त करीत नाही, त्याचा नैसर्गिक काल संपला व मुलाला इतर शारीरिक गरजा भासू लागल्या म्हणजे ते आपोआपच निच्यापासून दूर होते. बालवयाच्या पहिल्या दोन कालखंडांत बापाची प्रवृत्ती अशी असते की, तो एक मित्र व साहाय्यक वाटावा. आपल्या समाजात लहान मुलांच्या खोलीत अजिबात न जाता बाप आपले प्रेम व्यक्त करतो तर ट्रोब्रियांड बाप प्रथम मुलांची दाई व नंतर त्यांचा खेळगडी बनतो.

पूर्व लैंगिक जीवनाच्या विकासामध्येही यूरोप व मेलानेशिया ह्यांच्यात फरक आहे. मुलांच्या खोलीत ( दाईकडून अथवा आईकडून ) दाबून टाकलेल्या प्रवृत्ती—

विशेषत: वरच्या वर्गात— गुप्तपणे मलमूत्र विसर्जन व त्यांची इंद्रिये ह्यांबद्दलची तथाकथित अश्लील जिज्ञासा प्रदीप्त करतात. रानटी लोकांच्यात अशा प्रकारचा कालखंड आढळून येत नाही. शैशवामधील जननेंद्रियांचे ज्ञान होण्यापूर्वीच असणाऱ्या असभ्यतेच्या कल्पनांमुळे श्लील—अश्लील, शुद्ध-अशुद्ध, आणि अयोग्यतेच्या कल्पनांमुळे आईबापांना कळू न देण्याचा एक कप्पा विचारात तयार होतो आणि त्यामुळे आईशी वागताना मनात जो निर्बंध असतो त्याला अधिकच जोर प्राप्त होतो. ह्याचा परिणाम म्हणजे योग्य वेळेच्या आधीच मुलग्याला तिच्या बिछान्यात निजण्याची बंदी केली जाते किंवा मिठी मारून बिलगण्यावरही निर्बंध घातला जातो.

तेव्हा ह्या बाबतीतही आपल्या समाजातील गुंतागुंतीची परिस्थिती ट्रोब्रियांड समाजातील मुलामध्ये दिसून येत नाही. ह्याच्या पुढच्या कालखंडातील लैंगिकतेच्या विकासाच्या बाबतीतही हीच परिस्थिती आढळते. यूरोपात ह्या कालखंडात एक सुप्त अवस्था थोड्याफार प्रमाणात स्पष्टपणे दिसून येते आणि फ्रॉइडच्या मते ह्यामुळे आपल्या प्रेरणा जास्त जोराने दाबून टाकल्या जातात व पुष्कळ गोष्टींचे मुलांना विस्मरण होते आणि त्यामुळे मुलांमधील लैंगिकतेच्या विकासात व्यत्यय येतो. उलट बाजूला असे म्हणता येईल की, त्यामुळे लैंगिकतेकडून लक्ष इतर सांस्कृतिक व सामाजिक घटनांकडे आकर्षित होते. असंस्कृत समाजात ह्या कालखंडात मुलांचे लक्ष लैंगिकतेवर केंद्रित होते ( जी गोष्ट आपल्या समाजात कधीच घडत नाही. ) आणि ते त्यापासून कधीच ढळत नाही. हे अर्थातच पुष्कळ दृष्टींनी सांस्कृतिक नाशाला कारणीभूत होते पण त्याचा एक फायदा म्हणजे मुलाचा कुटुंबाशी असलेला निकट संबंध हलके हलके पण मानसिक त्रास न होता संपुष्टात येतो.

ह्याचबरोबर आपण आता मुलाच्या विकासाच्या दुसऱ्या भागाशी येऊन पोचलो आहो; कारण आपल्या समाजातील सुप्त लैंगिकतेचा कालखंड ह्या भागातलाच आहे. ह्या दोन नंतरच्या अवस्थांची म्हणजे विकासाच्या दुसऱ्या भागांची आपण तुलना केली तर त्यांच्यातही मूलभूत फरक आढळून येतो. आपल्यामध्ये वयात येण्याच्या ह्या प्रथमावस्थेत ईडिपस मनोगंड, म्हणजे मुलग्याचा आपल्या आईबापां-बद्दलचा दृष्टिकोन घट्ट होऊन त्याला विशिष्ट स्वरूप येते. मेलानेशियात ह्या कालात, आणि फक्त ह्या कालातच मनोगंड बनतात. कारण तेथे ह्याच कालात मुलाच्या मनातील प्रवृत्ती दाबून टाकण्याची, निरनिराळे निषेध अमलात आणण्याची, प्रक्रिया घडून येते; व त्यामुळे त्याचा स्वभाव बनला जातो. ह्या ज्या शक्ती त्याच्यावर प्रक्रिया करीत असतात त्यामुळे तो आपला स्वभाव बदलतो पण त्याच्या मनात कमी अधिक प्रमाणात दाबून टाकलेला विरोध व इच्छा राहून जातात कारण मानवाचा स्वभाव केवळ ठोकून आकार देण्यासारखा असतो असे नाही तर स्थितिस्थापक म्हणजे लवचीकही असतो.

मेलानेशियात मुलाच्या इच्छा दाबून टाकणाऱ्या व मुलाचा स्वभाव एका

साच्यात घालणाऱ्या शक्ती दोन प्रकारच्या असतात. म्हणजे मातृसत्ताक जमातीच्या कायद्यांना मान देणे आणि जमातीबाहेर लग्न करण्यावर बंदी (एक्झॉगमी). ह्यातील पहिली शक्ती म्हणजे मामाचा मुलग्यावरील होणारा परिणाम. अभिमान, वागण्यातील मानाची कल्पना, महत्त्वाकांक्षा इत्यादी गोष्टी मामा मुलग्याच्या मनावर बिंबवतो व आपल्याकडची बापाची भूमिका बजावतो. पण त्याच वेळी तो भाच्याकडून ज्या प्रयत्नांची अपेक्षा करतो त्यामुळे व पुढे आपण मामाची जागा घेणार ह्या विचारामुळे त्यांच्यात हेवा आणि चीड किंवा राग हीही दिसून येतात. अशा रीतीने ह्या दोघात एक प्रकारचा द्विधा संबंध उत्पन्न होतो. एका बाजूला मामाबद्दल वाटणारा आदर, त्याच्या अधिसत्तेमुळे आलेले उच्च स्थान व दुसऱ्या बाजूला दाबून टाकलेला व क्वचित् अप्रत्यक्षपणे बाहेर दिसणारा द्वेष.

दुसरा निर्बंध--नात्यातील माणसांमधील लैंगिक संबंध हा भाऊ-बहीण ह्यांच्याबद्दल मुख्यत्वे असतो. पण त्यात आई, आईच्या नातेवाईक स्त्रिया व आपल्या क्लॅनमधील स्त्रिया ह्यांचाही समावेश असतो व त्या सर्वांच्या भोवती एक प्रकारचा लैंगिक पडदा असतो. ह्या सर्व स्त्रियांतील प्रातिनिधिक म्हणून बहिणीबद्दलचा निर्बंध अति कडक असतो. आपण पूर्वी पाहिलेच आहे की, हा निर्बंध अगदी लहानपणीच अमलात येतो, आणि बहिणीबद्दल वाटणारे नैसर्गिक प्रेम त्या कालातच तोडून टाकले जाते. शिवाय हा निर्बंध बहीणभावांमध्ये चुकून किंवा अपघाताने झालेल्या लैंगिक बाबतींनाही गुन्हा समजण्यात येत असल्यामुळे भावाच्या मनात बहिणीचा विचार कायम येत राहतो व तो कायम दाबून टाकला जातो.

दोन्ही कौटुंबिक पद्धतींची आपण थोडक्यात तुलना केली तर असे दिसून येईल की, पितृसत्ताक पद्धतीत बालपणातील स्पर्धा आणि नंतरची सामाजिक कर्तव्ये ह्यांमुळे बाप व मुलगा ह्यांच्यात एक प्रकारचा जिव्हाळा असतो, पण त्याच्या विरुद्ध बाजूला विरोध व नावड हीही असतात. ह्याच्या उलट आईपासून मुलग्याला फार लवकर वेगळे केल्यामुळे त्याच्या मनात खोलवर अतृप्त आतुरता राहून जाते व नंतर, ज्यावेळी लैंगिकता जागृत होते तेव्हा ती मागच्या आठवणी होऊन नव्या शारिरिक प्रवृत्तीत मिसळते आणि पुष्कळदा असे कामुक स्वरूप धारण करते की ते स्वप्नात वा कल्पनेत येऊ लागते. ट्रोब्रियांड जमातीत बाप आणि मुलगा ह्यांच्यात अजिबात वितुष्ट येत नाही आणि आईबद्दल मुलाला वाटणारे आकर्षण आपोआप सावकाश कमी होऊ दिले जाते व अखेर ते फक्त नैसर्गिक स्वरूपात राहते. आदर आणि नावड अशी द्विधा मनोवृत्ती मुलगा आणि त्याचा मामा ह्यांच्यात असते. त्याचप्रमाणे निषिद्ध असलेल्या अनैतिक लैंगिक संबंधाचा विचार भावाच्या मनात फक्त बहिणीबद्दलच येतो. दोन्ही समाजांना एक अगदी संक्षिप्त पण ओबडधोबड सूत्र लावले तर असे म्हणता येईल की, ईडिपस मनोगंडात बापाला मारून आईबरोबर संबंध ठेवण्याची दाबून ठेवलेली इच्छा मुलग्याच्या मनात असते. ह्याच्या उलट ट्रोब्रियांड समाजात मामाला

माहून बहिणीशी विवाह करण्याची इच्छा असते.

वरील विधानांत आपण आपल्या तपशीलवार चौकशीचा निष्कर्ष दिलेला आहे आणि प्रारंभी जो पहिला प्रश्न आपण उपस्थित केला होता त्याचे उत्तरही आलेले आहे. म्हणजे आपण कुटुंबरचनेप्रमाणे केंद्रित मनोगंड (Nuclear Complex) कसा बदलतो याचा विचार केला आहे. तसेच आपण हेही दाखवून दिले आहे की हा मनोगंड कौटुंबिक जीवनाच्या काही वैशिष्ट्यांवर व लैंगिक नीतितत्त्वांवर कोणत्या प्रकारे अवलंबून असतो.

आपल्या समाजात भावनांचा एक विशिष्ट आकार आढळून येतो हा शोध आणि त्याची मुख्यतः लैंगिक आधारावर केलेली थोडीशी कारणमीमांसा, ही आपल्याला मनोविश्लेषणशास्त्राने दिलेली देणगी आहे. ह्यापूर्वीच्या मजकुरात आपल्याला दुसऱ्या एका प्रकारच्या समाजातील म्हणजे मातृसत्ताक समाजातील केंद्रित मनोगंडाबद्दल थोडी माहिती मिळाली. मनोविश्लेषणाने ह्या समाजाचा कधी अभ्यास केलेला नव्हता. आपल्याला असे आढळून आले की, हा मनोगंड पितृप्रधान समाजाहून खूपच वेगळा असतो. तो तसा का असतो व त्याची सामाजिक कारणे कोणती असतात ह्याचीही आपण मीमांसा केली. आपण ह्या दोन समाजांची तुलना शक्य तेवढ्या मोठ्या क्षेत्रात केली व आपण लैंगिक बाबींकडे दुर्लक्ष केले नाही. अर्थात समाजाच्या इतर अंगांचाही आपण विचार केला. ह्या सर्वांचा निष्कर्ष महत्त्वाचा आहे; कारण आतापर्यंत दुसऱ्या एखाद्या प्रकारचा केंद्रित मनोगंड अस्तित्वात असू शकेल अशी कल्पना कोणी केलेली नव्हती. माझ्या पृथक्करणाने मी सिद्ध केले आहे की फ्रॉइडच्या उपपत्ती ढोबळ मानाने मानवी मनोरचनेशी सुसंगत आहेत एवढेच नव्हे तर समाजाची रचना बदलली तरीही त्या अगदी सुयोग्य रीतीने वापरता येतात. दुसऱ्या शब्दात सांगायचे तर असे म्हणता येईल की, समाजाच्या रचनेची पद्धत व त्या समाजातील केंद्रित मनोगंड ही एकमेकांवर अवलंबून असतात असे मी सिद्ध केले आहे. एका दृष्टीने जरी हा फ्रॉइडच्या मानसशास्त्राच्या मुख्य तत्त्वांच्या खरेपणाचा पुरावा आहे, तरी त्यातल्या काही तपशिलात आपल्याला बदल करावा लागेल किंवा त्याची सूत्रे जास्त लवचिक करावी लागतील. स्पष्ट शब्दात सांगायचे तर शरीरशास्त्रीय व सामाजिक परिणामांचा परस्पर संबंध जास्त पद्धतशीरपणे विशद केला पाहिजे. ईडिपस मनोगंड हा जगातील सर्व मानवामध्ये असतो हा समज बदलला पाहिजे, व ज्या समाजाचा आपण अभ्यास करतो त्या समाजातील विशिष्ट मनोगंड कोणता ते शोधून काढले पाहिजे.

♠ ♠

प्रकरण १ ले

# मातृसत्तेमध्ये मनोगंड आणि दंतकथा

## ( Complex and Myth in Mother-Right )

ह्या पुस्तकाच्या पहिल्या भागात जो दुसरा प्रश्न विचारला होता त्याबद्दलचा अभ्यास करून त्याचे उत्तर आता शोधावयाचे आहे. तो प्रश्न असा की, मातृसत्ताक मनोगंड— जो ईडिपस मनोगंडाहून उत्पत्ती आणि वैशिष्ट्ये ह्यात अगदी वेगळा आहे— परंपरा व समाजरचना ह्यांवर काही वेगळा परिणाम करतो का ? आणि ह्या समाजातील तद्देशीयांच्या समाजजीवनात व लोककथात ह्या वेगळ्या मनोगंडांमुळे उत्पन्न झालेले उघड दाब स्पष्ट दिसतात हे सिद्ध करणे. जेव्हा नेहेमी कडक निर्बंध, चालीरीती व कायद्यांतील शिक्षा ह्यांमुळे कुत्र्यात ठेवलेल्या भावनांचा उद्रेक होऊन ह्या मातृसत्ताक समाजात गुन्हे, विकृती, अयोग्य मार्गांचे अवलंबन किंवा रानटी समाजाचे जीवन घुसळून टाकणाऱ्या तशाच दुसऱ्या काही घटना घडून येतात, तेव्हा ह्या भावनांमधून मामाचा द्वेष किंवा बहिणीशी अनैतिक संबंधाची इच्छा ही प्रगट होतात. मेलानेशियन लोककथांतही हा मातृसत्ताक मनोगंड दिसून येतो. दंतकथा, परींच्या कथा, आणि पौराणिक लोककथा, त्याचप्रमाणे जादूटोणा ह्यांची परीक्षा केली तर नेहेमीच्या जीवनात आदर व एकी ह्यांच्या पांघरुणाखाली दडवून ठेवलेला मामाचा द्वेष बाहेर आलेला दिसतो. ह्या गोष्टी दिवास्वप्नांच्या धर्तीवर बनवलेल्या असतात आणि त्यांच्या द्वारे मनात दाबून ठेवलेल्या इच्छा बाहेर पडतात.

ह्या लोकांची प्रेमाबद्दलची जादू आणि तिच्याशी संबंधित लोककथा ह्या फारच चित्तवेधक आहेत. सर्व प्रकारचे आकर्षण, सर्व प्रकारचा मोह पाडणाऱ्या व शील भ्रष्ट करणाऱ्या गोष्टी ह्या प्रेमाच्या जादूत आहेत असे समजले जाते. ही जादू भूतकाळात घडलेल्या कोणत्या तरी घटनेशी जोडलेली आहे व ती भाऊ व बहीण ह्यांच्या अनैतिक संबंधाबद्दल आहे असे ह्या जमातीतील लोक समजतात. म्हणजे कुटुंबातील मंडळींच्या परस्परसंबंधांचा अभ्यास करून आपण जे निष्कर्ष काढले ते स्वतंत्रपणे ह्या जमातीच्या संस्कृतीच्या अभ्यासाच्या मदतीने बरोबर असल्याचे दिसून येते.

♣ ♣

# प्रकरण २ रे

# रोग आणि विकृती

ह्या प्रकरणात जो पुरावा पुढे मांडला आहे तो एकजिनसी नाही. काही मुद्द्यांवर मला पूर्ण माहिती मिळाली तर इतर काहींबद्दल माझे अज्ञान अथवा अपुरी माहिती वाचकांपुढे मांडावी लागेल. अशा ठिकाणी मी फक्त प्रश्न पुढे मांडीन, तो सोडवणार नाही. ह्याचे एक कारण म्हणजे मला मानसिक रोगांबद्दल पुरेसे ज्ञान नाही; व दुसरे एक कारण म्हणजे पारंपरिक तंत्र वापरून तद्देशीय लोकांचे मनोविश्लेषण करणे मला शक्य झाले नाही; आणि तिसरे म्हणजे मला जी सामग्री संशोधनानंतर मिळाली ती विषम होती. ह्याचे कारण असे की, मी ट्रोब्रियांड जमातीत जितके दिवस राहिलो व जितक्या तपशिलात जाऊन त्यांचा अभ्यास केला तितक्या तपशिलात जाणे इतर जमातींच्या बाबतीत मला शक्य झाले नाही; त्या जमातीत मी तितके दिवस राहू शकलो नाही.

माझ्या पोतडीतील मला सर्वात कमी माहिती असलेल्या गोष्टीपासून मी सुरुवात करतो. ह्यात प्रथम मज्जातंतूंचे रोग व मानसिक विकृती ह्यांचा प्रश्न उपस्थित होतो. आपण असे पाहिले की, आपला समाज व ट्रोब्रियांड समाज ह्यांमधील मुलांच्या विकासाची तुलना केली की, मातृसत्ताक मनोगंड मुलाच्या जीवनात उशीरा बनतो, व तो कौटुंबिक निकट सहवासाच्या बाहेर बनतो, त्यात मुलाच्या मनाला कमी धक्के बसतात ( बसत असेलच तर ! ). त्याचे कारण स्पर्धा हेच असते. आणि त्यातील लैंगिक प्रवृत्ती दाबण्याची प्रक्रिया बालपणींच्या प्रवृत्तींपलीकडे जात नाही असे असल्यामुळे फ्रॉइडची मज्जातंतूंच्या विकृतींबद्दलची जी उपपत्ती आहे तिच्या आधारावर लहानपणी मनाला मिळालेल्या आघातांमुळे होणाऱ्या विकृतींचे प्रमाण कमी असावे अशी आपण अपेक्षा करू. मी जेव्हा ट्रोब्रियांड जमातीवर संशोधन करीत होतो त्या वेळी माझ्याबरोबर मानसिक विकृतींचा कोणी तज्ज्ञ नव्हता ही एक दुर्दैवाची गोष्ट होती. कारण तसा जर कोणी असता तर मनोविश्लेषणावर बराच प्रकाश त्याला टाकता आला असता.

ट्रोब्रियांड जमातीचा अभ्यास करताना त्यांची यूरोपियन समाजाशी तुलना करणे निरर्थक आहे. कारण आपल्या समाजात अनेक गुंतागुंतीच्या गोष्टी असतात; त्यामुळे एकंदर परिस्थितीच बदलते आणि मानसिक रोग होण्याला पार्श्वभूमी तयार होते. ट्रोब्रियांड बेटांच्या सुमारे तीस मैल दक्षिणेला ॲम्फ्लेट बेटे आहेत. तेथील

लोक मानववंश व परंपरा व भाषा ह्या गोष्टीत ट्रोब्रियांड लोकांसारखेच आहेत, पण समाजरचना वेगळी आहे, त्यांच्या लैंगिक नीतिमत्तेच्या कल्पना वेगळ्या आहेत, ( उदाहरणार्थ लग्नाआधीच्या लैंगिक संबंधावर ते निर्बंध घालतात ), त्यांच्यात लैंगिक फाजील स्वातंत्र्यदेणाऱ्या संस्था नाहीत व त्यांच्यात कौटुंबिक जीवन पुष्कळच अधिक एकीचे असते. जरी हा समाज मातृसत्ताक असला तरी त्यांच्यात बापाकडे बराच अधिकार असतो. ही गोष्ट, लहान व मुलांमधील लैंगिकता दाबून टाकलेली असल्यामुळे त्यांचा समाज बऱ्याच प्रमाणात आपल्या समाजासारखा असतो.[1]

माझे ह्याविषयीचे ज्ञान पुष्कळच मर्यादित होते. तरीही ह्या तद्देशीयांच्या मानसिक विकृतींबद्दल माझे मत अगदी वेगळे झाले. ट्रोब्रियांड समाजात माझी कित्येकांशी दाट ओळख होती, तर इतर कित्येकांशी नुसती तोंडओळख, म्हणजे पाहिल्यावर अभिवादन करण्याइतपत ओळख होती. पण मला एकही पुरुष किंवा बाई अशी दिसली नाही की, तिला फेपरे अथवा अनिर्बंध भावनोद्रेक होता. आपोआप होणारी स्नायूंची हालचाल ( विशेषतः चेहऱ्यावरील स्नायू आखडणे ) ( टिक् ), आवश्यक अशा आपोआप होणाऱ्या क्रिया किंवा मन व्यापून टाकणाऱ्या कल्पना मला अजीबात आढळल्या नाहीत. तद्देशीय वैद्यकीय पद्धती अर्थातच जादूटोणा ह्यांवर आधारित आहे, पण रोगाची बाहेर दिसणारी चिन्हे ते लक्षात घेतात. त्यांच्यात मानसिक विकृतींचे दोन प्रकार करतात : **नागोवा** मध्ये जन्मापासूनची विकृती, ( थायरॉइड ग्रंथीच्या अकार्यक्षमतेमुळे उत्पन्न झालेली शारिरिक व मानसिक विकृती ), वेड, किंवा बोलण्यात काही दोष असलेल्या व्यक्ती; आणि **ग्वायलूवा** मध्ये काही विशिष्ट गोष्टींबद्दलचे वेड. ह्यात ज्या व्यक्ती एकदम केव्हा तरी हिंसात्मक किंवा समाजविरोधी कृत्ये करतात त्यांचा समावेश होतो. ट्रोब्रियांड समाजातील लोकांना आपल्या शेजारच्या ॲम्फ्लेट्स् व दांत्रकास्तो ह्या बेटांवर आपल्यापेक्षा निराळ्या प्रकारच्या मानसिक विकृती, म्हणजे निराळ्या प्रकारचा जादूटोणा असतो हे माहीत आहे. त्या विकृती म्हणजे वर दिल्याप्रमाणे चेहऱ्याचे स्नायू एकदम आखडणे ( टिक् ), आपोआप होणाऱ्या आवश्यक क्रिया व नादिष्टपणाने एकच एक गोष्ट करीत राहणे अशा असतात. ॲम्फ्लेट्समधील माझ्या काही थोड्या महिन्यांच्या वास्तव्यात माझे असे मत झाले की, हा समाज मानसिक विकृती झालेल्यांचा आहे. खुल्या दिलाच्या, आनंदी, मनापासून आदरातिथ्य करणाऱ्या व सहज मैत्री जोडणाऱ्या ट्रोब्रियांड लोकांकडून आल्यानंतर मला असा एक समाज भेटला की, त्यांना नव्या माणसाबद्दल अविश्वास वाटावा, त्यांनी कामात घाई करावी, आपल्या हक्कांबद्दल उद्दामपणा दाखवावा; पण जे दुसऱ्याने जरा जोर दाखविल्याबरोबर नरम यावे व भिऊन जावे अशा लोकांत आल्यामुळे मी आश्चर्यचकित झालो. मी त्यांच्या खेड्यांत उतरलो की मला पाहिल्याबरोबर बायका पळून जात व मी असेतोपर्यंत लपून राहात. फक्त एकदोन जख्ख म्हाताऱ्या बायका माझ्या दृष्टीस पडल्या. हे सर्वसाधारण चित्र तर होतेच पण मला पुष्कळसे लोक घाबरलेल्या

स्थितीत आढळले; व अर्थातच त्यांच्याकडून मला काहीच माहिती मिळू शकली नाही. कारण एक तर भीतीमुळे ते काही तरी खोटी माहिती देत किंवा माझ्या तपशीलवार प्रश्नांमुळे ते रागावत किंवा आपला अपमान झाला असे दाखवीत. ट्रोब्रियांड लोकांचे एक वैशिष्ट्य म्हणजे त्यांचे मांत्रिक ( मृतात्म्यांशी संबंध प्रस्थापित करणारे ) सुद्धा मानसिक दृष्ट्या अपवादात्मक नसून नुसते वरवर आव आणणारे लोक होते. ट्रोब्रियांड समाजात जादूटोणा करणारे लोकसुद्धा "शास्त्रीय" पद्धती वापरतात, म्हणजे अनैसर्गिक असे आपण काही तरी करतो असा आव ते आणीत नाहीत. ह्याच्या उलट दक्षिणेकडील बेटांत "उडणारे जादूगार" जो जादूटोणा करतात तो अर्ध-काल्पनिक चेटकिणींसारखा असतो, व प्रथम पाहणाऱ्यावर त्याची फार खोल अशी छाप पडते.

दुसऱ्या एका समाजात मी माझ्या मानवसंस्कृतिशास्त्राच्या अभ्यासाच्या उमेद-वारीची वर्षे घालवली. अर्थातच ह्या समाजाचा अभ्यास मी ट्रोब्रियांड समाजाच्या इतका चांगल्या तऱ्हेने करू शकलो नाही; पण मी एवढे म्हणू शकतो की, तेथे ॲम्फ्लेट बेटांपेक्षाही परिस्थिती अधिक जुलमी होती. न्यू गिनीच्या दक्षिण किनाऱ्याच्या काही भागात राहणारे माइलू लोक पितृसत्ताक आहेत, त्यांच्या कुटुंबात सर्व सत्ता बापाच्याकडे असते आणि लैंगिक वर्तणुकीबद्दलचे त्यांचे नियम अतिशय कडक आहेत.[२] ह्या जमातीमध्ये अनेक व्यक्तींना मी मानसिक दृष्ट्या विकृत असेच समजलो, व त्यांच्या-कडून मला कोणतीच माहिती मिळेल अशी माझी अपेक्षा नव्हती.

पण मी ही जी सर्व प्रायोगिक म्हणून विधाने केली आहेत, ती जरी केवळ तर्कावर आधारित अनुमाने नसली, तरी माझा उद्देश हा प्रश्न उपस्थित करावा आणि त्याचे उत्तर काय असण्याची शक्यता आहे हे दिग्दर्शित करावे, एवढाच आहे. म्हणजे मुख्य प्रश्न असा की, संस्कृतीच्या एकाच पातळीवर असणाऱ्या मातृसत्ताक व पितृ-सत्ताक अशा अनेक जमातींचा अभ्यास करून त्यांच्यातील कुटुंबरचना व लैंगिक प्रवृत्ती दाबून टाकण्याचे प्रमाण ह्यांचे निरीक्षण करून लैंगिक व कौटुंबिक प्रवृत्ती ह्यांच्यातील परस्पर संबंध ठरवणे आणि फेपरे, भावनिक उद्रेक व अनिवार्य असे मनोगंड किती प्रमाणात आहेत ह्याचे मोजमाप घेणे. मेलानेशियामधील एकंदर परिस्थिती, शेजारी शेजारी राहणाऱ्या पण अगदी निराळ्या समाजरचना असणाऱ्या जमाती ह्या सर्व गोष्टी जणू काय शास्त्रीय प्रयोग करण्याकरता मांडूनच ठेवल्या आहेत.

फ्रॉइडच्या उपपत्तीला पाठिंबा देणारा आणखी एक मुद्दा म्हणजे लैंगिक प्रवृत्ती दाबून टाकण्याचे प्रमाण व लैंगिक विकृती ह्यांचा परस्पर संबंध. फ्रॉइडने दाखवून दिले आहे की, बालवयातील लैंगिकतेचा प्रवाह व उत्तर आयुष्यात होणाऱ्या लैंगिक विकृती ह्यांचा निकट संबंध आहे. ह्या उपपत्तीप्रमाणे ट्रोब्रियांड जमातीसारखा समाज, की जेथे बालवयातील लैंगिक विकासावर कोणत्याच प्रकारची बंधने घातली जात नाहीत, तेथे लैंगिक विकृतीचे प्रमाण अगदीच अल्प असावे अशी अपेक्षा असते. ट्रोब्रियांड

जमातींबद्दल ही अपेक्षा पूर्णपणे खरी ठरते. इतर जमातींत समलिंगी आकर्षण व संभोग असल्याचे मला कळून आले. ट्रोब्रियांड समाजात फक्त गोरे लोक आल्यानंतर व नीतिमत्तेच्या त्यांच्या कल्पना त्यांनी आपल्याबरोबर आणल्यानंतर समलिंगी आकर्षणाचा प्रादुर्भाव झाला. मिशनऱ्यांच्या संस्थांत, जेथे मुलगे आणि मुली वेगळ्या वेगळ्या घरात कोंडून ठेवल्या जात तेथे मग त्यांना जे शक्य ते ती मुले करू लागली. कारण ज्या गोष्टी बाहेरच्या ट्रोब्रियांड समाजात अगदी नैसर्गिक समजल्या जात त्यांना मिशनमध्ये बंदी होती. मिशनमधल्या व मिशनच्या बाहेरच्या तद्देशीयांजवळ काळजी-पूर्वक चौकशी केली तेव्हा आढळून आले की गोऱ्या लोकांनी ज्या तद्देशीयांवर आपले नीतिनियम अशास्त्रीय व अयोग्य पद्धतींनी लादले त्यांच्यात समलिंगी संभोग अगदी सर्वसाधारणपणे सापडे. अशा काही घटना आढळल्या की, काही व्यक्ती प्रत्यक्ष समलिंगी संभोग करताना दिसल्यामुळे त्यांना मिशनमधून देवाच्या पुढून घालवून दिले; व ते जेव्हा आपल्या समाजात हा प्रकार चालू ठेवण्याचा प्रयत्न करू लागले तेव्हा त्यांना जमातीच्या नीतिनियमांमुळे इतकी तुच्छता व हेटाळणी ह्यांचा अनुभव आला की, त्यांना आपल्या ह्या सवई सोडून द्याव्या लागल्या. दक्षिणेकडील ॲम्फ्लेट व दान्त्रकास्तो ह्या द्वीपसमूहात लैंगिक विकृती अधीक प्रमाणात आढळते असे मला समजले; पण इथेही हा महत्त्वाचा विषय अधीक तपशिलात जाऊन अभ्यासणे मला शक्य झाले नाही.

# प्रकरण ३ रे

# स्वप्नें आणि कृती

आता आपल्याला ट्रोब्रियांड लोकांच्या मातृसत्ताक कुटुंबातील संपूर्ण भावनांचें चित्र त्यांच्या समाजरचनेत आणि संस्कृतीत कसे उमटते ह्याचा अभ्यास करावयाचा आहे. ह्या प्रश्नात आपण जर खूप खोलात शिरलो तर ह्या दृष्टिकोनातून त्या जमातीच्या जीवनातील प्रत्येक बारीक सारीक तपशिलात शिरावे लागेल. आपल्याला निवड करून वस्तुस्थितीच्या दृष्टीने महत्त्वाच्या गोष्टी विचारात घेतल्या पाहिजेत. ह्यांचे दोन प्रकार आहेत : ( १ ) त्यांच्या स्वतंत्र कल्पनेच्या भराऱ्या; आणि ( २ ) त्यांच्या लोककथांपासून मिळवलेली माहिती. पहिल्या वर्गात स्वप्ने, दिवास्वप्ने, वैयक्तिक इच्छा आणि ध्येयें, जी त्या व्यक्तीच्या जीवनातून उद्भवतात आणि जी त्याच्या स्वभावाच्या अंतर्मनाच्या शक्तीमुळे रूप घेतात. ह्यात विचार आणि स्वप्ने ह्यांच्या भराऱ्यांचा ज्याप्रमाणे समावेश होतो तसेच कृतीचाही होतो. एखादा गुन्हा अथवा पाप जेव्हा केले जाते किंवा लोकमताला व सभ्यतेला धक्का बसेल अशी कृती केली जाते तेव्हा दाबून ठेवलेल्या भावना कायदा आणि नीती ह्यांच्या दडपणाला उडवून देऊन ते मोडून टाकतात. अशा कृतींमध्ये आपण भावनांचा जोर व ध्येयाची शक्ती ही दोन्ही मोजू शकतो. आता आपण ह्या पहिल्या प्रकारच्या स्वप्नांकडे व कृतींकडे वळू. इथे व्यक्ती थोडावेळ का होईना समाजातील चालीरीतींच्या साखळ्या तोडून टाकते, आणि दाबून टाकलेल्या मूलभूत गोष्टी आणि दाबणारी शक्ती ह्यांमधील झगड्याचे प्रदर्शन करते.

ट्रोब्रियांड बेटांवरील मेलानेशियन्समध्ये स्वप्ने आणि दिवास्वप्ने हा विषय अभ्यासणे हे सोपे काम नाही. या लोकांची एक लक्षात घेण्यासारखी आणि वैशिष्ट्यपूर्ण गोष्ट जिच्यामध्ये हे लोक इतर रानटी समाजांपासून वेगळे पडतात ती ही की, त्यांना फारशी स्वप्ने पडत नाहीत व स्वप्नांबद्दल त्यांना फारसे कुतूहल वाटत नाही. त्यांच्याबद्दल ते आपण होऊन काही बोलत नाहीत, नेहमींच्या स्वप्नांना काही भविष्यकाली घडणाऱ्या गोष्टींचे महत्त्व आहे असे ते मानीत नाहीत, किंवा स्वप्नात दिसणाऱ्या गोष्टींचा विशिष्ट चिन्हे म्हणून ते उपयोगही करीत नाहीत. मी पुष्कळदा हा विषय काढून त्यांच्याजवळ प्रत्यक्ष चौकशी करीत असे आणि मला माहिती देणाऱ्यांना विचारीत असे की, तुम्हाला स्वप्ने पडतात की नाही ? आणि पडत असली तर कशाबद्दल पडतात ? ह्याचे उत्तर बहुतेक वेळा नाही असेच येत असे. क्वचित काही अपवाद असत, पण त्याबद्दल मी

पुढे लिहीन.

ह्या स्वप्नांचा अभाव किंवा स्वप्नांबद्दल विशेष कुतूहल नसणे हे भावना न दाबलेल्या व ज्या समाजात लैंगिक आचारावर कोणतीच बंधने नसतात अशा समाजाचे लक्षण आहे की काय ? त्यांचा मनोगंड अगदीच कमी शक्तीचा असून आयुष्यात बऱ्याच उशीरा येऊन त्यात बालपणाचे काही अवशेष नसल्यामुळे हे घडून येत असावे काय ? इतकी थोडी स्वतंत्र स्वप्ने पडणे, त्यांची फारशी आठवण न राहणे, ह्यावरून एकच निष्कर्ष संभवतो, आणि मानसिक विकृती नसणे ह्याचाही त्याला आधार मिळतो, की फ्रॉइडची उपपत्ती बऱ्हंशी खरी असावी. ह्या उपपत्तीत असे विधान आहे की, स्वप्ने पडण्याचे मुख्य कारण म्हणजे अतृप्त लैंगिक इच्छा, विशेषतः ज्या लैंगिक किंवा अर्धलैंगिक म्हणजे तत्सम इच्छा बालवयात दाबून टाकलेल्या असतात त्या. अर्थात ह्या प्रश्नाला अगदी समाधानकारक उत्तर मिळवायचे म्हणजे दोन सारख्या सारख्या संस्कृतीच्या व राहणीच्या, पण ज्यांच्यात लैंगिक प्रवृत्ती कमीअधिक प्रमाणात दाबून टाकण्यात येते, अशा जमातींबद्दल खूपशी तुलनात्मक माहिती मिळाली पाहिजे.

मी वर "स्वतंत्र स्वप्ने" हा शब्दप्रयोग वापरला आहे; कारण स्वप्नांचा असा एक प्रकार असतो की त्याला स्वतंत्र स्वप्ने म्हणावे की स्वतंत्र कल्पनेच्या भराऱ्या म्हणावे हे कळत नाही. कारण ती स्वप्ने पारंपरिक धर्तीची असतात आणि त्यांना "अधिकृत स्वप्ने" म्हणता येईल. उदाहरणार्थ, एखादा मनुष्य काही महत्त्वाचे काम करीत असेल किंवा दुसरे काही ध्येय गाठण्याचा प्रयत्न करीत असेल; आणि त्याला ती गोष्ट पुरी केल्याचे किंवा ध्येय गाठल्याचे स्वप्न पडले तर ते "अधिकृत स्वप्न" समजता येईल. मासे पकडायला गेलेल्या बोटींच्या ताफ्यातील लोकांना हवेबद्दलची स्वप्ने पडतात, किंवा माशांचे कळप कोणत्या ठिकाणी सापडतील त्याबद्दलची स्वप्ने पडतात, किंवा मासे पकडायला निघण्याची सर्वात उत्तम तारीख ह्याची स्वप्ने पडून त्याप्रमाणे ते हुकूम सोडतात. कुला (Kula) ह्या नावाच्या समुद्रपार सफरींची व्यवस्था करणाऱ्या लोकांना त्यांच्या समारंभपूर्वक केलेल्या व्यापाराबद्दलची स्वप्ने पडतात.

जे जादूटोणा करणारे जादूगार असतात त्यांना त्यांच्या जादूबद्दलची स्वप्ने पडतात. जादूगारांच्या स्वप्नाचे आणखी एक पारंपरिक व प्रतिनिधिक स्वरूप आहे व ते एखाद्या मंत्रामुळे अथवा संस्कारामुळे होते. उदाहरणार्थ, समुद्रापलीकडील संस्कारयुक्त व्यापारामध्ये एक मंत्र असतो की तो भागीदाराच्या मनावर प्रत्यक्ष परिणाम करतो, त्याला स्वप्न पाडतो, आणि ह्या स्वप्नामुळे व्यापारातील भागीदाराला वस्तूंची देवाण-घेवाण करण्याची इच्छा होते. प्रेमाच्या जादूने प्रेमासंबंधी स्वप्न पाडले जाते व इच्छित व्यक्तीच्या मनात प्रेमाची इच्छा उत्पन्न होते असा समज आहे. ह्या सर्व बाबतीत फ्रॉइडच्या उपपत्तीच्या विरुद्ध परिस्थिती असते. कारण त्या उपपत्तीत मनातील इच्छेमुळे स्वप्ने पडतात अशी कल्पना आहे.[१]

खरोखर पाहिले तर वर ज्या पारंपरिक स्वप्नांचा उल्लेख केला ती सर्व

फ्रॉइडच्या उपपत्तीने आखून दिलेल्या रेषांच्या आतच असतात. कारण ती जादूटोणा करणाऱ्या व्यक्तीच्या इच्छेचे प्रतिबिंब जिच्यावर जादू करायची त्या व्यक्तीच्या मनात पडत असते. तिच्या स्वप्नात एक प्रकारची तीव्र इच्छा किंवा हाव उत्पन्न होते; म्हणजे जादू करणाऱ्याच्या सारखीच तिची मनःस्थिती होते. कुलाचा भागीदार जादूच्या परिणामामुळे भव्य असे अदलाबदलीचे देखावे स्वप्नात पाहतो आणि त्यामुळे जादू करणाऱ्याच्या मनातील इच्छा भागीदाराच्या मनात उत्पन्न होते, असा त्यांचा समज आहे.

अशी सर्व स्वप्ने नुसती बोलण्यातच येतात व फक्त कल्पनेतच त्यांचे अस्तित्व असते असे नाही. पुष्कळदा जादू करणारा मांत्रिकच माझ्याकडे येऊन खूपसे मासे पकडण्यासंबंधी पडलेल्या स्वप्नाचे वर्णन करीत असे व त्याच्या आधारावर तो इतरांना घेऊन मासे पकडण्याच्या सफरीवर निघत असे. किंवा बागेसंबंधीचा मांत्रिक खूप दिवस दुष्काळ पडणार आहे असे स्वप्न पडल्याचे सांगून त्याकरता काय काय उपाय करावे त्याबद्दल हुकूम सोडीत असे. दरवर्षी मृत पूर्वजांच्या सन्मानार्थ होणाऱ्या मेजवानीच्या वेळी मला दोनदा तद्देशीयांच्या स्वप्नांबद्दल माहिती मिळाली. दोन्ही वेळा स्वप्ने मेजवानीच्या प्रसंगी होणाऱ्या समारंभासंबंधीच होती. आणि एका स्वप्नात ज्याला स्वप्न पडले तो म्हणाला की, त्याला स्वप्नात मृतात्मे भेटले व एकंदर समारंभाबद्दल त्यांनी आपली नापसंती दर्शविली. दुसऱ्या एका प्रकारच्या स्वप्नांचा संबंध मुलांच्या जन्माशी असतो. अशा स्वप्नात भावी आईला एखाद्या मृतात्म्याकडून मुलाच्या जन्माबद्दल संदेश मिळतो.

प्रातिनिधिक किंवा अधिकृत स्वप्नांपैकी आपल्याला विशेष औत्सुक्य ज्यांच्या-बद्दल आहे ती म्हणजे लैंगिक स्वप्ने. एखाद्या पुरुषाला स्वप्न पडते की एखादी स्त्री त्याला रात्री भेटायला येते; स्वप्नात तो तिच्याशी संभोग करतो व जागा झाल्यावर त्याला चटईवर वीर्यपतन झाल्याचे दिसते. ही गोष्ट तो आपल्या बायकोपासून लपवून ठेवतो पण ते स्वप्न सत्यसृष्टीत आणण्याचा आणि त्या स्त्रीबरोबर गुप्त कारस्थान करण्याचा प्रयत्न करतो. कारण ह्या स्वप्नाचा असा अर्थ होतो की, जी स्त्री त्याच्या स्वप्नांत आली तिने प्रेमाची जादू केली व त्याची इच्छा केली.

अशा बऱ्याचशा स्वप्नांबद्दल मला पुरुषांकडून गुप्त माहिती मिळाली व नंतर ती स्त्री मिळविण्याकरता केलेली खटपट व गुप्त कारस्थाने ह्यांचीही कथा ऐकायला मिळाली.

एकदा मला तद्देशीयांकडून लैंगिक स्वप्नांची हकीगत कळल्याबरोबर निषिद्ध मानलेल्या स्त्रियांबरोबर संभोग केल्याची स्वप्ने पडली की काय ह्याचा माग मी कसोशीने काढू लागलो. " तुम्हाला कधी आपल्या आईबद्दल असे स्वप्न पडते का ?" ह्या प्रश्नाला नेहेमी शांतपणे व मनाला कोणत्याही प्रकारचा धक्का न बसता "नाही" असे उत्तर येई. " आई निषिद्ध आहे— फक्त एखाद्या टोनागोवाला ( वेडपटाला )च

असे स्वप्न पडू शकेल. ती म्हातारी आहे. अशी गोष्ट घडणार नाही." पण जर का बहिणीबद्दल असाच प्रश्न विचारला तर अगदी वेगळे उत्तर मिळे; व त्या माणसाच्या मनावर परिणाम झाल्यासारखे दिसे. अर्थात असा प्रश्न एखाद्या माणसाला प्रत्यक्ष विचारू नये अथवा इतर माणसांच्या देखत विचारू नये हे मला कळत होते. पण प्रश्न जरी "इतर माणसांना" अशी स्वप्ने पडत असतील का या शब्दात विचारला तरीही त्याची प्रतिक्रिया रागाची व संतापाची असे. कधींकधी ह्या प्रश्नाला उत्तरच मिळत नसे. थोडा वेळ थांबून मला माहिती देणारा माणूस दुसराच एखादा विषय काढी. इतर काही लोक गंभीरपणे त्याचा इन्कार करीत तर आणखी काही जोराने व रागाने नकार देत. पण मला जास्त माहिती देणाऱ्याकडून हळूहळू लहान तुकड्या-तुकड्यांनी मला अखेरीस सत्याचा शोध लागला व कळून चुकले की, सत्य स्थिती वेगळीच होती. सर्वांना माहीत होते की "इतर लोकांना" अशी स्वप्ने पडतात. "एखादे वेळी एखादा मनुष्य दुःखी, लाजेने चूर झालेला व पटकन संतापणारा असा दिसे. का? तर त्याला आपल्या बहिणीशी संभोग केल्याचे स्वप्न पडले म्हणून" "ह्याची मला लाज वाटते" असे तो माणूस म्हणायचा. शेवटी मला असे आढळून आले की, अशी स्वप्ने पुष्कळ लोकांना पडत—फार तर काय हे एक प्रातिनिधिक स्वरूपाचे स्वप्न असून ते पुष्कळदा बऱ्याच लोकांना पडत असे; आणि त्यामुळे स्वप्न पडणाऱ्याच्या मनाची चलबिचल होऊन ते त्याचे मन व्यापून टाकी. ह्याला आणखी पुरावा त्यांच्या दंतकथा व लोककथा ह्यांच्यातही आपल्याला पुढे सापडेल.

नातेवाइकांशी किंवा कुलांतल्या व्यक्तीशी लग्न टाळण्याचा जो नियम आहे ( एक्झॉगमी ) तो बहीणभाऊ ह्यांच्या संबंधाबद्दल सर्वांत अधीक कडक आहे. जरी भाऊ बहीण ह्यांच्याबद्दलचा कडक निर्बंध आहे व त्याची सर्वांना शिसारी वाटते तरी कुलांतील इतर स्त्रियांशी संबंध ठेवण्याविषयी एक प्रकारची चलाखी किंवा हुशारी असल्याचीही कल्पना त्यांच्यात आहे. कारण तसा संबंध ठेवण्यात माणूस चांगलाच खमंग असावा लागतो. ह्याचाच परिणाम म्हणजे क्लॅनमधील स्त्रियांशी संबंध ठेवल्याची स्वप्ने पुष्कळ लोकांना पडतात. म्हणजे निरनिराळ्या निषिद्ध संबंधांच्या स्वप्नांबद्दल सारांश काढायचा तर असे म्हणता येईल की त्यात आई फारच क्वचित येते; आलीच तर त्या स्वप्नांचा मनावर फारसा परिणाम दिसून येत नाही; नात्यांतल्या इतर स्त्रियांबद्दल स्वप्ने पुष्कळदा पडतात व एकंदर त्यांचा परिणाम सुखदायक असतो; बहिणीबद्दल स्वप्ने पडतात, पण त्यांच्यामुळे खोल आणि दुःखदायक असा परिणाम मनावर होतो. हे सर्व अर्थातच अपेक्षित असेच आहे; कारण त्यांच्या लैंगिकतेच्या विकासाचा आपण जेव्हा अभ्यास केला तेव्हा आईच्या बाबतीत मोह अजीबात नव्हता, बहिणीच्या बाबतीतला मोह जोरदार पण पूर्णपणे दाबून टाकलेला, आणि टोळीमधील इतर स्त्रियांबद्दलचे आकर्षण तितक्या जोरात दाबून टाकलेले नव्हते.

भाऊ व बहीण ह्यांच्या अनैतिक संबंधाबद्दल ट्रोब्रियांड जमातीच्या लोकांना

इतकी किळस व भय वाटते की, एखाद्या निरीक्षकाला जरी त्याला त्यांची चांगली माहिती असली तरी प्रथम वाटेल की, ही गोष्ट कधीच घडत नसावी. पण फ्रॉइडची उपपत्ती ज्याला माहीत आहे त्याला थोडा संशय येण्याची शक्यता आहे. आणि जास्त खोलात जाऊन चौकशी केली तर हा संशय खरा असल्याचे त्याला आढळून येईल. भाऊ-बहीण ह्यांचा लैंगिक संबंध प्राचीन काळीसुद्धा होत असे, आणि राज्यकर्त्या मालासी टोळीबद्दल त्यांच्या कुटुंबात ह्या गोष्टी घडल्याचा लोकापवाद आहे. आधुनिक काळात ख्रिस्ती नीतितत्त्वांमुळे व गोऱ्या लोकांच्या तथाकथित कायदा आणि सुव्यवस्था ह्यांच्या नावाखाली जुने रीतिरिवाज व नैतिक नियम मोडून टाकले जातात तेव्हा जमातीच्या परंपरा अधिकच जोराने व उघडपणे प्रगट होतात. माझ्या माहिती-प्रमाणे तीन किंवा चार घटनांमध्ये भाऊ व बहीण ह्यांचा संबंध झाला, व त्याबद्दल लोकांत खालच्या आवाजात कुजबूज झाली आणि लोकमत नक्कीच त्यांच्या विरुद्ध होते. असे एक घडलेले उदाहरण मात्र माझ्या चांगलेच लक्षात राहिलेले आहे; कारण हा भाऊ-बहिणीचा विशिष्ट संबंध बरेच दिवस चालू होता व त्यात गुप्त कारस्थानही होते. शिवाय ती दोघेही समाजाच्या टीकेला मुळीच दाद देत नव्हती, आणि लोकांत त्यांच्या-विषयी अनेक अफवा प्रसृत होत होत्या.

ओकोपुकोपूचा मोकाडायू हा एक प्रसिद्ध गायक होता. त्याच्या धंद्यातील इतरांप्रमाणेच तोही स्त्रियांना वश करून घेण्यात मोठा पटाइत होता. कारण तद्देशी-यांच्या मते "गळा हा एक लांब मार्ग आहे— स्त्रीच्या इंद्रियाप्रमाणेच ( व्हॅजायना, **विला** ), आणि ती दोन एकमेकांना आकर्षित करतात." ज्या माणसाचा आवाज मधुर आहे त्याला स्त्रिया आवडतात व तो स्त्रियांना आवडतो." त्याच्याबद्दल अनेक हकीगती सांगितल्या जातात : ओलिव्हिलेव्हीच्या प्रमुखाच्या सर्व बायकांच्याबरोबर त्याने संयोग कसा केला; ह्या किंवा त्या विवाहित स्त्रीला त्याने कसे वश करून घेतले इत्यादी. काही दिवस मोकाडायूचा मृतात्म्यांशी संबंध ठेवणारा मध्यस्थ म्हणूनही बराच उत्कर्ष झाला, व त्याला संपत्तीही मिळाली. त्याच्या झोपडीत अनेक अनैसर्गिक गोष्टी घडून येत, विशेषतः कित्येक वस्तू नाहीशा होऊन त्या मृतात्म्यांच्या प्रदेशात पाठवल्या जात. पण लवकरच त्याचे हे ढोंग बाहेर फुटले व ह्या सगळ्या नाहीशा झालेल्या वस्तू त्याच्याजवळच असल्याचे सिद्ध झाले.

नंतर त्याचा त्याच्या बहिणीशी अनैतिक संबंध असल्याची घटना दृष्टोत्पत्तीस आली. ती दिसायला फार सुंदर होती, व इतर ट्रोब्रियांड मुलींप्रमाणे तिला पुष्कळ प्रियकर होते. एकदम सर्वांशी संबंध सोडून ती शुद्ध व पवित्र झाली. तिच्या सर्व प्रियकरांनी एकत्र येऊन तिच्यात हा बदल का झाला ह्याचा शोध घेण्याचे ठरवले. प्रथम त्यांना असे कळून आले की, त्यांचा प्रतिस्पर्धी कोणीही असो, हा एकंदर प्रकार तिच्या आईबापांच्या घरातच होत असला पाहिजे. एके दिवशी आईबाप बाहेर गेलेले असताना त्या मुलीच्या प्रियकरांनी छपराला भोक पाडले व त्यातून आत पाहिले तो

बहीण आणि भाऊ ह्यांचा प्रत्यक्ष लैंगिक संयोग होताना त्यांना दिसला. अर्थातच त्या खेड्यात लोकापवादाची प्रचंड लाट उठली व पूर्वीच्या काळी तिचा शेवट त्या दोघी जोडीच्या आत्महत्येतच झाला असता, पण हल्लीच्या काळात तसे काही झाले नाही. ती दोघे आपला अनैतिक संबंध चालू ठेवून काही दिवस तेथेच राहिली व नंतर त्या मुलीचे लग्न होऊन ती आपले गाव सोडून दुसऱ्या गावी गेली.

प्रत्यक्ष बहीण-भावांचा संबंध सोडला तरी टोळींच्या बाहेर लग्न करण्याचा (एक्झॉगमी) आणखी एक नियम आहे, त्याला सुवासोवा असे नाव आहे. आपल्याच टोळीमधील स्त्रीशी लग्न करण्यावर बंदी आहे, व असे जो पुरुष करील त्याला सर्व जमातीपुढे मान खाली घालावी लागते व शिवाय त्याच्या अंगावर सर्वत्र गळवे होतील अशीही समजूत आहे. ह्या दुसऱ्या आपत्तीविरुद्ध मात्र एक विशिष्ट जादू आहे व मला सर्व लोकांनी अगदी खात्री देऊन सांगितले की, ती अतिशय कार्यक्षम आहे. अशी गोष्ट करणाऱ्याला समाजाच्या नीतिनियमांचा भंग केल्याबद्दलची वाटणारी लाज अगदीच अल्प प्रमाणात असते आणि सामाजिक नीतिनियम मोडणाऱ्या इतर लोकांप्रमाणे ह्याही माणसाला चलाख व हुशार समजले जाते. जो तरुण मनुष्य अगदी मदनासारखा डॉन् हुआन स्त्रियांना वश करणारा समजला जातो व ज्याचे स्वतःबद्दलचे मत फार उच्च असते तो अविवाहित मुलींच्याबद्दल तुच्छता दाखवून त्यांना टाळतो व एखाद्या विवाहित स्त्रीच्याबरोबर संबंध स्थापण्याचा प्रयत्न करतो. विशेषतः जमातीच्या प्रमुखाच्या बायकोशी, किंवा ते नच जमले तर टोळीमधल्या एखाद्या स्त्रीबरोबर (**सुवासोवा**) त्याबद्दल वापरला जाणारा शब्दप्रयोग "**सुवासोवा योकू**" ("अरे, तू लग्नाचे नीतिनियम मोडणाऱ्या!") हे म्हणजे आपल्या भाषेत "अरे वा रे तू चैनबाजी करणाऱ्या!" असे म्हणण्यासारखेच आहे, आणि ती थट्टेतली स्तुतीच आहे.

हे सर्व चित्र पुरे करण्याला इथे सांगितले पाहिजे की आई व मुलगा ह्यांच्या नीतिबाह्य संबंधाचे एकही उदाहरण मला आढळले नाही, एवढेच नव्हे तर कोणाच्याही मनात त्याबद्दल कधी संशयसुद्धा आलेला नाही. आई मुलगा ह्यांच्या संबंधीचा निषेध बहीण भाऊ ह्यांच्या संबंधावरील निषेधाइतका कडक व सर्वमान्य नसूनही ही परिस्थिती आहे हे लक्षात ठेवले पाहिजे. ट्रोब्रियांड समाजातील कुटुंबातील माणसांच्या एकमेकांविषयींच्या भावनांचे संक्षिप्त वर्णन देताना मी म्हटले आहे की, त्यांच्यातील बाप व मुलगी यांचा परस्पर संबंध आपल्या पितृप्रधान समाजातील संबंधासारखाच असतो. ह्यावरून आपण सहजच अपेक्षा करू शकतो की, बाप व मुलगी ह्यांच्यातील अनैतिक संबंध अगदीच आढळत नाहीत असे नाही. मला अशा दोन किंवा तीन घटना माहीत आहेत की, त्यांबद्दल संशय घेण्यास जागाच नाही. ह्यातली एक घटना अशी होती की, त्या मुलीचा बापाशी तर अनैतिक संबंध होताच पण माझ्या नोकरीत असलेल्या तिथल्या एका तरुणाची ती प्रेयसी होती. त्याला तिच्याशी लग्न करण्याची इच्छा होती, व तो

माझ्याजवळ पैशाची व नैतिक पाठबळाची विनंती करीत होता. ह्या सर्व प्रकारात मला बाप-मुलीच्या निषिद्ध संबंधाची तपशीलवार माहिती मिळाली व त्यामुळे हा निषिद्ध प्रकार बरेच दिवस चालत असल्याबद्दल माझी खात्री पटली.

आत्तापर्यंत आपण लैंगिक संबंधावरील निर्बंध आणि ते मोडण्याची दाबलेली इच्छा ह्यांचा विचार केला. ह्या दाबलेल्या इच्छेमुळे स्वप्ने तर पडतातच पण गुन्हे आणि भावनांचा उद्रेक हेही घडून येतात. ह्याशिवाय दुसरेही एक नाते असे आहे की, त्यामुळेही गुन्हा करण्याची इच्छा दाबलेली असते---ते नाते म्हणजे एखादा तरुण व त्याच्या आईचा भाऊ, जो ह्या मातृप्रधान समाजरचनेत खरोखर सत्ताधारी असतो. स्वप्नांबद्दल म्हणावयाचे तर असे सांगता येईल की, भावी मृत्यूच्या स्वप्नांमध्ये जवळचा नातेवाईक ( बहुधा मामा ), बहुतेक बहिणींचा मुलगा, ह्याला आपल्या मामाच्या मृत्यूचे स्वप्न पडते. दुसरी एक वस्तुस्थिती, स्वप्नाबद्दल नव्हे तर कृतीबद्दल अशी आहे की, तिचा संबंध चेटकाशी आहे. ज्या माणसाने जादूटोण्याची कला आत्मसात केली आहे त्याने तिचा पहिला प्रयोग आपल्या आईकडील एखाद्या नातेवाइकावर करावयास पाहिजे. पुष्कळदा असा माणूस आपल्या आईवरच हा जादूटोण्याचा प्रयोग करतो असे म्हणतात. अर्थात जेव्हा कोणीही माणूस जादूटोणा शिकू लागतो तेव्हा त्याचे आईकडचे सर्व नातेवाईक भिऊन असतात व आपल्याला काही धोका आहे की काय हे पहात असतात.

प्रत्यक्ष गुन्ह्यांच्या हकीगतीत आपल्या ह्या प्रश्नाबद्दल बऱ्याचशा घटनांचा विचार केला पाहिजे. त्यातली एक घटना ओसापोला ह्या खेड्यात घडून आली. त्या वेळी मी तेथून सुमारे अर्धा मैलावर राहात होतो; व त्यात भाग घेणाऱ्या सर्व लोकांची मला चांगली माहिती होती. तीन भाऊ होते व त्यातला सर्वात मोठा आंधळा होता. सर्वात धाकटा होता तो सुपारी चांगली पक्व होण्याच्या आतच तोडून घेत असे व आंधळ्या भावाला त्याचा वाटा देत नसे. एके दिवशी तो आंधळा संतापला व कोठून तरी एक कुऱ्हाड घेऊन त्याने धाकट्या भावाला जखम केली. तेव्हा मधल्या भावाने भाला घेतला व आंधळ्या थोरल्या भावाला मारून टाकले. तेथल्या गोऱ्या न्यायाधिशाने त्याला बारा महिने तुरुंगवासाची शिक्षा दिली. जमाती-तल्या लोकांना हा एक भयंकर अन्याय झाला असे वाटले. त्यांच्या मते एका भावाने दुसऱ्या भावाला मारणे हा भयंकर गुन्हा व एक अत्यंत दुःखदायक घटना होती हे खास; पण ती एक अंतर्गत बाब होती, तिचा बाहेरच्या जगाशी संबंध नव्हता. त्यांनी फक्त आपले भय, किळस व दया ह्यांचे प्रदर्शन करावे. मी जी हकीगत गोळा केली त्यात आणखीही काही गुन्हे व एक-दोन खून ह्यांची नोंद आहे.

पितृवधाची मात्र एकही घटना मला कळली नाही. पण त्या जमातीतील लोकांच्या मताप्रमाणे बापाचा वध म्हणजे काही विशेष घटना नव्हे. बापाच्या टोळी-बरोबर त्यासंबंधी वाटाघाट करून सौदा करण्याची ती एक बाब समजली गेली असती.

ज्या गुन्ह्यांनी व दुःखकारक घटनांनी जमातीचे जीवन पार उद्ध्वस्त होऊन मुळापासून ढवळून निघते त्याशिवाय इतरही बारीकसारीक घटना दिसून येतात की त्यामुळे वरवर दिसणाऱ्या दृढ आणि शांत पृष्ठभागाखालच्या तीव्र भावनांची कल्पना येते. आपण पाहिलेच आहे की, समाज आपली पारंपरिक ध्येये व वागणुकीचे नियम ठरवतो आणि त्यांचे पालन व्हावे म्हणून भिंती व बंधने उभारतो. पण ह्या बंधनांनीच विरोधी भावना उद्भवतात.

मला अत्यंत आश्चर्य वाटणारी गोष्ट म्हणजे हलके हलके मला कळू लागले की, सर्व समाजात एक गुप्त विचारप्रवाह परंपरा, कायदा व नीतितत्त्वे ह्याच्या विरुद्ध वर्तन करावे असा होता. परंपरेने असे सांगितले आहे की, आईच्याकडे सर्व सत्ता आहे, आईच्या नातेवाइकांचे आपण बांधील आहोत, त्यांचीच बाजू आपण घेतली पाहिजे व त्यांच्यावरच विश्वास टाकला पाहिजे. पण वैयक्तिक जीवनात ज्या शक्तींचा प्रभाव पडतो त्या अशा की, बापाशी मैत्री करावी, त्याच्यावर प्रेम करावे, त्याच्या इच्छा व प्रवृत्ती ह्यांच्याशी आपण जमवून घ्यावे, आणि समाजाचे विवाहविषयक निर्बंध मोडून आपल्याच टोळीमधल्या स्त्रीशी लग्न करावे. आणि ह्या सुप्त शक्तींमुळे भावाभावांत भांडणे होतात, किंवा मामाभाच्यांत वितुष्ट येते. ह्या सर्वांतून असा निष्कर्ष निघतो की, व्यक्तीच्या खऱ्या भावना पारंपरिक मातृप्रधान समाजव्यवस्थेच्या विरुद्ध असतात असे म्हणता येईल.[३]



## प्रकरण ४ थे

# अश्लीलता व लोककथा
## ( Obscenity and Myth )

आता आपण लोककथा व मातृसत्ताक कुटुंबातील परस्परसंबंध ह्यांचा विचार करू. हे क्षेत्र मनोविश्लेषण व मानववंश ह्या दोन शास्त्रांच्या सीमेवर असून त्यावर बरेच काम झालेले आहे. ज्या समाजात पूर्वजांच्या काळासंबंधी गंभीरपणे सांगितलेल्या कथा व केवळ करमणुकीकरता सांगितलेल्या गोष्टी प्रचलित आहेत त्या समाजातील लोकांच्या सुप्त भावनांशी त्या मिळत्याजुळत्या असतात हे शास्त्रज्ञांना बरेच दिवस ठाऊक आहे. फ्रॉइड व त्याचे अनुयायी ह्याशिवाय असेही म्हणतात की, लोककथा ह्या परीकथा व काल्पनिक गोष्टी ह्यांच्या सहाय्याने मनात दाबून टाकलेल्या इच्छांना वाट करून देण्यास उपयुक्त ठरतात. हीच गोष्ट म्हणी, थट्टेच्या गोष्टी, नेहेमी वापरल्या जाणाऱ्या शिव्या ह्यांनाही लागू आहे.

आपण प्रथम ह्या नेहेमींच्या अपशब्दांपासूनच सुरवात करू. त्यांचा गुप्त मनाशी असा संबंध आपण लावता कामा नये की, त्या शिव्या देणाऱ्याच्या किंवा ते खाणाराच्या दाबून टाकलेल्या इच्छांचे ते प्रतीक आहेत. उदाहरणार्थ पौर्वात्य लोकांत किंवा रानटी लोकांतही " गू खाणे " हा अपशब्द बराच प्रचलित आहे ( उदाहरणार्थ : " तू गू खायला कशाला तिकडे गेला होतास ? " ). हाच शब्दप्रयोग जरा वेगळ्या स्वरूपात लॅटिन लोकांतही वापरतात. पण अर्थातच हे शब्द काही सुप्त इच्छापरिपूर्तीचे असणे शक्य नाही. हे शब्द ज्याच्याविरुद्ध वापरले त्याला लाजवणे किंवा त्याला किळस वाटायला लावणे एवढाच त्यांचा उद्देश असतो. वाईट भाषा किंवा शिव्या ह्यांच्या सर्व प्रकारांत तीव्र भावनात्मक शक्यतेचा प्रभाव नेहेमी असतोच. काहींच्यामुळे किळस व लाज ह्या भावना उद्दीप्त केल्या जातात, तर दुसऱ्या काही प्रकारात ज्याला शिव्या द्यायच्या त्याने समाजात निषिद्ध समजलेल्या काही गोष्टी केल्या असे ध्वनित करावयाचे असते; व त्यामुळे त्याच्या भावना दुखवाव्या असतात. ह्यांतच देवासंबंधी अगर इतर पवित्र गोष्टींसंबंधी तुच्छतेने बोलणे ह्याचाही समावेश होतो. ह्या बाबतीत यूरोपीय संस्कृतीने उच्चांक गाठून भाषेत अनेक उत्कृष्ट व गुंतागुंतीचे नमुने तयार केले आहेत. स्पॅनिश भाषेतील Me cago en Dios ( मी देवाला तुच्छ मानतो ) हा वाक्प्रचार जेथेजेथे ही भाषा बोलली जाते तेथे ऐकायला मिळतो. ह्यातच सामाजिक दृष्ट्या खालच्या थराला संदर्भ देणे, तुच्छ किंवा घाणेरड्या समजलेल्या धंद्याचा

नामनिर्देश करणे, गुन्हेगारी सवई असल्याचे विधान करणे इत्यादींचा समावेश होतो. ह्या सर्व गोष्टी समाजशास्त्रदृष्ट्या कुतूहलजनक आहेत. कारण त्यांच्यामुळे त्या विशिष्ट संस्कृतीत सर्वात निकृष्ट दर्जा किंवा अवनती कोणती हे कळून येते.

समाजाने निषिद्ध मानलेल्या अनैतिक लैंगिक संबंध ठेवण्याविषयी शिव्या, बहुतेक आईसंबंधीच्या, ह्यात यूरोपातील स्लाव्ह लोकांचा पहिला नंबर लागतो; व त्यातही रशियन लोक फारच पटाइत आहेत. "योब त्वायू मात" (आपल्या आईशी लैंगिक संबंध ठेव) ही व ह्यासारखी शब्दयोजना नेहेमी ऐकू येते. ह्या प्रकारच्या शिव्या आपल्या दृष्टीने महत्त्वाच्या आहेत; कारण त्यांचा विषय हे एक, व त्यांचा ट्रोब्रियांड लोक बराच उपयोग करतात हे दुसरे. तिथले लोक अनैतिक संबंधां-संबंधी तीन शब्दयोजना करतात : 'क्वोय इनाम' (आपल्या आईबरोबर संयोग कर), 'क्वोय लुमुटा' (आपल्या बहिणीबरोबर संयोग कर) आणि 'क्वोय उम् क्वावा' (आपल्या बायकोशी संयोग कर). ह्या तीन अपशब्दांचे एकत्र येणे हे चमत्कारिक आहे; कारण त्यात नीतिबाह्य संयोग व समाजाने मान्य केलेला संयोग ह्या दोन्ही प्रकारांचा उल्लेख अपमान करण्याकरता व भावना दुखावण्याकरता केलेला आहे. ह्यातील अपमानाची चढी पायरीही लक्षात घेण्यासारखी आहे. आईबद्दलचा उल्लेख चेष्टेने किंवा थट्टेत केला जातो, जसे इंग्रजीत आपण म्हणतो : "Oh go to Jericho" (जेरिको हे बायबलमध्ये उल्लेख केलेले जॉर्डनमधील एक शहर आहे. तुतारी वाजल्याबरोबर त्याच्या भिंती पडल्या अशी कथा आहे.) बहिणीबद्दलचा उल्लेख हा गंभीर अपमान आहे; आणि राग अनावर झाला तरच तो वापरला जातो. पण सर्वात जास्त अपमानकारक शब्दयोजना—जी मी फक्त दोनदाच वापरलेली ऐकली व त्यातल्या एकदा पूर्वी सांगितलेला भावाचा खून पडण्याचे ते एक कारण होते—म्हणजे आपल्या बायकोबरोबर संयोग कर ही असते. ही शिवी इतकी वाईट समजली जाते की मी ट्रोब्रियांडमध्ये खूपच दिवस राहिल्यावर मला ती कळून आली. कोणीही तद्देशीय ती अगदी हळू आवाजात माझ्याजवळ बोले. त्याबद्दल थट्टा करणे तर लांबच राहिले. नीतिनियमांना अनुसरून केलेल्या संयोगाचा अपशब्द म्हणून उपयोग व्हावा ही गोष्ट अत्यंत चमत्कारिक आहे.

अपशब्दांची ही जी एकाहून एक वरचढ अशी मालिका आहे तिच्यामागचे मानसशास्त्र काय आहे? त्यामध्ये ज्या संयोगांचा उल्लेख आहे, त्यांच्या आक्षेपार्हतेशी त्यांचा काही संबंध नाही हे उघड आहे. आईबरोबर संबंध असणे हे सर्वात अधिक निषेधार्ह आहे, पण त्यासंबंधी वापरलेले अपशब्द सौम्य समजले जातात. तसेच विशिष्ट क्रियेने सामाजिक निर्बंध मोडण्याचा व त्या अपशब्दांच्या अपमानकारक प्रतिक्रियेचाही काही संबंध नाही. कारण समाजाने मान्य केलेली व कायदेशीर अशी स्वतःच्या बायकोशी संबंध ठेवण्याची कृती अपशब्दाच्या दृष्टीने सर्वात अपमानकारक समजली जाते. ह्याचे खरे कारण म्हणजे नवरा बायकोमधील संबंध जरी अगदी वाजवी आणि

नेहेमी घडणारे असतात तरी त्यांचा सार्वजनिकरीत्या उल्लेख केल्यामुळे वाटणारी लाज, संताप आणि सामाजिक मानहानी हे आहे. समाजात वागण्याचे, बोलण्याचे जे नियम असतात ते ह्या उल्लेखाने मोडले जातात आणि वस्तुस्थिती अगदी उघड्यानागड्या स्वरूपात लोकांपुढे मांडली जाते. नवराबायकोमधील निकट संबंध सामाजिक नियमांनी बांधलेले असतात– अर्थात बहीण-भाऊ ह्यांच्या नीतिबाह्य संबंधांसारखे नव्हेत– पण त्यांच्यासंबंधी सूचक वागणूक चालवून घेतली जात नाही. नवरा व बायको दोन्ही हजर असताना लैंगिक चेष्टामस्करी किंवा अश्लील भाषा वापरण्यावर बंदी असते. आणि त्या दोघांतील खाजगी व प्रत्यक्ष लैंगिक संबंध असभ्य भाषा वापरून उघड्यावर आणणे हा संवेदनक्षम ट्रोब्रियांड जमातीत मोठा नैतिक गुन्हा समजला जातो. ही मनोरचना संशोधकाच्या दृष्टीने महत्त्वाची आहे; कारण तीमुळे असे उघड होते की, अपशब्द वापरणाऱ्याचा जोर एखाद्या कृतीचा किंवा इच्छेचा वास्तवीपणा व वस्तुस्थिती आणि नेहेमीच्या संकेताप्रमाणे ती दाबून टाकण्याची क्रिया ह्यांवर असतो.

ह्याच मनोरचनेमुळे आई व बहीण ह्यांच्या संबंधीच्या शिव्या किंवा अपशब्द ह्यांचाही अन्वयार्थ लागतो. त्या अपशब्दांत सुचवलेल्या कृतींचा प्रत्यक्षात किती संभव आहे ह्यावरून त्यांची तीव्रता ठरते. आईशी अनैतिक संबंध बहिणीच्या संबंधापेक्षाही निषिद्ध मानला जातो. परंतु आपण पूर्वी पाहिल्याप्रमाणे ह्या जमातीतील नाती आणि लैंगिक संबंध ह्यांच्या विकासात आईशी अनैतिक संबंधाचा जवळजवळ पूर्णपणे अभाव असतो. पण ह्याच्या उलट बहिणीशी संबंध ठेवण्याबद्दलचे निर्बंध इतके कडक असतात की ते मोडून टाकण्याचा मोह अतिशय तीव्र असतो. ह्याच कारणामुळे बहिणीवरून दिलेली शिवी एकदम झोंबते.

ट्रोब्रियांड जमातीतील म्हणींबद्दल लिहिण्यासारखे काही नाही; कारण त्यांच्यात म्हणी नाहीतच. काही प्रातिनिधिक वाक्प्रचार किंवा भाषेतील विशिष्ट शब्दरचना ह्याबद्दल येथे एकच गोष्ट सांगायची म्हणजे "लुगटा" ( माझी बहीण ) हा शब्द जादूटोण्यामध्ये विसंगती किंवा परस्पर तिटकारा व चीड ह्यांकरता वापरला जातो.

आता आपण लोककथा किंवा काल्पनिक गोष्टींकडे वळू. वस्तुस्थितीचा अर्थ सांगण्याकरता त्या वापरल्या जातात आणि चालीरीती व समाजरचना ह्यांच्या उद्देशांची कल्पना देण्याकरता त्यांचा उपयोग केला जातो. ह्या विस्तृत आणि संपन्न वाङ्मयाचे स्पष्ट पण जलद परीक्षण करण्याकरता ह्या कथांचे आपण तीन प्रकार कल्पू : ( १ ) मानवाची उत्पत्ती, समाजाची सर्वसाधारण रचना, विशेषत: कुलचिन्हांनी ( टोटेम ) पडलेले विभाग, आणि सामाजिक उच्चनीच स्थाने; ( २ ) सांस्कृतिक बदल, वीरांच्या कथा, चालीरीतींची प्रस्थापना, सांस्कृतिक वैशिष्ट्य व समाजातील संस्था; ( ३ ) विशिष्ट प्रकारच्या जादूच्या स्वरूपाशी संलग्न असलेल्या लोककथा.[१]

पहिल्या वर्गात आपल्याला प्रथमच त्या समाजाची मातृवांशिक संस्कृती भेटते, म्हणजे मानवाची उत्पत्ती, समाजाची रचना जमातीच्या प्रमुखाची नियुक्ती, कुलचिन्हांनी

केलेले विभाग, आणि निरनिराळी कुले व त्यांचे उपविभाग. ह्या लोककथा अनेक आहेत, कारण प्रत्येक लहानलहान प्रदेशात त्याच्या स्वतःच्या काल्पनिक कथा किंवा त्यांची वेगळी वेगळी रूपे प्रचलित असतात, पण त्या सर्वांची एकत्र जुळलेली एक साखळी बनते. त्या सर्वांत मनुष्यप्राणी भूमीच्या छिद्रातून वर बाहेर आला ही सर्वसामान्य कल्पना आढळते. प्रत्येक टोळीच्या उपविभागाची पृथ्वीतून वर येण्याचे स्थान वेगळे असते. आणि ह्या विलक्षण घटनेच्या वेळी जे जे घडले त्याने त्या टोळीचे हक्क किंवा असमर्थता ठरली गेली. आपल्याला ह्या समजुतीत जे विशेष महत्त्वाचे वाटते ते असे की, ज्या पूर्वजांच्या उत्पत्तीविषयी ह्या कथेत उल्लेख असतो त्यात नेहेमी एक स्त्री असते, कधीकधी तिच्याबरोबर तिचा भाऊ असतो, कधी कुलचिन्हातील प्राणी असतो, पण कधीही त्या स्त्रीचा पती नसतो. काही कथांत ह्या पहिल्या स्त्री-पूर्वजाची उत्पत्ती कशी झाली ते सविस्तर सांगितलेले असते. कधी ती बेसावधपणे पावसात आपले शरीर उघडे करते, कधी एखाद्या गुहेमध्ये ठिबकणाऱ्या पाण्यातील विद्राव्य लवणांच्या निमुळत्या भागाने तिच्या शरिराला छिद्र पडते, तर कधी आंघोळ करताना तिला एखादा मासा चावतो. अशा रीतीने तिचे शरीर "उघडले" जाते आणि एक जीवात्मरूप मूल तिच्या गर्भाशयात शिरते व तिला गर्भधारणा होते.[२] अशा रीतीने पित्याच्या प्रजोत्पादनाच्या क्रियेशिवाय ह्या कथांतून मूळ स्त्रीपासून आपोआप पुढील प्रजा उत्पन्न होते असे वर्णन आहे.

दुसऱ्या कोणत्याही भूमिकेत बापाचा संदर्भ येत नाही. वस्तुस्थिती अशी आहे की, त्याचा कधी उल्लेख येत नाही व पौराणिक विश्वात त्याला स्थानच नाही. ह्या स्थानिक लोककथा अतिशय अविकसित स्वरूपात लोकांच्यापर्यंत पोचलेल्या आहेत. काहींमध्ये एकच घटना असते किंवा कोणाच्या तरी हक्काचे किंवा अधिकाराचे वर्णन असते. ज्यांच्यात काही भांडणाचे किंवा नाट्यपूर्ण घटनेचे वर्णन असते अशा अविपर्यस्त कथांमध्ये नेहेमी एक मातृवांशिक कुटुंब असते आणि त्यामध्ये घडणाऱ्या नाट्यमय घटनांची हकीगत असते. उदाहरणार्थ, दोन भावांचे भांडण होते व ते विभक्त होतात; व ते प्रत्येक एकेका बहिणीला आपल्याबरोबर नेतात. किंवा दुसऱ्या एका लोककथेत दोन बहिणींचे एकमेकींशी पटत नाही, त्या वेगळ्या होऊन दूर जातात व दोन वेगळ्या जमाती प्रस्थापित करतात.

ह्याच वर्गात मोडणाऱ्या दुसऱ्या एका कथेत अमरत्वाचा किंवा अगदी बरोबर सांगायचे म्हणजे कायमच्या तारुण्याचा नाश कशाने झाला ते सांगितले आहे. ते कारण म्हणजे एक आजी व तिची नात ह्यांचे भांडण होऊन आपत्ती ओढवते.

ह्या वर्गातील लोककथात मुख्य मुद्दा म्हणजे मातृवांशिक कुटुंबरचना— म्हणजे आईच्याकडून वंश ठरवणे किंवा आईला विशिष्ट हक्क व स्थान देणे— हा असतो. अर्थातच येथे स्त्रियांच्या भूमिकेला प्राधान्य दिले जाते, नाती स्त्रियांकडून ठरवली जातात, भावाभावांत वितुष्ट येते. थोडक्यात म्हणजे ह्या वर्गातील सर्व लोककथांत

मातृसत्ताक कुटुंब अगदी स्पष्टपणे समजून येते. अशी कथा नाही की तीत नवरा किंवा बाप काही भूमिका बजावतो किंवा नुसते त्याचे अस्तित्व तरी कळून येते. मातृसत्ताक कुटुंब वर्णन करणाऱ्या पौराणिक नाटकात मातृसत्ताक कुटुंबांतील इच्छा व वासना दाबून टाकलेल्या असतात हे मनोविश्लेषण शास्त्रज्ञाला आणखी स्पष्ट करून सांगण्याची जरुरी नाही.

आता आपण दुसऱ्या प्रकारच्या दंतकथांकडे वळू. ह्या कथांत वीरांनी आपल्या पराक्रमाने व साहसाने घडवून आणलेल्या सांस्कृतिक महत्कृत्यांबद्दलच्या हकीगती आहेत. दंतकथांचा हा प्रकार तितका अविकसित नसतो, तर त्यांच्यात प्रसंगांची लांब मालिका असते, आणि त्यांतून नाट्यपूर्ण घटना उद्भवतात. ह्या प्रकारा पैकी सर्वात महत्त्वाची कथा "टुडावा"ची आहे. हा कथानायक एका कुमारिके-पासून जन्मला, कारण तिला एका गुहेच्या छपरापासून वाढणाऱ्या चुनखडीच्या टोकाने (स्टॅलॅक्टाइट) भोसकले गेले होते. ह्या वीराच्या पराक्रमांची वर्णने निरनिराळ्या दंतकथांत वर्णन केलेली आहेत. हे पराक्रम निरनिराळ्या स्थानिक हकीगतीत वेगवेगळे आहेत. त्यानेच शेतीचा शोध लावला, तसेच अनेक चालीरीती व नियम अंमलात आणले, पण त्याच्या स्वतःच्या नीतिमत्तेबद्दल ह्या कथांत फारसा विकास केलेला नाही. पण जे ह्या वीराचे एक कृत्य सर्वांना माहीत आहे आणि जे सर्व दंतकथांच्या पायाभूत वैशिष्ट्यासारखे आहे ते म्हणजे त्याने एका राक्षसाला मारले. त्याची गोष्ट अशी :

ट्रोब्रियांड द्वीपसमूहात मानवजात सुखाने नांदत होती. एकदम डोकोनिकन नावाचा राक्षस त्या बेटाच्या पूर्व भागात आला. तो माणसांचे मांस भक्षण करीत असे, व एका जमातीमागून दुसरी त्याने खाऊन फस्त केली. त्या वेळी त्या बेटाच्या वायव्य भागात लाबाई नावाच्या खेड्यात एक बहीण व तिचा भाऊ असे एक कुटुंब राहात होते. डोकोनिकन राक्षस लाबाई खेड्याच्या जवळजवळ येऊ लागला तेव्हा त्या कुटुंबाने पलायन करायचे ठरवले. पण त्याच वेळी बहिणीच्या पायाला कसली तरी जखम झाली व तिला चालता येईना. तेव्हा तिच्या भावाने तिला तिच्या लहान मुलासह लाबाईच्या किनाऱ्याजवळील एका गुहेत ठेवले व आपण एका होडक्यातून नैर्ऋत्य दिशेला निघून गेला. तो मुलगा आईने वाढवला व प्रथम त्याला भाल्याकरता कोणते लाकूड सर्वात उत्तम ते शिकवले. नंतर तिने त्याला क्वोयगापानी ही जादू शिकवली. तिच्यामुळे मनुष्याची बुद्धी नष्ट होते. हा शूर वीर बाहेर पडला. त्याने प्रथम क्वोयगापानी जादूने डोकोनिकन राक्षसाला भारून टाकले आणि मग त्याचे डोके उडवून त्याला ठार मारले. त्यानंतर त्याने व त्याच्या आईने टारो झाडाच्या मुळी-पासून एक पुडिंग तयार करून त्यात राक्षसाचे डोके घालून ते भाजले. हे भीषण खाद्य बरोबर घेऊन टुडावा आपल्या आईच्या भावाच्या शोधार्थ निघाला. तो त्याला सापडल्यावर त्याने त्याला ते पुडिंग दिले आणि त्याच्या मामाला त्यात डोकोनिकनचे

भयंकर डोके आढळले. भीती व पश्चात्ताप ह्यांनी त्याचे मन भरून आले व आपल्या बहिणीला व तिच्या मुलाला राक्षसाच्या तावडीत सोडून आपण निघून गेलो ह्याचे त्याला वाईट वाटले. त्याबद्दल त्याने पापक्षालनार्थ आपल्या भाच्याला अनेक वस्तू भेटीदाखल दिल्या; पण त्या शूर वीराने त्या सर्व नाकारल्या व शेवटी जेव्हा त्याच्या मामाने आपल्या मुलीशी त्याचे लग्न लावून दिले तेव्हाच त्याचे समाधान झाले. ह्यानंतरही तो प्रवासास निघाला व त्याने अनेक शौर्याची कृत्ये केली, पण प्रस्तुत संदर्भात आपल्याला त्यांचा विचार करण्याचे कारण नाही.

वरील दंतकथेत ज्यांच्यामुळे नाट्यमय घटना घडतात असे दोन प्रकारचे विरोध आहेत : प्रथम म्हणजे राक्षसाची माणसे खाण्याची प्रवृत्ती; आणि दुसरे म्हणजे मामाने आपली बहीण व भाचा ह्यांना टाकून पलायन करणे. ह्यातील दुसरी ही ट्रोब्रियांड जमातीत नेहेमी घडणारी, भावाच्या स्वभावधर्मास अनुसरून असणारी व मातृसत्ताक कुटुंबरचनेशी जुळणारी गोष्ट आहे हे आपण मागे पाहिलेच आहे. अर्थात जमातीच्या नीतिनियमांनी व रीतिरिवाजांनी ती प्रवृत्ती दाबून टाकली जाते एवढेच. आईचा भाऊ हा तिचा व कुटुंबाचा पालक असतो. पण हे कर्तव्य पार पाडणे त्याला कठीण जात असते व त्याच्या पाल्यांना त्याच्याबद्दल आदर किंवा धन्यवाद फारसा वाटत नाही. सर्वांत महत्त्वाचा शूर वीराचा पराक्रम ज्या कथेत आहे तिच्या सुरुवातीलाच आईचा भाऊ म्हणजे मातृसत्ताक कुटुंबाचा प्रमुख आपले कर्तव्य न बजावता आपल्या बहिणीला व तिच्या मुलाला सोडून गेला हे लक्षात ठेवण्यासारखे आहे.

पण हा दुसरा मातृवांशिक विरोध पहिल्या विरोधापासून अगदी पूर्णपणे वेगळा आहे असे मात्र नाही. जेव्हा डोकोनिकन राक्षस मारला जातो तेव्हा त्याचे डोके एका लाकडी बशीवर मामाला दिले जाते. जर त्याला ते डोके पाहून भीती वाटावी एवढीच कल्पना असती तर ते डोके एका पुडिंगमध्ये गुंडाळण्याची काही जरुरी नव्हती. शिवाय डोकोनिकन सर्व मानवी जातीचा शत्रू असल्यामुळे त्याचे डोके पाहून मामाला खरोखर आनंदच व्हायला पाहिजे होता. ह्या सर्व घटनेची पार्श्वभूमी आणि तिच्या मागच्या भावना लक्षात घेतल्या तर मामा आणि तो राक्षस ह्यांच्यात काही तरी संगनमत असावे अशी कल्पना केली तरच ह्या सर्व कथेची संगती लागू शकते. तसे गृहीत धरले तर एका मनुष्यभक्षकाला दुसऱ्या मनुष्यभक्षकाचे डोके खायला देणे हीच त्याला योग्य शिक्षा होऊ शकते. म्हणजे खरोखर त्या कथेत एकच खलनायक व एकच झगडा असून तो दोन अवस्थेत व दोन व्यक्तींच्या रूपाने दाखविलेला आहे. ह्याचा अर्थ असा की, टुडावाच्या गोष्टीत एक प्रातिनिधिक मातृसत्ताक कुटुंबांतील नाट्यपूर्ण घटना असून ती त्या कथेचा गाभा आहे; आणि तिचा तर्कशुद्ध रीतीने अंत केलेला आहे. म्हणून मी एवढेच विधान करून इथेच थांबतो. कारण ह्या कथेतील मुख्य मुद्दयांचे विवेचन मी केले आहे. ह्या कथेच्याबद्दल आणखी काही स्पष्टीकरण मी देत नाही. कारण त्याकरता मला काही ऐतिहासिक व पौराणिक उपपत्त्या पुढे मांडाव्या

लागतील. पण मी एवढेच सुचवू इच्छितो की, डोकोनिकनच्या व्यक्तिस्वाचे पूर्ण स्पष्टीकरण मामाशी त्याच्या असलेल्या संबंधाने करता येत नाही. कदाचित त्याच्याबद्दलची कल्पना एखाद्या पितृसत्ताक संस्कृतीतून मातृवंशीय संस्कृतीत आलेली असेल व कदाचित तो बाप व नवरा ह्यांचा प्रतिनिधी असेल. हे जर खरे असेल तर त्यावरून प्रचलित समाजव्यवस्था व्यक्ती आणि प्रसंग आपल्या विशिष्ट समाजरचनेला कशी बदलून व जुळवून घेते, ह्याचे उत्तम उदाहरण होऊ शकेल.

ह्याच लोककथेतल्या आणखी एका प्रसंगाचा मी फक्त निर्देश करणार आहे. तो म्हणजे गोष्टीच्या अखेरीस झालेले कथानायकाचे मामेबहिणीशी झालेले लग्न. तद्देशीयांच्या सध्याच्या समाज व्यवस्थेत ही घटना अयोग्य समजली जाते; पण नीतिबाह्य संबंध अशी मानली जात नाही.

दुसऱ्या एका लोककथेतील घटनांचा समूह लक्षात घ्यायचा तर एका कथेत दोन भाऊ एका बागेच्या जमिनीबद्दल भांडत असतात. ( हे अर्थात प्रत्यक्षात नेहेमी घडतच असते, ) आणि त्यात मोठा भाऊ धाकट्याला ठार मारतो. ह्या कथेत मोठ्या भावाला काही वाईट वाटल्याचा उल्लेख नाही. उलट त्या नाटकाचा स्वयंपाकविषयक शेवट कसा झाला त्याचे वर्णन आहे. मोठ्या भावाने जमिनीत एक खड्डा खणला. दगड, पाने व जळाऊ लाकडे आणली आणि नुकतेच मारलेले डुक्कर किंवा पकडलेला मासा भाजावा तसे त्याने आपल्या भावाला त्या मातीच्या भट्टीत भाजले. नंतर तो त्याचे मांस एका खेड्यातून दुसऱ्यात असे विकीत गेला व त्याला वास येऊ लागला असे वाटले तर तो ते परत एकदा भाजीत असे. ज्या जमातींनी त्याने देऊ केलेले नाकारले त्या मनुष्यभक्षक झाल्या नाहीत. ज्यांनी ते मांस स्वीकारले त्या पुढे कायम मांसभक्षक झाल्या. ह्या कथेत मनुष्यभक्षण दोन भावांच्या भांडणाचा परिणाम असे दाखवले आहे. तसेच एखादा गुन्हा व पाप करून मिळवलेले अन्न स्वीकारावे की न स्वीकारावे ह्याचाही उल्लेख ह्या कथेत आहे. अर्थात ही दंतकथा मनुष्याचे मांस न खाणाऱ्या जमातीच्यामध्ये प्रचलित आहे हे सांगावयास नकोच. हाच मनुष्यभक्षक व मनुष्यभक्षक नसणाऱ्या जमातीतील फरक **डोबू** येथील तद्देशीय मनुष्यभक्षक तसेच **दांत्रकास्तो** बेटांच्या निरनिराळ्या प्रदेशांतील मनुष्यभक्षक जमाती ह्यांच्यामधील प्रचलित कथांमधून दिसून येतो व माणसाचे मांस खाणे ह्यात काही गैर आहे असे तेथे समजले जात नाही. ह्या गोष्टीत थोडा फरक आहे व प्रत्यक्ष भावाभावांतलेच भांडण आहे की दोन भाऊ व दोन बहिणी ह्यांच्यामधील आहे ते कळत नाही.[२] ह्या दंतकथांत आपल्याला जे महत्त्वाचे वाटते ते म्हणजे त्यांच्या पार्श्वभूमीत मातृवंशिक छाप मोठ्या आणि धाकट्या भावाच्या भांडणात दिसून येतो तो.

अग्नीच्या उत्पत्तीविषयी जी दंतकथा आहे तीत सूर्य आणि चंद्र ह्यांच्या उत्पत्तीचाही थोडा संदर्भ आहे; पण मुख्य म्हणजे दोन बहिणीतील भांडणाचा त्यात उल्लेख आहे. इथे हेही सांगितले पाहिजे की, अग्नीची उत्पत्ती स्त्रीच्या गुप्त इंद्रियातून

झाली असे ह्या कथेत सांगितलेले आहे.

ज्या वाचकाला दंतकथांचा अर्थ मनोविश्लेषणपद्धतीने लावण्याबद्दलची माहिती आहे, तसेच मानसशास्त्र व मानववंशशास्त्र ह्यांवरील सर्वसाधारण लिखाणाची ओळख आहे त्याला माझे विवेचन अगदी साधे व अकृत्रिम असे वाटेल. मी जे काय लिहिले आहे ते दंतकथेच्या बाह्यरूपाबद्दलच आहे. मी त्याबद्दलचा गुंतागुंतीचा अथवा लाक्षणिक अर्थ शोधून काढण्याचा प्रयत्न केलेला नाही. हे मी हेतुपुरस्सर केलेले आहे. ह्याचे कारण असे की, येथे जी उपपत्ती मी विकसित केलेली आहे की, मातृसत्ताक समाजातील झगडे विशिष्ट मातृवंशिक प्रकारचे असतात, तिच्याबद्दल अगदी कोणत्याही प्रकारची शंका मनात राहू नये. शिवाय जर माझे मत बरोबर असले आणि जर समाजशास्त्रीय दृष्टिकोनामुळे आपल्याला लोककथांचा अन्वयार्थ बरोबर लागत असला तर मग वस्तुस्थितीचा काही तरी प्रतीकात्मक किंवा आडवळणाने जाऊन अर्थ सांगण्यापेक्षा प्रत्यक्ष वास्तव स्थितीच पुढे मांडल्याने कार्यभाग साधेल. ह्या पुस्तकाचे लक्षपूर्वक वाचन करणाऱ्या वाचकाच्या हे सहज लक्षात येईल की, जी परिस्थिती आपल्याला मातृवंशिक कुटुंबरचनेमुळे घडून येते हे उघड दिसते तीच परिस्थिती कृत्रिम व प्रतीकात्मक पद्धतीने हाताळून पितृसत्ताक समाजरचनेलाही लावता येईल. आईचा भाऊ व भाचा, ज्यांनी एकमेकाचे संरक्षण करावे, ते खरोखरी एकमेकांना विरोधक समजतात व एक राक्षस दुसऱ्याकडे पहातो तसे पहातात, दोन भावांमधील मनुष्यभक्षक झगडा, ( खरोखर जमातीतल्या कायद्याप्रमाणे दोन भाऊ एकत्र असावयास पाहिजेत ) ह्या सर्वच घटना पितृसत्ताक कुटुंबात घडू शकतील अशा आहेत. फक्त नाटकातील पात्रे वेगळी, नाटकाची रचना वेगळी, ह्यामुळे मातृसत्ताक व पितृसत्ताक कुटुंबातील फरक स्पष्ट होऊ शकतो. ह्या शोकपर्यवसायी नाटकाबद्दलचा समाजशास्त्रीय दृष्टिकोन वेगळा आहे. आपण लोककथांचा मनोविश्लेषणात्मक पाया बदललेला नाही, फक्त त्या अन्वयार्थाचा समाजशास्त्रीय दृष्टिकोन आपण बदललेला आहे. पण हा बदल फार महत्त्वाचा आहे व त्यात मानसशास्त्रीय मूलभूत तत्त्वे गुंतलेली आहेत हे, मला वाटते, पुरेसे स्पष्ट केले आहे.

आता आपण तिसऱ्या प्रकारच्या लोककथांकडे वळू. ह्या लोककथांत आपल्याला सांस्कृतिक पराक्रम व जादू ह्यांचा पाया आढळतो. तद्देशीय लोक जे जे करतात त्या सर्वांत जादूचा महत्त्वाचा भाग असतो. कोणचेही काम करावयाचे असले व ते केवळ आपल्या प्रयत्नांनी साध्य होणार नाही असे त्यांना वाटले तर ते आपल्या मदतीकरता जादूचा उपयोग करतात. वारा किंवा वादळ ह्यांना ताब्यात ठेवणे, होड्या चालवताना येणाऱ्या धोक्यापासून संरक्षण करणे, प्रेमामध्ये यश मिळवणे, समारंभाने व्यापार करणे अगर नृत्य करणे, ह्या सर्वांकरता तद्देशीय लोक जादू किंवा मंत्र वापरतात. दुसऱ्यावर जादूटोणा करणे किंवा प्रकृतीकरता जादू वापरणे ह्या दोहोंचा त्यांच्या सामाजिक जीवनात मोठा वाटा असतो. तसेच बागकाम, मासे पकडणे, होड्या तयार करणे

इत्यादी आर्थिक कृत्ये व योजना ह्यांतही जादू व मंत्र ह्यांचा महत्त्वाचा भाग असतो. जादूमंत्र व लोककथा ह्यांचा अगदी निकट संबंध आहे. लोककथांतील शूर वीरांच्या अंगी जे असामान्य सामर्थ्य असते ते जादूमंत्रामुळेच त्यांच्यात उत्पन्न होते अशी समजूत आहे. सध्याची माणसे व पूर्वीचे पौराणिक वीर ह्यांच्यातला फरक पूर्वीची परिणामकारक जादू आता नाहीशी झाल्यामुळेच उत्पन्न झाला आहे. जर ते पूर्वीचे शक्तिमान मंत्र व परिणामकारक विधी परत वापरता आले तर माणसांना हवेतून उडता येईल, कायम तरुण राहून अमर होता येईल, लोकांना ठार मारून परत जिवंत करता येईल, आणि नेहेमी सुंदर व यशस्वी राहून दुसऱ्याचे प्रेम व स्तुती संपादन करता येईल.

पण केवळ लोककथाच जादू व मंत्र ह्यांपासून आपला प्रभाव मिळवतात असे नाही. जादूटोणाही लोककथांवर अवलंबून असतो. सर्व प्रकारचे जादू, मंत्र व विधी ह्यांना पौराणिक कथांचा आधार असतो. तद्देशीय लोक भूतकाळाविषयी एक गोष्ट सांगतात तिच्यात हे जादूमंत्र माणसाला कसे माहीत झाले आणि त्यांचा प्रभाव कसा पडतो हे दिसून येते. ह्यातच खरोखर लोककथांचा समाजशास्त्रविषयक मुख्य परिणाम अंतर्भूत असावा. कारण लोककथा व दंतकथा ह्या जादूमंत्राच्या साहाय्यानेच समाजात प्रचलित राहात असतात; आणि ज्या अर्थी लोककथा बऱ्याच समाजरचना उचलून धरीत असतात त्या अर्थी त्यांचा त्यावर महत्त्वाचा परिणाम घडून येतो.

आता आपण अशा प्रकारच्या पौराणिक लोककथांतील काही प्रत्यक्ष तपासून पाहू. प्रथम एकच कथा घेऊन तिचा तपशीलवार विचार करावा असे मला वाटते. आणि ह्याकरता उडणाऱ्या होडीची कथा घ्यावी, कारण ती सविस्तर प्रसिद्ध झालेली आहे.[४] ही कथा तद्देशीयांच्या जहाज बांधणीच्या जादूमंत्राच्या संबंधात सांगितली जाते. होडी बांधली जात असताना एक विशिष्ट जादू केली तर ती होडी हवेतून उडू शकते अशा प्रकारची एक लांबलचक कथा सांगण्यात येते. ह्या कथेचा नायक विशिष्ट जादू करणारा पहिलाच ( आणि बहुधा शेवटलाच ) होडी बांधणारा जादूगार होता. त्याच्या देखरेखीखाली एक होडी ( कनू Canoe ) कशी बांधली जाते हे आपल्याला सांगण्यात येते. दक्षिणेकडील पर्यटन करताना ती इतर होड्यांना मागे टाकून पुढे जाते, कारण इतरांना शिडे वापरून पाण्यावर राहावे लागते व ती होडी मात्र हवेतून उडत पुढे जाते आणि अर्थातच तो शूर वीर ह्या मोहिमेत यशस्वी होतो. हा झाला ह्या लोककथेचा आनंददायक प्रारंभ. ह्यानंतर आता शोककारक भाग सुरू होतो. जमातीतील सर्व लोक त्या शूर वीराचा हेवा व द्वेष करतात. ह्यानंतर आणखी एक घटना घडते. त्याच्याजवळ बागेसंबंधीचाही एक जादूमंत्र असतो व त्याच्या मदतीने तो आपल्या शेजाऱ्यांचे नुकसान करू शकतो. सगळीकडे दुष्काळ पडलेला असताना फक्त त्याची बाग चांगली राहते. मग त्या जमातीतल्या लोकांनी ठरविले की त्याला ठार मारले पाहिजे. त्या वीरनायकाच्या धाकट्या भावाला त्याच्याकडून होडीचा व बागेचा जादूमंत्र कळलेला असतो. नव्हे कोणालाच असे वाटले नाही की त्या शूर

वीराला मारले तर ते जादूमंत्र नाहीसे होतील. आणि तो वीर मारला जातो, व तोही कोणा तिऱ्हाइताकडून नव्हे तर त्याच्या धाकट्या भावाकडून. ह्या कथेच्याच दुसऱ्या एका वर्णनात त्या वीराला त्याच्या धाकट्या भावाने व त्याच्या भाच्यांनी मिळून मारले अशी हकीगत आहे. दुसऱ्या एका वर्णनात धाकट्या भावाने त्या वीराला मारल्यानंतर त्याने त्याचे श्राद्ध वगैरे विधी केले. पण त्या कथेचा मुख्य गाभा असा की जेव्हा धाकट्या भावाने होडीवर जादूमंत्र घातला तेव्हा त्याला आढळून आले की त्याला तो सर्व मंत्र कळलाच नव्हता, फक्त त्याचा काही अकार्यक्षम भागच तेवढा कळला होता. अशा रीतीने होडी हवेत उडवण्याची जादू मानवांच्या हातून कायमची नाहीशी झाली.

ह्या लोककथेत मातृवंशीय मनोगंड अगदी प्रामुख्याने दिसून येतो. कथा-नायकाचे कर्तव्य असते की, आपल्याला माहीत असलेली जादू आपला धाकटा भाऊ व आपले भाचे ( मामाचे मुलगे ) ह्यांना शिकवणे. पण तो त्यांना फसवतो व सर्व जादूमंत्र व विधी शिकवता त्यांना तो त्यातला अगदी थोडा भाग शिकवतो. ह्याच्या उलट त्याच्या धाकट्या भावाचे कर्तव्य आपल्या थोरल्या भावाचे रक्षण करणे व त्याच्या मृत्यूचा सूड घेणे, व त्याच्या सर्व कृत्यात सहभागी होणे हे असताना तोच उलट त्याच्या विरुद्धच्या कटात पुढाकार घेतो आणि प्रत्यक्ष भ्रातृहत्येमध्ये सापडतो.

ही लोककथेतील वर्णन केलेली परिस्थिती जर आपण समाजात आढळणाऱ्या वस्तुस्थितीशी ताडून पाहिली तर आपल्याला त्यांच्यात खूपच साम्य आहे असे दिसते. प्रत्येक माणसाचे हे कर्तव्य समजले जाते की, मागील पिढीपासून आपल्याला मिळालेल्या सर्व गोष्टी — कुटुंबातील लोककथा, कुटुंबातील जादू व मंत्र, कुटुंबाची गाणी, तसेच काही वस्तू आणि आर्थिक विधी — आपल्या धाकट्या भावाला किंवा मामाच्या मुलांना दिल्या पाहिजेत. अर्थात जादू, मंत्र, तंत्र वगैरे मोठ्या भावाच्या मृत्यूआधीच दिले पाहिजेत हे उघड आहे. पण मिळकतीतील हक्क आणि अधिकार हेही पुष्कळदा मोठ्या भावाच्या मृत्यूपूर्वीच दिले जातात. ह्यात एक लक्षात ठेवण्या-सारखी गोष्ट म्हणजे, आपल्या मामाकडून किंवा थोरल्या भावाकडून ही जी मिळकत वारसाहक्काने मिळायची तिच्याबद्दल **पोकाला** नावाचा मोबदला द्यावा लागतो व तो पुष्कळदा चांगला भरपूर असतो. आणखी एक गोष्ट लक्षात घेण्यासारखी आहे की, बाप जेव्हा मुलाला आपल्याजवळच्या काही वस्तू देतो त्याबद्दल त्याला काही मोबदला दिला जात नाही. तो केवळ आपल्या मुलावरच्या प्रेमाखातर ही भेट देतो. प्रत्यक्ष समाजजीवनात लोककथेप्रमाणे मोठा भाऊ धाकट्याला फसवल्याची उदाहरणे पुष्कळदा घडतात. जमातीच्या कायद्याप्रमाणे ज्या दोन व्यक्तींच्यात प्रेमाचे, कर्तव्याचे संबंध असावयाचे त्यांच्यात अनिश्चिततेचे व संशयाचे वातावरण असते. कित्येकदा तेथील एखाद्या माणसाकडून जादू व मंत्र मिळवताना मला आढळून येई की, त्याच्या मनात कायम संशय असे की, जादू मंत्र शिकवताना थोरल्या भावाने किंवा मामाने त्यातले काही

हातचे राखून ठेवले की काय, अशा प्रकारचा संशय तो जादूमंत्र जर त्याला आपल्या बापाकडून मिळाला असेल तर त्याच्या मनात कधी येत नाही. महत्त्वाची जादू ज्यांच्या-जवळ आहे अशा सर्व लोकांचा आढावा घेतला तर मला असे दिसून आले की, प्रसिद्ध तरुण जादूगारांपैकी निम्म्याहून अधिकांना त्यांची जादू बापाकडून मिळाली, मामाकडून वारसा हक्काने नव्हे.

ह्या सर्वांवरून असे दिसून येईल की, पौराणिक कथांत व प्रत्यक्ष जीवनात दाबून ठेवलेल्या भावनांचा संबंध आहे. ही परिस्थिती एका मनोगंडाशी संबंधित आहे व जमातीचा कायदा व नीतिनियम ह्यांच्याशी तिचा विरोध आहे. जमातीची पारंपरिक ध्येये अगदी वेगळी आहेत. कायदा व नीतिनियम ह्यांप्रमाणे दोन भाऊ किंवा मामा आणि भाचा हे एकमेकांचे मित्र व मदतनीस आहेत; त्यांच्या सर्व भावना आणि हेतू हे सारखेच असतात. प्रत्यक्ष जीवनात, आणि विशेषतः पौराणिक कथांत ते एकमेकांचे शत्रू असतात. एकमेकांना फसवतात, एकमेकांचा खून करतात, आणि त्यांच्यात प्रेम आणि एकी ह्यांच्याऐवजी संशय आणि शत्रुत्व दिसून येते.

होडीच्या कथेत आणखी एका गोष्टीकडे आपण लक्ष दिले पाहिजे. ह्या कथेच्या उपसंहारात असे सांगितलेले आहे की, त्या कथानायकाच्या तीन बहिणी धाकट्या भावावर रागावल्या, कारण त्याने जादू न शिकताच आपल्या थोरल्या भावाला मारून टाकले. पण त्या बहिणींनी ती जादू आधीच शिकून घेतलेली होती. पण त्या स्त्रिया असल्यामुळे जरी त्यांना उडणाऱ्या होड्या बांधता किंवा चालवता येत नव्हत्या तरी त्या स्वतः चेटकिणींसारख्या हवेतून उडू शकत होत्या. भावाने खून केल्यावर त्या तिघी उडून गेल्या व त्यांतली प्रत्येक निरनिराळ्या प्रदेशात जाऊन स्थाईक झाली. ह्या कथाभागात आपल्याला स्त्रीचे मातृवंशिक वैशिष्ट्य दिसून येते व पुरुषाच्या आधीच स्त्री जादू शिकून घेते असे आढळते. त्या बहिणी त्या कुलाच्या नीति-मत्तेच्या पालक समजल्या जातात. त्यांचा राग गुन्हा केला ह्याबद्दल नसून कुलाच्या संपत्तीचे विच्छेदन झाल्याबद्दल असतो. जर त्या धाकट्या भावाने जादू शिकून घेतल्यानंतर थोरल्या भावाला मारले असते तर त्या बहिणी शेवटपर्यंत सुखाने त्याच्याजवळ राहिल्या असत्या.

दुसरी एक अर्धवट आणि प्रसिद्ध झालेली लोककथा आपण लक्षात घेतली पाहिजे; आणि ती म्हणजे जर होडी वादळात फुटली तर ती वाचवण्याची जादू. दोन भाऊ होते, त्यांतला मोठा भाऊ माणूस होता, व धाकटा भाऊ कुत्रा होता. एके दिवशी थोरला भाऊ मासे पकडायच्या मोहिमेवर जातो, पण तो धाकट्याला बरोबर नेत नाही. कुत्र्याने आपल्या आईकडून जादू शिकून घेतलेली असते व तो पाण्याखालून पोहत मोठ्या भावाच्या मागून जातो. मासे पकडण्यात कुत्र्याला अधिक यश येते. मोठ्या भावाकडून मिळालेल्या वाईट वागणुकीमुळे कुत्रा आपले कुल बदलतो व आपली जादू आपल्या नव्या नातेवाइकांना देतो. ह्या कथेत

प्रथम लक्षात घेण्यासारखी नाट्यमय घटना म्हणजे आई आपल्याजवळची जादू आपल्या दुसऱ्या मुलाला देते. ही स्पष्ट मातृवंशीय वस्तुस्थिती आहे. इथे आई आपले दान प्रत्यक्ष मुलाला देते व बायबलमधल्या गोष्टीप्रमाणे एसाउ आणि जेकब ह्यांच्या आईप्रमाणे बापाला फसवण्याची तिला जरुरी भासत नाही. तसेच वरील कथेत धाकट्या भावाला थोरल्याने फसवले व धाकट्याने त्याविरुद्ध सूड उगवला हीही मातृवंशिक कुटुंबातली प्रातिनिधिक घटना आहे.

आणखी एक महत्त्वाची गोष्ट इथे देणे जरूर आहे. प्रेमाच्या जादूचा उगम हा मातृवंशिक मनोगंडाचा अत्यंत महत्त्वाचा पुरावा आहे. ह्या प्रेमाने पछाडलेल्या लोकांमध्ये मोह पाडण्याची कला, विरुद्ध लिंगी व्यक्तीला खूश करून तिच्यावर छाप पाडणे, ह्याकरता आपल्या सौंदर्याचे, पराक्रमाचे व कलात्मक सामर्थ्याचे प्रदर्शन करणे इत्यादी गोष्टींचा समावेश होतो. एखाद्या उत्तम नृत्य करणाऱ्याच्या किंवा गाणाऱ्याच्या किंवा लढवय्याच्या कलेला एक लैंगिक बाजू नेहमी असते. महत्त्वाकांक्षेचे आकर्षण जरी कितीही शक्तिमान असले तरी प्रेमाकरता पुष्कळ वेळा ती बाजूला सारली जाते. पण इतर सर्व साधनांहून अधिक वरच्या दर्जाची म्हणजे अगदी साधीसुधी व असंस्कृत अशी जादूची कला खूपच प्रमाणात वापरली जाते व सर्व तद्देशीय लोक तिला अत्यंत मान देतात. जमातीला ( मदन, डॉन हुआन, स्त्रियांना वश करणारा तरुण ) आपल्या अंगच्या इतर गुणांपेक्षा आपल्या जादूबद्दलच बढाई मारतो. ज्याला स्त्रिया वश करून घेण्यात फारसे यश मिळत नाही तो उसासे टाकीत म्हणतो : "मला ती खरी जादू ( **काय राइवो** ) माहीत असायला पाहिजे होती रे". तिथले लोक गलितगात्र झालेल्या म्हाताऱ्या कुरूप माणसाकडे बोट दाखवून ते पूर्वी आपल्या जादूमुळे प्रेमात किती यशस्वी झाले ते सांगतात.

ही जादू साधीसुधी नाही. त्यात अनेक कृती असतात व प्रत्येकीचा एक विशिष्ट विधी असतो. ह्या सर्व गोष्टी एका ठराविक अनुक्रमाने कराव्या लागतात तरच त्यांचा इष्ट प्रेमपात्रावर प्रभाव पडतो. इथे हे आधीच सांगितले पाहिजे की, ही जादू मुलीही करतात. आपल्याला हवा तो प्रियकर मिळवण्याकरता, आणि तरुण मुलगे करतात आपल्या आवडीची तरुणी मिळवण्याकरता.

अगदी पहिले सूत्र म्हणजे विधिपूर्वक समुद्रात आंघोळ करण्याशी संबंधित असते. आंघोळ झाल्यावर अंग पुसण्याकरता तद्देशीय लोक स्पंजसारखी काही पाने आपल्या अंगावर घासतात व त्या वेळी जादूमंत्र म्हणून मग ती पाने समुद्राच्या लाटांत टाकतात. लाटांबरोबर ती पाने खालीवर हालतात तसेच प्रेमाच्या माणसाचे अंतरंग भावनांनी हालेल. कधीकधी हा मंत्र पुरेसा होतो, पण तो पुरला नाही तर त्यापेक्षा जास्त प्रभावी मंत्र वापरला जातो. हा दुसरा मंत्र सुपारीवर उच्चारला जातो, व मग ती सुपारी चघळून आपल्या प्रिय व्यक्तीच्या दिशेने थुंकतो. ह्याही मंत्राने काम झाले

नाही तर मग तिसरा आणखी जालीम मंत्र वापरला जातो. हा मंत्र सुपारी किंवा तंबाखू यांच्यावर म्हणून त्यातला काही भाग प्रिय व्यक्तीला खायला किंवा चिलमीत ओढायला दिला जातो. ह्याच्याहीपेक्षा पुढची पायरी म्हणजे उघड्या तळहातांवर मंत्र म्हणून ते हात प्रिय व्यक्तीच्या छातीवर दाबण्याचा प्रयत्न करणे.

ही शेवटची सर्वात जास्त शक्तीची पद्धती मनोविश्लेषणशास्त्रीय आहे असे ही उपमा फार न ताणता म्हणता येईल. वस्तुस्थिती अशी आहे की, फ्रॉइडने स्वप्नांचा लैंगिकतेशी संबंध जोडायच्या आधीच मेलानेशियांतील वायव्येकडच्या तपकिरी रंगाच्या रानटी लोकांच्यात अशा प्रकारच्या कल्पना रूढ होत्या. त्यांच्या कल्पनेप्रमाणे काही विशिष्ट प्रकारच्या जादूने स्वप्ने पडू शकतात. अशा स्वप्नात जी इच्छा होते ती नेहेमीच्या जागत्या वेळच्या आयुष्यात प्रगट होते आणि अशा रीतीने ती स्वप्नातली इच्छा सफल होते. हा प्रकार म्हणजे फ्रॉइडची उपपत्ती बरोबर उलटी करण्यासारखा आहे, पण त्यातली कोणती उपपत्ती बरोबर व कोणती चूक हे ठरवण्याचा मी प्रयत्न करीत नाही. प्रेमाच्या जादूत एक पद्धत आहे की, काही सुवासिक वनस्पती खोबरेल तेलात मिसळून त्यांच्यावर एक मंत्र म्हटला की ते मिश्रण पिण्याने स्वप्ने पडण्याची शक्यता वाढते. जर ह्या जादूगाराला ह्या आपल्या मिश्रणाचा वास आपल्या प्रिय व्यक्तीच्या नाकात जाईल असे करता आले तर त्या व्यक्तीला खासच जादूगाराबद्दल स्वप्न पडेल. ह्या स्वप्नात तिला जे जे काही दिसेल किंवा जे जे अनुभव येतील ते ती अटळपणे प्रत्यक्षात आणण्याचा प्रयत्न करील.

प्रेमाच्या जादूचे जे निरनिराळे प्रकार आहेत त्यात **सुलमवोया** हा इतरांपेक्षा खूपच महत्त्वाचा आहे. तो फारच शक्तिमान आहे असे सर्वांचे मत आहे; आणि जर एखाद्या तद्देशीयाला तो मंत्र व त्याचा विधी शिकून घ्यायचा असेल किंवा आपल्या-तर्फे कोणाकडून तरी करवून घ्यायचा असेल तर त्याला खूपच किंमत द्यावी लागते. हा विधी दोन ठिकाणी केंद्रित झालेला आढळतो. त्यातले एक केंद्र मुख्य बेटाच्या पूर्व किनाऱ्यावर आहे. तेथे एक पोवळ्याच्या वाळूचा सुंदर किनारा आहे आणि पश्चिमे-कडे लांबवर उघडा समुद्र पसरलेला आहे, किनाऱ्याजवळील पोवळ्यांच्या खडकांवर लाटा आपटून पांढऱ्या रंगाने फेसाळतात आणि हवा स्वच्छ असली तर लांबच्या पोवळ्यांच्या खडकांची आकृती दिसू शकते. त्या खडकांच्यातच **इवा** हे बेट आहे व तेच प्रेमाच्या जादूचे दुसरे केंद्र आहे. मुख्य बेटावरचे ठिकाण **कुमिलाब्वागा** ह्या खेड्याची होड्या ठेवण्याची व समुद्रस्नानाची जागा आहे, आणि तिथले लोक त्याला एक पवित्र क्षेत्र असे मानतात. गर्द झाडीच्या पलीकडील चुनखडीच्या गुहेत मूळची शोकपर्यवसायी कथा घडली. ह्या गुहेच्या दोन्ही बाजूंना दोन झरे आहेत व त्यांच्यात अद्यापही मंत्राने प्रेम उत्पन्न करण्याची शक्ती आहे.

समुद्राच्या दोन बाजूंना असलेल्या ह्या स्थळांना जोडणारी जादू व प्रेम ह्यांच्या-बद्दलची एक सुंदर लोककथा आहे. ह्या लोककथेची एक बाजू अशी आहे की, ती

प्रेमाच्या जादूचे अस्तित्व तद्देशीयांच्या दृष्टीने भयंकर असलेल्या एका घटनेशी जोडलेले आहे— म्हणजे बहीणभावांमधील अनैतिक संबंध. ह्या प्रकाराचे यूरोपातील ट्रिस्टान व इसोल्ड, किंवा लान्सेलॉट व गिनेव्हेर, किंवा सीगमुंड व सिगेलिंड ह्यांच्या कथांशी किंवा इतर रानटी समाजांतील तशाच प्रकारच्या कथांशी साम्य आहे.

कुमिलाठवागा खेड्यात मलासी कुळामधील एक स्त्री राहात होती व तिला एक मुलगा व एक मुलगी होती. एके दिवशी ती स्त्री आपला गवताचा परकर कापून बनवत असताना तिच्या मुलाने काही औषधी वनस्पतींवर जादू केली. हे त्याने कुठल्या तरी एका स्त्रीचे प्रेम संपादन करण्याकरता केले. त्याने कवायावागा ह्या तिखट पानां-बरोबर सुलुम्वोया ह्या सुवासिक पानांचे ( मिंट ) मिश्रण करून ते खोबरेल तेलात उकळले व त्यावर मंत्र म्हटला. नंतर ते मिश्रण त्याने केळीच्या टणक पानांच्या भांड्यात घालून ते भांडे गवताच्या छपरात ठेवले आणि समुद्रात आंघोळ करायला गेला. इकडे त्याची बहीण झऱ्यावर नारळाच्या भांड्यातून पाणी आणण्याकरता निघाली. छपरांतल्या ज्या ठिकाणी ते जादूने भारलेले तेलाचे भांडे होते त्याच्या खालून जाताना तिचा त्या भांड्याला धक्का लागून त्यातील काही तेल तिच्या डोक्यावर सांडले. तिने ते आपल्या बोटांनी पुसून टाकले आणि बोटांचा वास घेतला. ती पाणी घेऊन परत आल्यावर तिने आपल्या आईला विचारले, "तो पुरुष कुठे आहे; माझा भाऊ कुठे आहे ?" तद्देशीयांच्या नैतिक कल्पनांप्रमाणे ही गोष्ट फारच भयंकर समजली जाते. कारण कोणत्याही मुलीने आपल्या भावाबद्दल चौकशी करता कामा नये व कधीही त्याच्याबद्दल पुरुष असा उल्लेख करता कामा नये. काय घडले असावे हे आईने ओळखले व ती स्वगत म्हणाली, "हायहाय, माझ्या मुलांना वेड लागले आहे."

ती बहीण आपल्या भावाच्या मागे धावली व तो किनाऱ्यावर जेथे आंघोळ करीत होता तिथे तो तिला सापडला. आपले इंद्रिय झाकण्याकरता वापरण्याचे पान त्याने काढून ठेवले होते. तिने आपला गवताचा परकर काढून बाजूला ठेवला व नागव्याने ती त्याच्याकडे जाऊ लागली. हा भयंकर प्रकार पाहून भाऊ तिच्या-पासून पळून जाऊ लागला. पण **बोकारायवाटा** किनाऱ्याच्या उत्तरेला जो उंच डोंगर आहे तिथे तो अडला. तेव्हा तो परत फिरला व दक्षिण टोकाला जो दुर्गम पर्वत आहे तिथपर्यंत गेला. अशा रीतीने त्या दोघांनी किनाऱ्यावरील झाडांच्या सावलीतून तीन फेऱ्या केल्या आणि दमून गेल्यामुळे भाऊ बहिणीच्या हातात सापडला. नंतर दोघे एकमेकांच्या मिठीत उथळ पाण्यातील कुरवाळणाऱ्या लाटांमध्ये पडून राहिली. नंतर पश्चात्तापाने व शरमेने दग्ध होऊन पण आपल्या प्रेमभावनांचे समाधान न झाल्यामुळे ती बोकारायवाटाच्या गुहेत गेली. तेथे अन्न, पाणी व निद्रा ह्यांशिवाय राहून एकमेकांच्या मिठीत तिथेच मृत्यू पावली. त्यांच्या दोघांच्या शरीरांतून सुवासिक **सुलुम्वोया** ( तद्देशीय मिंट ) वनस्पती उगवली.

**इवा** बेटातील एका माणसाला **किरिसाला** हे ह्या दुःखद घटनेबद्दलचे स्वप्न पडले. त्याने हे दृश्य आपल्यासमोर पाहिले. तो म्हणाला : ती दोघे **बोकारायवाटाच्या** गुहेत मरून पडली आहेत व त्यांच्या शरीरातून **सुलुम्वोया** वाढत आहे. मला गेलेच पाहिजे. त्याने आपली होडी घेतली व आपल्या बेटापासून तो **किटाव्हा** पर्यंत गेला, नंतर तो **किटाव्हा**पासून मुख्य बेटापर्यंत गेला व अखेर त्या दुःखपूर्ण किनाऱ्यावर उतरला. तेथे त्या गुहेवर रीफ-हेरॉन पक्षी घिरट्या घालताना त्याला दिसला. तो गुहेत गेला व त्याला त्या प्रेमी जोडप्याच्या छातीमधून **सुलुम्वोया** वनस्पती वाढताना दिसली. नंतर तो खेड्यात गेला. तेथे आईने आपल्या कुटुंबाच्या बेअब्रूबद्दलची हकीगत सांगितली, तिने त्याला तो जादूचा मंत्र सांगितला व तो त्याने पाठ केला. त्यातला एक भाग **इवाला** नेला व एक भाग **कुमिलाब्वागाला** मागे ठेवला. जाताना गुहेमधील वनस्पतीची काही पाने त्याने तोडली व आपल्याबरोबर घेतली. नंतर तो आपल्या बेटावर म्हणजे **इवा** बेटावर परत गेला. तो म्हणाला : " मी जादूच्या मंत्राचा वरचा शेंडा आणला आहे. त्याची मुळे **कुमिलाब्वागा**लाच आहेत. ती तिथेच राहतील व **काडियुसावासा**च्या आंघोळीच्या किनाऱ्याजवळ व **बोकारायवाटा** च्या पाण्यात राहतील. त्यातल्या एका झऱ्यात पुरुषांनी व एकात बायकांनी स्नान करावे. नंतर इवा बेटाच्या त्या माणसाने जादूचे निर्बंध घातले, तपशीलवार विधी ठरवले आणि अशी अट घातली की, दुसऱ्या कोणाला त्या पवित्र ठिकाणाचा किंवा जादूचा उपयोग करावयाचा असेल तर त्यांनी **इवा व कुमिलाब्वागा** येथील लोकांना भरपूर मोबदला दिला पाहिजे. तसेच जे समुद्रकिनाऱ्यावर जादूचा मंत्र म्हणतात त्यांना एक पारंपरिक अद्भुत गोष्ट दिसते किंवा शकून होतो. लोककथेत असे सांगितले आहे की हे ईवाच्या माणसाने ठरवून ठेवलेले आहे. जेव्हा ही जादू केली जाते व तिचे परिणाम चांगले होतात, तेव्हा उथळ पाण्यात दोन लहान मासे एकमेकांशी खेळताना दिसतात.

येथे मी ह्या लोककथेचा शेवटचा भाग अगदी संक्षिप्त करून सांगितला आहे. कारण तो शब्दशः दिला तर त्यात अनेक समाजशास्त्रीय विधाने आहेत व ती कंटाळवाणी व बढाया मारण्याच्या स्वरूपाची आहेत. जादूबद्दलच्या कथेत नेहमी नुकत्याच घडलेल्या गोष्टींचा संदर्भ येतो, विधींचे वर्णन करताना तांत्रिक तपशील दिला जातो व निषिद्ध मानलेल्या कृतींबद्दल कंटाळवाणा नैतिक उपदेश पाजला जातो, पण कथा सांगणाऱ्या एतद्देशीयाला हा शेवटचा भाग व्यवहार्य व उपयुक्त आणि पुष्कळदा वैयक्तिक महत्त्वाचा वाटतो, व अर्थातच तो त्याला जास्त महत्त्व देतो. मानववंशशास्त्रज्ञालाही आधीच्या कथेपेक्षा ह्या शेवटच्या भागापासूनच खूप शिकण्यासारखे असते. कथेत समाजशास्त्रीय हक्क सांगितलेले असतात. कारण ज्या जादूबद्दल ती कथा असते ती वैयक्तिक मालमत्ता समजली जाते. ती मालकाकडून विशिष्ट नियमांप्रमाणेच दुसऱ्याला देता येते. जादूच्या

मंत्राचे सर्व सामर्थ्य बिनचूक परंपरेत साचवलेले असते. आता ज्याच्याकडे ती जादू आहे त्याचा त्या जादूच्या मूळ मालकाशी कोणता संबंध होता ह्याला फार महत्त्व आहे. काही जादूच्या मंत्रांत तो पूर्वी कोणाकोणाजवळ होता त्यांची नावे घेतली जातात. सर्व विधी आणि जादूचे मंत्र हे अगदी मुळाबरहुकूम आहेत अशी खात्री असावी लागते. आणि लोककथा हा मूळ उत्पत्तीचा व मूळच्या स्वरूपाचा पाया समजला जातो, व वर्तमानातून भूतकाळाकडे त्या कथेच्या मदतीने जाता येते. त्या लोककथेतच जादूची जणू काय वंशावळच दिलेली असते व ती जादूच्या वंशाची सनद समजली जाते.

ह्या संदर्भात जादू आणि लोककथा किंवा दंतकथा ह्यांच्यामागची समाजरचना कशी असते ह्यासंबंधी चार शब्द लिहिणे जरूर आहे. काही प्रकारच्या जादू एका विशिष्ट प्रदेशात केंद्रित झालेल्या नसतात. ह्यात चेटूक, प्रेमाची जादू, सौंदर्याची जादू व कुलाची जादू ह्यांचा समावेश आहे. जादूच्या ह्या प्रकारात पितापुत्र (अथवा जादू देणारा व घेणारा) ह्यांचा संबंध महत्त्वाचा असतो. पण हा संबंध नात्याचा असतो असे नाही. दुसऱ्या काही प्रकारची जादू विशिष्ट प्रदेशाशी निगडित झालेली असते, कधी जमातीच्या विशिष्ट उद्योगधंद्याशी तिचा संबंध असतो, तर कधी तिच्यावर जमातीच्या प्रमुखाचा राजवाडीच्या खेड्यात एकमेव व सर्वश्रेष्ठ असा हक्क असतो. बागेसंबंधीची जादू इथे असते; कारण ती मातीतून जन्माला येते व फक्त मातीवरच तिचा परिणाम घडतो. तसेच शार्क माशाबद्दलची व त्या प्रदेशातील इतर मासे पकडण्याबद्दची जादूही ह्याच प्रकारात मोडते. होडीबद्दलची जादू, दागिने म्हणून वापरायच्या लाल शिंपल्यांची जादू, आणि सर्वांत महत्त्वाची म्हणजे वायागिनी, पाऊस व ऊन्ह ह्यांच्याबद्दलची श्रेष्ठ जादू ही ओमाराकानाच्या जमात प्रमुखांचा विशेष अधिकार म्हणून मानली जाते.

प्रदेशाशी संबंधित असलेल्या ह्या जादूचा प्रभाव जितका त्या मंत्राच्या शब्दांमुळे त्या विशिष्ट स्थळाशी निगडित असतो तितकाच त्या प्रदेशात राहणाऱ्या व ती जादू वापरणाऱ्या लोकांशीही जोडलेला असतो. ह्याचा अर्थ असा की, ती जादू फक्त त्या ठिकाणचीच असते असे नसून मातृवंशीय नात्याच्या माणसात म्हणजे निवडक लोकांच्यातच ती जपून ठेवली जाते. ह्या सर्व घटनांमध्ये जादूबद्दलची दंतकथा व तिचा विशिष्ट प्रदेशाशी संबंध ह्यांचा एकत्र विचार केला म्हणजे आपल्या लक्षात येते की ही एक त्या जमातीला एकत्र बांधणारी समाजशास्त्रीय शक्ती आहे. तिच्यामुळे एकीची कल्पना वाढीला लागते व त्या समाजाला एकच सांस्कृतिक मूल्य देण्यास तिची मदत होते.

वर दिलेल्या गोष्टीत आणि जादूविषयींच्या इतर कथांतही आढळणारे एक वैशिष्ट्य म्हणजे त्यांतील दुश्चिन्हे, भविष्ये, शकुन व अद्भुत चमत्कार. आपल्याला असे म्हणता येईल की, ज्याप्रमाणे एका प्रदेशाशी संबंधित दंतकथा तेथील लोकांचा तिच्यावरील हक्क पूर्वीच्या उदाहरणांवरून शाबीत होतो, त्याचप्रमाणे जादूची दंतकथा

अद्‌भुत चमत्कारांच्या साहाय्याने सिद्ध होते. जादूचा आधार म्हणजे एका विशिष्ट शक्तीवरील विश्वास. ही शक्ती माणसात वास करते व ती परंपरेनेच त्याच्या अंगी येते.[६] ह्या शक्तीची कार्यक्षमता दंतकथेमुळे ठरली जाते, पण अखेर तिची परीक्षा तिच्यामुळे कार्यसिद्धी होते की नाही ह्यावरूनच ठरवली जाते. "त्यांच्या फलावरून तुम्ही त्यांना ओळखा." आधुनिक शास्त्रीय मनुष्याइतकाच असंस्कृत आदिवासी मनुष्यही प्रायोगिक सत्याच्या मदतीने आपल्या ठाम मतास बळकटी आणतो. श्रद्धेची प्रायोगिक परीक्षा आधुनिक असो की रानटी असो, अद्‌भुत चमत्कारांवरच अवलंबून असते आणि जिवंत श्रद्धेने नेहेमीच अद्‌भुत चमत्कार घडतात. कोणताही सुधारलेल्या लोकांचा असा धर्म नाही की ज्यात संत नाहीत, किंवा सैतान व पिशाचे नाहीत; तसेच प्रकाश व चिन्हे नाहीत किंवा श्रद्धा बाळगणाऱ्यांना देव दिसत नाही. स्पिरीटिझम् ( आत्म्यावर विश्वास ठेवणारे मत ), थिऑसफी, ख्रिश्चन सायन्स हे नवे धर्मपंथ किंवा दुसरे धर्मप्रकार ह्या त्या सर्वांच्यात एक गोष्ट सारखीच आहे, म्हणजे ते सर्व निसर्गनियमांविरुद्ध होणाऱ्या असंदिग्ध चमत्कारांवर उभारलेले आहेत. असंस्कृत व रानटी समाजांनाही त्यांचे अद्‌भुत चमत्कारांचे शास्त्र असते आणि ट्रोब्रियांड जमातीत तर जादू व मंत्रतंत्र ह्यांचे निसर्गनियमांविरुद्ध चमत्कार ह्यांचे साम्राज्यच आहे व तेच त्यांचे जादूचे शास्त्र. प्रत्येक प्रकारच्या जादूभोवती लहानलहान छोट्या चमत्कारांची मालिका असते, कधीकधी ते फुगून मोठ्या व ठळक अशा निसर्गनियमांविरुद्ध पुराव्याच्या स्वरूपात दिसतात तर कधी परत लघु स्वरूप धारण करतात, पण ते आजिबात नाहीसे होत नाहीत.

उदहरणार्थ, प्रेमाच्या जादूत एकसारखी तिच्या कार्यक्षमतेबाबत बढाई मारणाऱ्यांच्या बाबतीत अशीही उदाहरणे दिसतात की, अत्यंत कुरूप अशा पुरुषांवर कित्येक सुंदर स्त्रिया भाळलेल्या आढळतात. आणि ह्या प्रकारच्या जादूचा अगदी कडेलोट म्हणजे वर वर्णन केलेली नीतिबाह्य संबंधाची घटना. हा गुन्हा पुष्कळदा **कुमिलाब्वागा** येथे घडलेल्या दंतकथेतील बहीण-भावांमधील अनैतिक संबंधासारखाच अपवाती असल्याचे सांगण्यात येते. म्हणजे आधुनिक काळात घडणाऱ्या अद्‌भुत घटनांची पार्श्वभूमी दंतकथेतच आहे; त्यांचे ते एक प्रमाण स्वरूप मानण्यात येते. आणखी कित्येक इतर कथांतूनही मी संदर्भ देऊ शकेन की त्यांत मूळची पौराणिक दंतकथा आणि आधुनिक श्रद्धेचा पायाभूत अद्‌भुत चमत्कार ह्यांचा निकट संबंध आहे. The Argonauts of the Western Pacific च्या वाचकांना आठवत असेल की, समारंभपूर्वक केलेल्या व्यापाराची छाया आधुनिक चालीरीती व आचार ह्यांच्यावर पडते. पाऊस व हवा, बागकाम व मासे पकडणे ह्या सर्वांमध्ये एक जोराचा प्रयत्न असतो की पूर्वी घडलेला अद्‌भुत चमत्कार थोड्या कमी झालेल्या स्वरूपात का होईना पण जादूमंत्राचे सामर्थ्य सिद्ध करतो.

अखेरीस जादूबद्दलच्या काल्पनिक कथांत विशिष्ट प्रकारच्या आज्ञा, विधी,

निर्बंध आणि सामाजिक नीतिनियम कथेच्या शेवटी नेहेमी दिलेले असतात. जेव्हा एखाद्या माणसाला विशिष्ट प्रकारचा जादूमंत्र ठाऊक असतो व तो माणूस त्याबद्दलची माहिती देत असतो, तेव्हा अर्थातच त्या कथेत आपले स्थान काय हेही काय तो सांगतो. तो स्वतःला त्या जादूमंत्राच्या मूळ संस्थापकाशी एकरूप झाल्याचे धरून चालतो. आपण पाहिले आहे की, प्रेमाबद्दलच्या जादूत जेथे ती मूळची शोककारक घटना घडली ती गुहा, तेथला समुद्रकिनारा, तेथले झरे ह्यांना अतिशय महत्त्व प्राप्त होते; व त्यांच्यात जादूची शक्ती आहे असे समजले जाते. त्या प्रदेशातील स्थानिक रहिवाशांना आता काही त्या जादूवर आपला एकट्याचाच हक्क आहे असा दावा सांगता येत नाही. तरी पण त्या ठिकाणाला चिकटलेली काही वैशिष्ट्ये फार महत्त्वाची समजली जातात. त्या जागेशी संबंधित असा विधी असतो तो अर्थातच त्यांचे लक्ष वेधून घेतो. ओमाराकाना येथील पाऊस व ऊन्ह ह्यांबद्दलची जादू ह्या त्या जमातीच्या मुख्याच्या शक्तीचा आधारस्तंभ आहे. ती लोककथा त्या ठिकाणच्या दोन विशिष्ट भौगोलिक आकर्षणां-वर आधारलेली आहे व आजही त्याच्या विधीत त्यांना स्थान आहे.

सर्व लैंगिक आकर्षण व वश करून घेण्याची शक्ती प्रेमाच्या जादूत साठवलेली आहे अशी समजूत आहे.

शार्क पकडताना व कलाला पकडताना स्थानीय वैशिष्ट्यांना महत्त्व असते. पण ज्या कथांत विशिष्ट स्थानाचा संबंध येत नाही तेथेसुद्धा विधी करण्याची लांबचलांब हकीगत कथेचा महत्त्वाचा भाग म्हणून सांगितली जाते; किंवा त्या कथेतील एखाद्या पात्राच्या तोंडी घातली जाते. दंतकथेतील मार्गदर्शक वैशिष्ट्यांवरून तिचे व्यवहारिक स्वरूप उघड होते, व तिचा विधी, श्रद्धा आणि जिवंत संस्कृती ह्यांच्याशी असलेला संबंध स्पष्ट होतो. दंतकथेला काही मनोविश्लेषणशास्त्रज्ञांनी "मानव वंशाचे ऐहिक स्वप्न" असे म्हटले आहे. हे सूत्र त्याच्या अगदी ओबडधोबड स्वरूपात देखील चुकीचे आहे; कारण वर दाखविलेले त्याचे व्यावहारिक आणि समाजहितकारक स्वरूप ह्या विषयाबद्दल येथे नुसता ओझरता उल्लेख केला आहे, कारण ह्याबद्दलचे सविस्तर विवेचन दुसऱ्या ठिकाणी केले आहे.[७]

ह्या निबंधात मी मातृवंशिक मनोगंडाचा फक्त एका संस्कृतीवर झालेला परिणाम लक्षात घेतला आहे, व त्याबद्दचा अभ्यास मी स्वतः प्रत्यक्ष त्या ठिकाणी जाऊन परिश्रमपूर्वक केला आहे. पण मी त्यातून जे निष्कर्ष काढले ते इतर अनेक क्षेत्रांत लागू होतात. कारण बहीण-भावांमधील नीतिबाह्य संबंध इतर अनेक मातृवंशीय समाजात, विशेषतः पॅसिफिक भागात घडल्याची उदाहरणे आहेत. तसेच मोठा आणि धाकटा भाऊ किंवा मामा आणि भाचा ह्यांमधील द्वेष व स्पर्धा ही जगातल्या पुष्कळ इतर लोककथांची वैशिष्ट्ये असल्याचे दिसून येते.

♠ ♠

## प्रकरण १ ले

# मनोविश्लेषण व समाजाचे शास्त्र ह्यामधील तफावत

मनोविश्लेषणातील ईडिपस मनोगंडाची उपपत्ती सामाजिक किंवा सांस्कृतिक पार्श्वभूमी विचारात न घेता रचून पुढे मांडण्यात आली. अर्थात ही गोष्ट अगदी साहजिक होती; कारण मनोविश्लेषणाचे शास्त्र रुग्णांवर करण्याच्या उपचारांतून निघालेले होते. नंतर ते मज्जातंतुविषयक सर्वसाधारण रोगांना लागू करण्यात आले; त्यानंतर मानसशास्त्रीय सर्वसाधारण उपपत्तीत तिचा विकास झाला. अखेरीस शरीर, मन, समाज व संस्कृती या सर्वच घटना मनोविश्लेषणाच्या आधारे समजून घेता येतील अशी समजूत प्रचलित झाली. अर्थातच अशा तऱ्हेचा दावा सांगणे म्हणजे फाजील महत्त्वाकांक्षा होय. पण त्याची थोडीफार सत्यता जरी पडताळून पहावयाची झाली तरी मनोविश्लेषणातील तज्ज्ञ व इतर शास्त्रातील तज्ज्ञ ह्यांच्या मनापासून केलेल्या सहकारानेच ते शक्य होईल. हे दुसऱ्या शास्त्रातले तज्ज्ञ मनोविश्लेषणशास्त्राची मूलतत्त्वे शिकले असतील व त्यांना संशोधनाच्या नव्या दिशा सापडल्या असतील. ह्याच्या बदली ह्या तज्ज्ञांनी आपल्या शास्त्रांतील खास ज्ञान मनोविश्लेषण-शास्त्रज्ञांना दिले असेल.

दुर्दैवाने त्या नव्या शास्त्राचे समजून व शहाणपणाने स्वागत झाले नाही. उलट बऱ्याचशा तज्ज्ञांनी ह्या नव्या शास्त्राकडे दुर्लक्ष तरी केले, नाही तर कडवा विरोध केला. ह्यामुळे आपल्याला जे दृश्य दिसते ते एका बाजूला मनोविश्लेषण-शास्त्रज्ञांचा कडक व गुप्त एकांतवास आणि दुसऱ्या बाजूला मानसशास्त्राला निर्विवाद मिळालेल्या एका मौल्यवान सुधारणेबद्दल अज्ञान.

हे पुस्तक म्हणजे मानववंशशास्त्र व मनोविश्लेषणशास्त्र ह्यांमध्ये सहकार्य करण्याचा प्रयत्न आहे. मनोविश्लेषण शास्त्राच्या बाजूने अशा तऱ्हेचे प्रयत्न पूर्वी झालेले आहेत व त्याचे एक उदाहरण म्हणून मी डॉ. अर्नेस्ट जोन्स[1] ह्यांच्या एका चित्तवेधक निबंधाचा उल्लेख करीन. ह्या निबंधाला विशेष महत्त्व आहे; कारण त्यात १९२४ मध्ये[2] प्रस्तुत पुस्तकाचा पहिला भाग दोन प्राथमिक लेखाच्या स्वरूपात प्रसिद्ध झाला तेव्हा त्यावर टीका आलेली होती. डॉ. जोन्स ह्यांच्या निबंधावरून आदिवासी समाजा-कडे पाहण्याचा मनोविश्लेषण व मानववंशशास्त्र ह्या दोन शास्त्रांतील तज्ज्ञांचा दृष्टिकोन किती वेगळा आहे हे स्पष्ट होईल. ह्याकरता हे विवेचन विशेष महत्त्वाचे आहे; कारण डॉ. जोन्सना मेलानेशियन समाजातील कायद्याचे गुंतागुंतीचे प्रश्न व

त्यांचे नात्याचे संबंध यांविषयीची माहिती आहे, व त्यावरून मानववंशशास्त्रविषयक प्रश्नांचे त्यांचे ज्ञान सखोल असल्याचे दिसून येते.

येथे डॉ. जोन्स ह्यांच्या मतांचे थोडक्यात वर्णन करणे उपयुक्त ठरेल. त्यांच्या निबंधाचा उद्देश असा आहे की, मातेच्या हक्काबद्दल ( मातृसत्ताक कुटुंबव्यवस्थेबद्दल ) मनोविश्लेषणात्मक उपपत्ती पुढे मांडणे व काही असंस्कृत आदिवासी समाजांत प्रजोत्पादनामध्ये पित्याच्या स्थानाबद्दलचे अज्ञान ह्यांचाही अन्वयार्थ लावणे. मनोविश्लेषणशास्त्रज्ञांच्या मताप्रमाणे वर ज्या दोन घटना दिल्या आहेत त्यांचे नुसते वरवर निरीक्षण करून भागत नाही. म्हणजे असे की, असंस्कृत रानटी लोक प्रजोत्पादनाबद्दल आपली मते जेव्हा पुढे मांडतात तेव्हा ते अशा प्रकारची बिनचूक सांकेतिक भाषा ( सिम्बॉलिझम् ) वापरतात की त्यांना, निदान त्यांच्या मनाच्या सुप्त भागात तरी सत्य परिस्थितीचे ज्ञान असले पाहिजे; आणि पितृत्वाच्या ह्या दाबून ठेवलेल्या ज्ञानाचा मातृसत्तेशी अगदी निकट संबंध असला पाहिजे. कारण दोन्हींच्या मागचा उद्देश एकच असतो; म्हणजे वाढ होणाऱ्या मुलग्याचा आपल्या बापाबद्दल वाटणारा द्वेष दुसरीकडे वळवणे.

ह्या उपपत्तीच्या समर्थनार्थ डॉ. जोन्स ट्रोब्रियांड बेटात जमवलेल्या माहितीचा बराच उपयोग करतात; पण त्यांचे निष्कर्ष माझ्या निष्कर्षांशी जुळत नाहीत. विशेषतः मध्यवर्ती कल्पना, म्हणजे ज्या विशिष्ट संस्कृतीचे निरीक्षण केले तिच्या समाजरचनेतील केंद्रित कुटुंबपद्धतीची आकृती ठरवणे. डॉ. जोन्स फ्रॉइडच्या ईडिपस मनोगंडाच्या उपपत्तीला एक मूलभूत व कायम अस्तित्वात असणारी घटना मानतात. त्यांचे मत असे आहे की, आईविषयीचे प्रेम व बापाविषयीचा द्वेष हयांपैकी दुसरी प्रवृत्ती खूपच अधीक शक्तिमान असते, व ती मनात दाबून टाकली जाते. हयातून पळवाट म्हणून आपल्या जन्माशी बापाचा काही संबंधच नाही; " आईशी लैंगिक संबंधात बापाची भूमिका नाकारणे व त्यामुळे त्याच्याविषयी वाटणारा द्वेष थोडा कमी करून दुसरीकडे वळवणे " हा मार्ग स्वीकारला जातो पण एवढ्याने बापाचा विचार मनातून काढून टाकता येत नाही. " त्याच्याबद्दलची भीती, आदर आणि दाबून ठेवलेली शत्रुत्वाची भावना ही सर्व बापाच्या मनातल्या स्वरूपाशी एकरूप झालेली असतात " व " हया भावना रानटी लोकांच्या द्विधा प्रवृत्तीमुळे मनाला पछाडतात; " आणि त्यांना कशी तरी वाट करून देणे जरूरच असते. म्हणून हयाकरता मामाची निवड केली जाते व त्याच्यावर मनातला सर्व राग ओतला जातो. म्हणजे एका अर्थी तो दुसऱ्याच्या ठिकाणी अपराधी समजला जातो व अधिकार गाजवणारा पुरुष म्हणून सर्व पापे त्याच्यामाथी मारली जातात आणि मग कुटुंबात बापाशी मित्रत्वाचे व सुखावह संबंध ठेवता येतात. अशा रीतीने मुळात बापाबद्दल जी भावना होती तिची विभागणी होऊन एका बाजूला दयाळू व प्रेमळ प्रत्यक्षातील बाप आणि दुसऱ्या बाजूला कडक शिस्त पाळणारा नैतिक मामा " असे दृश्य दिसते थोडक्यात सांगायचे

म्हणजे, मातृसत्ताक पद्धती व अज्ञान ह्या दोहींमुळे बाप आणि मुलगा ह्यांचे आई-बद्दलची स्पर्धा आणि विरोध ह्यांपासून संरक्षण होते. ह्याचा अर्थ असा की, डॉ. जोन्स ईडिपस मनोगंडाला मूलभूत समजतात. आणि "मातृवंशीय पद्धती व तिच्याशी संबंधित मामाचे अस्तित्व ...... ही अगदी प्रारंभीच्या ईडिपस प्रवृत्तींच्या विरुद्ध अशा संरक्षणाच्या स्वरूपात उत्पन्न झाली"

ही सर्व मते ह्या पुस्तकाच्या पहिल्या दोन भागांच्या वाचकाला बरीच ओळखीची वाटतील व त्यांतील मुख्य मुद्दे तर्कशुद्ध आहेत असेही त्याचे मत होईल. मी मात्र डॉ. जोन्स ह्यांनी जे मत पुढे मांडले आहे की, मातृसत्ता व प्रजोत्पादनातील पित्याच्या कर्तृत्वाबद्दलचे अज्ञान ही "वाढत्या मुलाला आपल्या बापाबद्दल वाटणाऱ्या शत्रुत्वाची भावना दुसरीकडे वळवण्याकरिता उत्पन्न झालेली आहेत" ह्याला दुजोरा देऊ शकत नाही. मला वाटते, ह्या विधानाचे मानववंशशास्त्रदृष्ट्या निरनिराळ्या प्रदेशांत परीक्षण केले पाहिजे. एवढे मात्र खरे की, वरील मत मी मेलाने-शियात जी वस्तुस्थिती निरीक्षण केली आणि इतर पुस्तकांच्या वाचनाने मला जी माहिती मिळाली तिच्याशी सुसंगत आहे. जर आणखी संशोधन केल्यानंतर डॉ. जोन्स ह्यांच्या मताला पुष्टी मिळाली— आणि मला आशा आहे व मला असे वाटतेही की तशी ती मिळेल—तर मग माझ्या संशोधनाचे महत्त्वही निःसंशय वाढेल. कारण एकाच विशिष्ट घटनेकडे मी शास्त्रज्ञांचे लक्ष वेधले असे न होता माझ्या सुदैवाने मी एका सर्व-साधारण लागू पडणाऱ्या व आनुवंशिकतेसंबंधी महत्त्वाच्या घटनेचा शोध लावला असे सिद्ध होईल. एका दृष्टीने पाहता डॉ. जोन्स ह्यांची उपपत्ती मी काढलेल्या निष्कर्षां-चाच धाडसी आणि नवीन असा विस्तार आहे. म्हणजे मातृसत्ताक कुटुंबातील मनोगंड ईडिपस मनोगंडाहून वेगळा असला पाहिजे; मातृसत्ताक कुटुंबात बापाबद्दल वाटणारा द्वेष नाहीसा होऊन तो मामावर केंद्रित होतो; नीतिबाह्य लैंगिक संबंधाचे आकर्षण आईच्याऐवजी बहिणीकडे वळवले जाते.

डॉ. जोन्स एकंदर परिस्थितीचा सामग्र्याने विचार करतात, व मी त्यांच्याशी एकमत आहे एवढेच नव्हे, तर ते त्यात कार्यकारणभाव शोधून त्याचा तत्त्वज्ञान-विषयक विचार करतात. त्यांच्या मते मनोगंड हे कारण आहे, आणि सर्व समाजरचना हा त्याचा परिणाम आहे. डॉ. जोन्स यांच्या निबंधात व लोककथांच्या मनोविश्लेषणात्मक इतर सर्व लिखाणात ईडिपस मनोगंड हा सर्व समाजांत असतोच असे गृहीत धरलेले असते. जणू काय तो समाजाच्या संस्कृतीपासून, समाजरचनेपासून व त्यासंबंधीच्या विचारांपासून अगदी स्वतंत्र असतो असे समजले जाते. जेथे जेथे लोककथेत आपल्याला दोन पुरुष एकमेकांचा द्वेष करतात असे आढळते तेव्हा तेव्हा त्यातील एक बापाची भूमिका करतो व दुसरा मुलग्याची भूमिका करतो असेच समजण्यात येते. मग त्या समाजात बाप व मुलगा ह्यांच्यात वितुष्ट येण्यास काही कारण असो वा नसो. तसेच पौराणिक कथांतून मनात दाबून ठेवलेल्या किंवा नीतिबाह्य भावना, ज्या आपल्याला

नेहेमी सापडतात, त्या आई आणि मुलगा ह्यांच्या लैंगिक संबंधाबद्दल असतात असेही गृहीत धरण्यात येते. पण त्या विशिष्ट समाजरचनेत ही भावना अशक्य असते हे सहज दाखवता येण्यासारखे आहे. म्हणून डॉ. जोन्स वर उल्लेखिलेल्या निबंधात म्हणतात की, माझे निष्कर्ष जरी "शुद्ध वर्णनात्मक दृष्ट्या" बिनचूक असले तरी समाजशास्त्र व मानसशास्त्र ह्यांचा मी जो संबंध जोडतो व ज्यावर मी भर देतो, तो "अगदी संशयास्पद" आहे. आणि पुन्हा "जर संशोधनाच्या निष्कर्षांच्या समाजशास्त्रीय बाजूकडेच लक्ष केंद्रित केले" तर माझा दृष्टिकोन "सोपा आणि सरळ भासेल, कदाचित वरवर दिसायला वाजवी" असाही वाटेल. पण त्याचे कारण मी "ह्या प्रश्नाच्या आनुवंशिक बाजूकडे पूर्ण लक्ष दिले नाही." ह्याचा परिणाम असा झाला की, मी "सुप्त मनाच्या संपूर्ण व तपशीलवार ज्ञानाकडे दुर्लक्ष केले व परिस्थितीच्या निरनिराळ्या दिशांनी विचार केला नाही." डॉ. जोन्स ज्या निष्कर्षाला येतात तो माझ्या मताला चिरडून टाकणारा आहे. तो निष्कर्ष असा—"मालिनौस्कीच्या निष्कर्षांच्या बरोबर विरुद्ध निष्कर्ष सत्याच्या जास्त जवळ आहे."

माझ्या मते मनोविश्लेषणाचे सिद्धांत व प्रयोगसिद्ध मानववंशशास्त्र किंवा समाजशास्त्र ह्यांच्यात वर दिलेल्या उताऱ्यात आढळतो तसा मूलगामी विरोध नाही. मनोविश्लेषणाचा संस्कृतीबद्दलच्या प्रायोगिक संशोधनाशी किंवा मानववंशशास्त्रातील वर्णनात्मक वस्तुस्थितीशी असलेला संबंध तुटावा असे मला वाटत नाही; त्यांची एकमेकांना मदत झाली पाहिजे. मला असे वाटत नाही की, मी समाजशास्त्रीय मूलतत्त्वांवर जादा भर दिलेला आहे. मी ह्या गोष्टी कौटुंबिक मनोगंडाच्या सूत्रात बसवण्याचा प्रयत्न केला आहे; पण जीवशास्त्रीय, मानसशास्त्रीय किंवा सुप्त मनातील घटनांचे महत्व कमी मानलेले नाही.

♠ ♠

## प्रकरण २ रे

# दाबून ठेवलेला मनोगंड

माझा मुख्य मुद्दा डॉ. जोन्स ह्यांनीच संक्षिप्त रीत्या पुढे मांडलेला आहे. " केंद्रित कुटुंबाचा मनोगंड कोणत्याही जमातीत असणाऱ्या कुटुंबरचनेप्रमाणे बदलत असतो. त्यांच्या ( म्हणजे मालिनौस्की यांच्या ) मनाप्रमाणे अज्ञात अशा सामाजिक व आर्थिक कारणांमुळे मातृवंशिक कौटुंबिक रचना उद्भवते आणि मग केंद्रित मनोगंडा-मुळे बहीण भावांमधील आकर्षण व मामा भाच्यांमधील द्वेष उत्पन्न होतो. जेव्हा ही कुटुंबपद्धती बदलून पितृवंशीय पद्धती सुरू होते तेव्हा आपल्याला माहीत असलेला ईडिपस मनोगंड उघडपणे दिसू लागतो." हे सर्व वर्णन माझ्या मतांचे बरोबर वर्णन आहे, पण डॉ. जोन्स माझ्या पूर्वी प्रसिद्ध केलेल्या मतांच्या जरा पलीकडे गेलेले आहेत. मी प्रत्यक्ष क्षेत्रसंशोधन करीत असल्यामुळे मी " शुद्ध वर्णनात्मक पातळीवर " राहिलो आहे, पण प्रस्तुत भागात मी माझे आनुवंशिकतेबद्दलचे विचार पुढे मांडण्याची संधी घेणार आहे.

मी पूर्वी सांगितल्याप्रमाणे अडचणीचा मुख्य गाभा असा आहे की, डॉ. जोन्स व इतर मनोविश्लेषणतज्ज्ञ ह्यांच्या मते ईडिपस मनोगंड ही एक न बदलणारी व सर्वत्र आढळणारी अशी घटना आहे, व ती म्हणजे सर्व भावनांचा उगम व त्यांच्याच शब्दात **फॉन्स एट् ऑरिगो** ( Fons et origo ) म्हणजे सर्व गोष्टींचा उगम व आरंभ आहे. ह्याच्या उलट माझ्या मते लहान कुटुंबातील मनोगंड हा त्या समाजाच्या रचनेचा व संस्कृतीचा परिणाम असतो. त्या समाजात लैंगिक संबंधांवर जी नियंत्रणे असतात आणि ती अमलात आणण्याकरिता अधिकार कोणाकोणाला व किती प्रमाणात दिलेले असतात त्यावर तो मनोगंड अवलंबून असतो. मनोगंडच सर्व संस्कृतीचे, समाजव्यवस्थेचे व श्रद्धेचे एकमेव उगमस्थान आहे हे हा मी खरे मानू शकत नाही तसेच हा ईडिपिस मनोगंड सर्व तत्त्वज्ञानाचे मूळ असून तो इतर सर्व घटना उत्पन्न करतो, त्यांच्यातून उत्पन्न झालेला नाही, सर्वांचे तो मूळ आहे, दुसऱ्या कशामुळे तो अस्तित्वात आलेला नाही ही कल्पनाही मला अमान्य आहे.

डॉ. जोन्स ह्यांच्या निबंधातले मी आणखी काही उतारे देणार आहे; म्हणजे त्यातल्या समजण्यास कठीण अशा कल्पना व अंतर्विरोध अधिक स्पष्ट होईल. रानटी लोकांच्या चालीरीतींची जुन्या जमान्यातील मनोविश्लेषणशास्त्रज्ञ कशा रीतीने चर्चा करतात हे त्यामुळे स्पष्ट होईल.

जरी " मूलभूत ईडिपस मनोगंड " प्रत्यक्षात उदाहरणार्थ मातृवंशिक समाजात खरोखर नसतो तरी कुठे तरी लपून छपून असतोच. " जिच्याशी संबंधाचा निषेध केलेला असतो ती बहीण ही केवळ आईच्या बदली असते; जसा मामा बापाची जागा घेतो त्याचप्रमाणे दुसऱ्या शब्दात सांगायचे म्हणजे ईडिपस मनोगंडाच्या पुढे एक पडदा पडतो व तो त्याच्या आड दडून बसलेला असतो, किंवा त्याच्यावर दुसऱ्या काही निराळ्या रंगांचे आवरण पडून तो झाकला जातो. प्रत्यक्षात डॉ. जोन्स हे ह्याहूनही जोरदार शब्दरचना वापरतात व " तो मनोगंड दाबून टाकला जातो " व " तो दाबून टाकण्याकरता काय काय उपाय योजले जातात व तो दाब कसा कायम ठेवला जातो " ह्याबद्दल ते लिहितात. आणि इथेच प्रथम पहिली दुर्बोधता प्रगट होते. मला जी माहिती आहे तीनुसार मनोगंड हा मनाची भूमिका, व भावना ह्यांपासून बनतो, तो काही प्रमाणात उघड दिसू शकतो तर काही प्रमाणात मनात सुप्त स्थितीत असतो पण त्याचे अस्तित्व अंतर्मनातच असते. अशा तऱ्हेचा मनोगंड मनोविश्लेषणाच्या साहाय्याने व त्याच्या कार्यक्षम पद्धतींनी समजून घेता येतो; तसेच पुराणे, लोककथा आणि सुप्त मनाच्या सांस्कृतिक प्रकटीकरणांच्या साहाय्याने त्याचे ज्ञान होते. डॉ. जोन्स हे कबूल करतात की, ईडिपस मनोगंडाच्या विशिष्ट भूमिका उघड्या ( बाहेरच्या ) किंवा सुप्त मनात दिसत नाहीत; जर सिद्ध झाल्याप्रमाणे ट्रोब्रियांड लोककथांत किंवा स्वप्नांत किंवा काल्पनिक दृश्यांत किंवा दुसऱ्या कोणत्याही चिन्हांत ईडिपस मनोगंडाचा मागमूसही नसला व त्याच्या जागी दुसराच मनोगंड असला तर मग तो अंतर्मनात दडून बसला आहे असे कसे म्हणता येईल ? अंतर्मनाच्याही आत आणखी एक अंतर्मन आहे की काय ? आणि दाबून धरलेला दाब ह्याला काय अर्थ आहे ? ही सर्वच विचारसरणी नेहेमीच्या मनोविश्लेषणाच्या उपपत्तीच्या पलीकडे जाते आणि आपल्याला अज्ञात अशा क्षेत्रात नेते. मला अशी शंका आहे की हे क्षेत्र तत्त्वज्ञानाचे आहे, शास्त्रीय संशोधनाचे नाही.

मनोगंड दाबून टाकण्याकरता जे उपाय व जी साधने उपयोगात आणली जातात तिकडे आता आपण वळू. डॉ. जोन्स यांच्या मते हे उपाय पुढीलप्रमाणे असतात : नात्याचे संबंध व सामाजिक संबंध वेगळे करणे व त्याकरता प्रत्यक्ष जन्माबद्दल नकारात्मक भूमिका घेणे, प्रजोत्पादनात बापाचा काहीच संबंध नाही असे मत प्रदर्शित करणे इत्यादी. इथे मला आधीच सांगितले पाहिजे की, ह्या बाबतीत मी डॉ. जोन्स ह्यांच्याशी सर्वसाधारणपणे सहमत आहे, पण अर्थात तपशिलाबाबत त्यांचे-माझे काही मतभेद आहेत. उदाहरणार्थ, प्रजोत्पादनात बापाचा काही संबंध नाही असे हेतुपुरस्सर विधान केलेले असेल असे मला वाटत नाही. कारण माझी अशी खात्री आहे की, ज्याप्रमाणे पचनक्रिया, शरिरातील ग्रंथींतील स्रावाचा उद्भव, वयाप्रमाणे होणारा शरिराचा ऱ्हास— थोडक्यात म्हणजे शरिरातील सर्व क्रिया ह्यांच्या अज्ञानाप्रमाणेच प्रजोत्पादनाबद्दलचे अज्ञानही नैसर्गिक आहे. संस्कृतीच्या अगदी खालच्या

पातळीवरच्या लोकांना फक्त प्रजोत्पादनाबद्दल व गर्भाच्या वाढीबद्दल तेवढी माहिती असते व शरिरातील इतर घटनांबद्दल व त्यांच्या कारणांबद्दल काहीच माहिती असत नाही असे मानण्यास काहीएक कारण नाही, असे मला वाटते. पण संस्कृतीमध्ये शारिरिक व सामाजिक संबंध हे एकमेकांपासून अगदी स्वतंत्र असतात ही गोष्ट आदिवासी समाजात फार महत्त्वाची असते हे मी लवकरच अधिक विस्ताराने दाखवून देणार आहे.

प्रजोत्पादनात पित्याची भूमिका कोणती ह्या बाबतीत डॉ. जोन्स ह्यांच्या विवेचनात थोडा अंतर्विरोध आहे असे मला वाटते. एका ठिकाणी आपल्याला सांगण्यात येते : " एका बाजूला प्रजोत्पत्तीमध्ये बापाच्या भूमिकेबद्दलचे अज्ञान व दुसऱ्या बाजूला मातृसत्ताक कुटुंबरचना ह्यांचा अत्यंत निकट संबंध आहे. माझे मत असे आहे की, ह्या दोन्ही घटना एकाच मूळ हेतुमुळे उद्भवतात. त्यांचा कालानुक्रम काय असू शकेल हा अगदी वेगळा प्रश्न आहे, व त्याचा नंतर विचार केला जाईल. ह्या दोन्ही घटनांचा मूळ हेतू म्हणजे **वाढणाऱ्या मुलाच्या मनातील आपल्या बापाबद्दलचा मत्सर दुसरीकडे वळवणे** " हा मुद्दा महत्त्वाचा आहे; पण डॉ. जोन्सना त्याबद्दल खात्री वाटत नाही. कारण दुसऱ्या एका ठिकाणी ते आपल्याला सांगतात की : " रानटी समाजाचे बापाच्या प्रजोत्पादनामधील भूमिकेबद्दलचे अज्ञान किंवा ते ज्ञान दाबून टाकणे मातृसत्ताक कुटुंबाशी संलग्न आहे असे समजण्याचे कारण नाही. पण हे उघड आहे की, त्यामुळे वर सांगितलेल्या मूळ हेतूंना जोराचा आधार मिळून मातृसत्ताक पद्धती अंमलात येते " वर मी. जी डॉ. जोन्स यांची दोन वाक्ये उद्धृत केली आहेत त्यांच्यातील संबंध स्पष्ट होत नाही. आणि दुसरे वाक्य जरी तितके बरोबर नसले तरी पहिल्या वाक्यातील " अत्यंत निकट संबंध." (Closest Collateral relationship) ह्याचा नक्की अर्थ काय हे जर लेखकाने अधिक स्पष्ट केले असते तर बरे झाले असते. ह्याचा अर्थ असा आहे का, की पितृत्वाबद्दलचे अज्ञान व मातृसत्ता ही दोन्ही मूळ कारणाचे म्हणजे ईडिपस मनोगंडाचे **आवश्यक** परिणाम आहेत, की ती दोन्ही त्या मनोगंडाशी दिलेल्या बंधनांनी जोडलेली आहेत? असे जर असेल तर कोणत्या परिस्थितीत ईडिपस मनोगंड दाबून ठेवल्यामुळे पितृत्वाचे अज्ञान आणि मातृसत्ताक पद्धती अस्तित्वात येतात व कोणत्या परिस्थितीत ती येत नाहीत? अशा तऱ्हेची प्रत्यक्ष जमवलेली माहिती नसेल तर डॉ. जोन्स ह्यांचा सिद्धांत म्हणजे एक संदिग्ध सूचना आहे एवढेच म्हणता येईल.

विचाराच्या मुद्द्यांचा समाचार घेतल्यानंतर आपण " मूलगामी कारणा " कडे वळू. आपण वर पाहिलेच आहे की, हे मूलगामी कारण म्हणजे आनिर्बंध व आनुवंशिकतेच्याही पलीकडचा ईडिपस मनोगंड. डॉ. जोन्स ह्यांच्या निबंधाच्या पुढे जाऊन मनोविश्लेषणाच्या तज्ज्ञांनी मानववंशशास्त्राला जो हातभार लावला त्याचा

विचार केला तर ईडिपस मनोगंड प्रथम कसा उत्पन्न झाला अशी कल्पना आहे ते कळून येते. प्राथमिक अवस्थेतील मानवाने कुलचिन्हाविरुद्ध केलेल्या गुन्हयातून त्याची उत्पत्ती झाली.



# प्रकरण ३ रे

## संस्कृतीचे प्राक्कालीन मूळ

मानववंशावरील मनोविश्लेषणात्मक सर्व लिखाणात फ्रॉइडची कुलचिन्हे व निर्बंध, कुलबाह्य विवाह आणि देवतेला दिलेला बळी ह्या उपपत्तीच्या नाटयमय प्रारंभाला फार महत्त्व आहे. प्रस्तुत निबंधात जेथे मानववंशशास्त्रीय निष्कर्ष मनोविश्लेषणाशी जोडण्याचा प्रयत्न केलेला आहे तेथे ह्या उपपत्तीला योग्य महत्त्व दिलेच पाहिजे. म्हणून येथे ह्या उपपत्तीच्या तपशीलवार विवेचनात शिरणे जरूरच आहे.

फ्रॉइडच्या टोटेम अ‍ॅण्ड टाबू ( कुलचिन्ह व निर्बंध ) ह्या पुस्तकात त्याने असे दाखवून दिले आहे की, ईडिपस मनोगंडामुळे कुलचिन्हे, सासूला टाळण्याची घटना, पूर्वजांची पूजा, आणि नीतिबाह्य लैंगिक संबंधांवरील निर्बंध, मनुष्यांची कुलचिन्हांतील प्राण्यांशी एकरूपता, आणि पितृस्वरूपी देव ह्या सर्वांचा अर्थ कळू शकतो. म्हणजे ईडिपस मनोगंडाचे आपल्याला जे स्वरूप माहीत आहे ते मनोविश्लेषणशास्त्रज्ञ संस्कृतीचे मूळ आहे असे समजतात. थोडक्यात ते संस्कृतिपूर्व आहे, आणि फ्रॉइड आपल्या पुस्तकात ते कसे उत्पन्न झाले ह्याची तपशीलवार उत्पत्ती देतो.

ह्या त्याच्या उपक्रमात फ्रॉइड आपल्यापूर्वी होऊन गेलेल्या दोन प्रख्यात शास्त्रज्ञांची मदत घेतो— डार्विन आणि रॉबर्टसन स्मिथ. डार्विनकडून फ्रॉइडने मूळच्या आदिवासी " भटक्या टोळ्यां "ची अथवा अ‍ॅटकिन्सनने संबोधिलेल्या " राक्षसी समूहां "ची कल्पना घेतली. ह्या कल्पनेप्रमाणे कुटुंबाचे अथवा सामाजिक समूहाचे मूळ स्वरूप म्हणजे लहान लहान भटकणाऱ्या टोळ्या, त्यांच्यावर हुकमत गाजवून त्यातील बायकांना व मुलांना आपल्या ताब्यात ठेवणारा एक प्रौढ पुरुष अशा प्रकारचे होते. फ्रॉइडचा दुसरा एक प्रख्यात विद्यार्थी रॉबर्टसन स्मिथ ह्याच्याकडून त्याला कुलचिन्हाबद्दलच्या धार्मिक विधीच्या महत्त्वाबद्दलची सूचना मिळाली. रॉबर्ट स्मिथच्या मते अगदी पहिला धार्मिक विधी म्हणजे कुलचिन्ह असलेला प्राणी मारून कुलातील सर्वांनी त्याचे मांस एकत्र बसून भक्षण करणे. पुढे बळी देण्याची सर्वत्र आढळणारी व अत्यंत महत्त्वाची धार्मिक घटना सर्वांनी एकत्र जेवण्याच्या ह्या घटनेतूनच उद्भवली व विकास पावली. कुलचिन्ह म्हणून जो प्राणी असतो त्याचे मांस नेहमीच्या वेळी खाण्यावर जो निर्बंध असतो तो म्हणजे विधियुक्त समाईक जीवनाची ऋण बाजू म्हणता येईल. ह्या दोन उपपत्तींमध्ये फ्रॉइडने आपल्या स्वतःच्या आणखी एका उपपत्तीची भर घातली. कुलचिन्ह व मानव ह्यांचे एकत्रीकरण करणे ही गोष्ट लहान मुले, आदिवासी

लोक किंवा मज्जातंतूंत बिघाड झालेला मनुष्य करतात. कारण बापाचे कोणत्या तरी नावडत्या प्राण्याशी साम्य आहे हे दाखविण्याची त्यांची इच्छा असते.

ह्या संदर्भात आपल्याला मुख्य विचार ह्या उपपत्तीच्या समाजशास्त्रीय बाजूनेच करावयाचा आहे. म्हणून डार्विनच्या ज्या उताऱ्यावर फ्रॉइडने आपली उपपत्ती बसवली तो सबंध उताराच मी येथे देणार आहे. डार्विन म्हणतो : "चतुष्पाद पशूंच्या नरांमधील मत्सराबद्दल आपल्याला जी माहिती आहे, व त्यांतील पुष्कळांना एकमेकांशी लढण्याची इंद्रिये असतात, त्यावरून सृष्टीत सर्रहा कोणत्याही मादीचा कोणत्याही नराशी लैंगिक संयोग होत असेल असा संभव नाही.... म्हणून आपण जर खूप पूर्वीच्या कालाचा विचार केला व मानवाच्या सध्याच्या सामाजिक सवयी लक्षात घेतल्या तर त्यापासून असा निष्कर्ष संभवतो की, मानव लहान लहान समूह करून राहात असावा व प्रत्येक पुरुष एक बायको किंवा त्याच्यात ताकद असली तर अनेक बायका घेऊन व इतर पुरुषांपासून त्यांचे निकराने संरक्षण करून जगत असावा. किंवा तो सामूहिक जीवन जगत नसेलही; आणि एखाद्या गोरिलाप्रमाणे आपल्या बायकांबरोबर वेगळाच राहात असेल. सर्व तद्देशीयांचे एकमत आहे की, एका टोळीत एकच प्रौढ नर असतो. जेव्हा टोळीतील तरुण नर मोठे होतात तेव्हा त्यांच्यात झुंज होते आणि जो सर्वांत जास्त शक्तिमान असेल तो इतर नरांना मारून तरी टाकतो किंवा हाकलून देतो; आणि आपण त्या टोळीचा मुख्य बनतो (डॉ. सॅव्हेज, बोस्टन जर्नल ऑफ नॅशनल हिस्टरी, भाग ५, १८४५-४७). जे तरुण नर अशा रीतीने हाकलून दिले जातात आणि इकडेतिकडे भटकत असतात त्यांना अखेरीस एखादी मादी भागीदारीण सापडते, व ह्यामुळे एकाच कुटुंबातील व्यक्तींची आतल्याआत मोठ्या प्रमाणावर प्रजोत्पत्ती होत नाही."[२]

येथे मला प्रथमच हे सांगितले पाहिजे की, वरील उताऱ्यात डार्विन मानव व गोरीला ह्यांच्याबद्दल एकत्रच बोलतो; त्यांच्यात फरक करीत नाही. पण त्याबद्दल आम्ही मानववंशशास्त्रज्ञांनी त्याला दोष देण्याचे कारण नाही. आमच्या शास्त्राने निदान एवढे तरी केले पाहिजे की, आम्ही आमच्या वानर बंधूंच्याबद्दल तुच्छता बाळगणे टाकून देणे जरूर आहे. पण तत्त्वज्ञानदृष्ट्या जरी वानर व मानव ह्यांच्यात अगदीच अल्प फरक असला तरी मानवसदृश वानरांचे **कुटुंब** आणि मानवाचे संघटित कुटुंब ह्यांतील फरक समाजशास्त्राच्या दृष्टीने फार महत्त्वाचा आहे. सृष्टीतील नैसर्गिक स्थितीतील प्राण्याचे जीवन आणि सुसंस्कृत मानवाचे जीवन ह्यात समाजशास्त्राला स्पष्ट भेद करणे आवश्यक आहे. नरमादीमध्ये वाटेल तसा भेदाभेद न राहाता लैंगिक संयोग होतो, ह्या मताविरुद्ध जीवशास्त्रीय मुद्दा डार्विन पुढे मांडीत होता, व म्हणून निसर्गातील प्राणी व मानव ह्यांच्यातील फरक त्या विशिष्ट संदर्भात त्याला महत्त्वाचा वाटला नाही. जर डार्विन संस्कृतीच्या उत्पत्तीचा विचार पुढे मांडीत असता, व संस्कृती केव्हा उदयास आली ते ठरवीत असता, तर मग निसर्ग व

संस्कृती ह्यांतील फरक त्याला अत्यंत महत्त्वाचा वाटला असता. आपण पुढे पाहूच की, फ्रॉइड " संस्कृतीच्या उत्पत्तीची महत्त्वाची घटना " केव्हा झाली ते कळून घेण्याचा प्रयत्न करतो पण त्यात त्याला अजिबात यश येत नाही. कारण तो निसर्ग व संस्कृती ह्यांतील फरक दृष्टीआड करतो, आणि अशा सामाजिक परिस्थितीत संस्कृतीची स्थापना निर्देशित करतो की ती स्थिती त्याच्या उपपत्तीच्या दृष्टीने अस्तित्वात असू शकत नाही. शिवाय डार्विन फक्त टोळीच्या म्होरक्याच्या बायकांबद्दल बोलतो; इतर स्त्रीलिंगी प्राण्यांबद्दल बोलत नाही. शिवाय तो असेही म्हणतो की, टोळीतून हाकलून दिलेल्या नरांनाही भागीदारीण मादी मिळते; आणि ते आपल्या आईबापांच्या कुटुंबाची वास्तपुस्त करीत नाहीत. ह्या दोन्ही मुद्द्यांच्या बाबतीत फ्रॉइड डार्विनची उपपत्ती बऱ्याच प्रमाणात बदलतो.

मानसविश्लेषणशास्त्राचा मुख्य तज्ज्ञ जो फ्रॉइड त्याचे प्रत्यक्षच उद्गार मी येथे देतो, म्हणजे माझी टीका कितपत लागू आहे याचा निर्णय होऊ शकेल. फ्रॉइड म्हणतो, " डार्विनच्या प्राथमिक टोळ्यांच्या कल्पनेमुळे कुलचिन्हांच्या उगमाबद्दल माहिती मिळत नाही. आपल्याला एक रागीट व मत्सरी बाप आढळतो, तो सगळ्या माद्या आपल्याकरता ठेवून आपल्या वयात येणाऱ्या मुलग्यांना हाकलून देतो." ह्यावरून असे दिसते की, तो मत्सरी बाप सगळ्या माद्या आपल्या कळपात ठेवतो, आणि हाकलून दिलेले मुलगे आसपास कुठे तरी एक टोळके करून राहतात आणि पुढे होणाऱ्या काल्पनिक घटनेच्या तयारीत असतात. आणि जणू काय एका रक्त-लांछित पण काल्पनिक अशा दुष्कृत्याची रूपरेषा आपल्या डोळ्यांसमोर उभी केली जाते; आणि ती केवळ मनोविश्लेषणाच्याच नव्हे तर मानवाच्या इतिहासातही महत्त्वाची समजली जाते. कारण फ्रॉइडच्या मते ही घटनाच भविष्यकाळातील सर्व संस्कृतीचा उगम आहे. " ही महत्त्वाची घटना म्हणजे संस्कृतीच्या उत्पत्तीचा प्रारंभ आहे, आणि तेव्हापासून मानवजात कधीही स्वस्थ बसलेली नाही." " हे कृत्य प्राथमिक आहे." हे संस्मरणीय गुन्हेगारी कृत्य आहे की ज्याच्यापासून समाजरचना, नैतिक निर्बंध व धर्म ही सर्व उत्पन्न झाली " सर्व संस्कृतींचे हे जे प्राक्कालीन मूळ त्याची कथा आता आपण ऐकू या.

" एके दिवशी हाकलून दिलेल्या सर्व भावांनी एकी केली, बापाला मारून खाऊन टाकले, आणि अशा रीतीने बापाच्या टोळीचा नाश केला. जे एकेकट्याला शक्य झाले नसते ते सर्वांनी मिळून घडवून आणले. कदाचित त्यांना एखादे नवे शस्त्र मिळाले असेल, व संस्कृतीत थोडी प्रगती झाली असेल; आणि त्यांच्यात आपण थोडे वरचढ असल्याची भावना उत्पन्न झाली असेल. अर्थातच आपल्या जातीच्या प्राण्याचे मांस भक्षण करणाऱ्या ह्या रानटी प्राण्यांनी आपल्या तडाक्यात सापडलेल्या बळीला खाऊन टाकले पाहिजे. प्रत्येक भावाच्या मनात आपल्या हिंसक व रानटी बापाबद्दल भीती व द्वेष असला पाहिजे. आता त्याला खाऊन टाकून त्यांनी त्याच्याशी

एकरूप होऊन शिवाय त्याची शक्तीही मिळवली असली पाहिजे. कुलचिन्हांचे जेवण हा बहुधा मानवजातीचा पहिला उत्सव असला पाहिजे व तो ह्या संस्मरणीय कृत्याची आठवण म्हणून केला गेला असला पाहिजे. "

हे मानवी संस्कृतीचे पहिले कृत्य होते पण त्याच्या वर्णनाच्या मध्येच लेखक " संस्कृतीतील प्रगतीबद्दल " व " एका नव्या शस्त्राच्या उपयोगाबद्दल " लिहितो; व त्यामुळे ह्या रानटी व संस्कृतिपूर्व प्राण्याला सांस्कृतिक कल्पना व उपकरणेही देतो. संस्कृतीच्या मदतीने उत्पन्न करावयाच्या वस्तू समाजरचना, नैतिक कल्पना व धर्म ह्यांच्या अस्तित्वाशिवाय करताच येणे शक्य नाही. मी पुढे दाखवीन की, हा नुसता शब्दच्छल नाही, पण तो ह्या घटनेच्या अगदी गाभ्याशी जाऊन भिडतो. आपल्याला असे दिसून येईल की, फ्रॉइड व जोन्स हे संस्कृतीच्या उत्पत्तीचा उगम पूर्वी अस्तित्वात असलेल्या संस्कृतीतूनच झाला असे समजतात; म्हणजे त्यांची विचारसरणी वर्तुळाकार बनते असेच म्हणावे लागते. ह्या त्यांच्या मताचे खंडन करताना आपल्याला संस्कृतीच्या कार्यपद्धतीचे विश्लेषण करावे लागेल व तिचा जीवशास्त्रातील मूलभूत आधारही शोधावा लागेल.



## प्रकरण ४ थे

# मातृ-पितृहत्येचे परिणाम

मागे दिलेल्या फ्रॉइडच्या उपपत्तीवर टीका करण्यापूर्वी स्वस्थ चित्ताने फ्रॉइडला ह्या बाबतीत काय म्हणावयाचे आहे ते आपण विचारात घेतले पाहिजे, कारण त्याचे म्हणणे ऐकून घेणे नेहेमीच महत्त्वाचे असते. "... एकत्र आलेले भाऊ ज्या संघात असत त्या सर्वांच्या बापाविषयींचा दृष्टिकोन दोन दिशांना हेलावणारा होता, आणि तसाच दृष्टिकोन आपली मुले व मज्जातंतूंतील बिघाड झालेल्या व्यक्तीतही असतो. ते सर्व आपल्या बापाचा द्वेष करीत होते;कारण त्यांच्या लैंगिक इच्छा पुऱ्या करण्याच्या आड तो आपल्या शक्तीमुळे येत होता, पण त्याच्यावर त्यांचे प्रेमही होते व त्याच्याबद्दल त्यांना कौतुकही वाटत होते. एकदा त्याला नाहीसा केल्यानंतर व त्याच्याशी एकरूप होण्याची इच्छा तृप्त केल्यानंतर दाबून ठेवलेली त्याच्याबद्दलची कोमल भावना त्यांच्या मनावर ताबा मिळवणे अटळच होते. हे पश्चात्तापाच्या स्वरूपात बाहेर पडले आणि आपण काही तरी दुष्कृत्य केले अशी भावना पश्चात्तापाबरोबरच त्यांच्या मनात उद्भवली. बाप जिवंत असताना तो जितका शक्तिमान होता त्यापेक्षाही तो मृत झाल्यानंतर अधिक शक्तिमान वाटू लागला. आणि ही गोष्ट आजही आपण पुरुषांच्या भाग्यात पाहतो. बाप प्रत्यक्ष हजर असताना त्याने ज्या गोष्टींना प्रतिबंध केला होता त्या गोष्टींना ते "मागून होणाऱ्या आज्ञापालनाने" प्रतिबंध करू लागले. ही घटना मनोविश्लेषणात सर्वांना माहीत आहे. त्यांनी आपण केलेल्या कृत्याचे अस्तित्व नाहीसे करण्याचा प्रयत्न केला आणि बापाचे स्मृतिचिन्ह म्हणजे जे कुलचिन्ह त्या प्राण्याला मारण्यावर बंदी घातली. तसेच आपल्या कृत्याचा फायदा नाकारून ज्या माद्या स्वतंत्र झाल्या होत्या त्यांच्याशी संबंध ठेवला नाही. त्याप्रमाणे त्यांनी कुलचिन्हासंबंधीचे दोन मूलभूत निर्बंध अस्तित्वात आणले व त्यांचे कारण म्हणजे मुलाने पितृहत्या करण्यातील गुन्हा. आणि ह्याच कारणामुळे हे दोन निर्बंध व ईडिपस मनोगंडामधील दाबून टाकलेल्या दोन इच्छा ह्यांचा निकट संबंध जुळतो. जो कोणी आज्ञा मोडील तो आदिवासी समाजाला ज्या दोन गोष्टींचा त्रास होत होता त्याबद्दल गुन्हेगार समजण्यात येई."

अशा रीतीने बापाला मारल्याबरोबर लगेच मुलगे कायदा करू लागलेले व धार्मिक निर्बंध घालण्यात गुंतलेले, समाज रचना तयार करणारे, म्हणजे थोडक्यात सांस्कृतिक आचार ठरविणारे असे दिसतात. व ह्या सगळ्या गोष्टी मानवाच्या पुढील पिढ्यांना दिल्या जातात. आणि इथे परत आपल्याला कोडे पडते: संस्कृतीचा कचा

माल आधीच तयार होता का ? तसा तो असेल तर त्या " महत्त्वाच्या घटनेपासून " संस्कृतीचा उगम झाला हे फ्रॉइडचे मत बरोबर असू शकणार नाही. की त्या " महत्त्वाच्या घटनेच्या " वेळी संस्कृती अस्तित्वातच नव्हती ? तसे असते तर त्या मारलेल्या बापाच्या मुलांनी धार्मिक विधींना सुरुवात करून आणि कायदे प्रस्थापित करून पुढील पिढ्यांना चालीरीती घालून दिल्या नसत्या.

फ्रॉइड ह्या मुद्द्याकडे पूर्णपणे दुर्लक्ष करीत नाही; पण त्याचे निर्णायक महत्त्व त्याने ओळखले असे दिसत नाही. मूळ गुन्ह्याचा परिणाम बरेच दिवस टिकेल व मानवाच्या पुढील अनेक पिढ्यांपर्यंत तो पोचू शकेल हा प्रश्न फ्रॉइड अपेक्षितो. ह्या मताला विरोध होईल हे जाणून फ्रॉइड आणखी एका उपपत्तीची मदत घेतो. " ...... कोणाच्याही लक्षांतून हे सुटले नसेल की, आम्ही एक गोष्ट गृहीत धरतो की, समूहाचे मन, ज्याच्यात वैचारिक घटना घडून येतात, ते व्यक्तीच्या मानसिक जीवनासारखेच असते " पण ही समूहाच्या आत्म्याबद्दलची कल्पना पुरेशी नाही. ह्या बहुव्यापी वस्तूला जवळजवळ अमर्याद स्मरणशक्ती आहे असेही आपल्याला गृहीत धरावे लागते. " ...... एखाद्या दुष्कृत्याबद्दलच्या कल्पनेची आठवण हजारो वर्षे टिकते असे आपण समजतो व ज्या पिढ्यांना त्या दुष्कृत्याची अजिबात माहिती नाही त्यांच्यातही ती आठवण परिणामकारक राहू शकते असे गृहीत धरतो मुलग्यांना बापाने वाईट रीतीने वागवल्यामुळे त्या पिढीला जो मानसिक त्रास झाला तो त्रास ज्या पिढ्यांना बापाने वाईट वागवले नाही, कारण तो बापच नाहीसा झाला होता त्यांच्याही मनात कायम राहातो. "

फ्रॉइडला ह्या गृहीत कल्पनेबद्दल थोडी शंका वाटत असावी; पण त्याच्या हाताशी विरोधी मानवाबद्दलची विचारसरणी (Argumentum ad hominem) आहेच. फ्रॉइड आपल्याला अशी खात्री देतो की, त्याची उपपत्ती कितीही धाडसी वाटली तरी "....केवळ आपल्यालाच ह्या धाडसाची जबाबदारी घ्यावी लागते असे मात्र नाही " एवढेच नव्हे तर हा लेखक मानववंशशास्त्र व समाजशास्त्र ह्यांमधील तज्ज्ञांकरता एक सर्वसाधारण नियम घालून देतो : " समूहाला मन असते ही कल्पना केल्याशिवाय किंवा मानवजातीच्या भावनात्मक जीवनाचे अखंडत्व मान्य केल्याशिवाय व विशिष्ट व्यक्तींनी केलेल्या नियमांच्या उल्लंघनामुळे अखंडत्वात आलेला व्यत्यय ह्यांकडे दुर्लक्ष केल्याशिवाय सामाजिक मानसशास्त्र अस्तित्वातच असू शकणार नाही. जर एका पिढीतील मानसिक घटना पुढच्या पिढीपर्यंत पोचल्या नाहीत, जर प्रत्येक पिढीला जीवनाकडे पाहण्याचा दृष्टिकोन नव्याने मिळवावा लागला, तर ह्या क्षेत्रात अजिबात प्रगती होणार नाही, व विकासाची प्रक्रिया जवळजवळ थांबेल. " आणि येथे आपण एका महत्त्वाच्या मुद्द्याशी येतो : सामूहिक आत्म्याच्या कल्पनेची संशोधनपद्धतीच्या दृष्टीने आवश्यकता. वस्तुस्थिती अशी आहे की, कोणताही कार्यक्षम मानववंशशास्त्रज्ञ " सामूहिक आत्म्याची अथवा

मनाची" उपपत्ती मान्य करीत नाही. तसेच मागील पिढीपासून मिळालेली "मानसिक प्रवृत्ती" किंवा व्यक्तीच्या आत्म्याच्या पलीकडे "मानसिक अखंडत्व" हेही मानववंशशास्त्रज्ञ मान्य करीत नाही.[१] ह्याच्या उलट प्रत्येक पिढीचे अनुभव कोणत्या माध्यमात ठेवले आणि जतन केले जातात व पुढच्या पिढ्यांना दिले जातात हे मानववंशशास्त्रज्ञ स्पष्टपणे सांगतात. हे माध्यम म्हणजे प्रत्यक्ष वापरातल्या वस्तू, परंपरा, आणि विशिष्ट छापाची मानसिक विचारसरणी—म्हणजेच जिला आम्ही संस्कृती म्हणतो ती. हे एकच माध्यम असे आहे की, ज्याच्यामार्फत मानवाला काही नवीन गोष्ट सुचली तर प्रत्यक्षात आणता येते व अशा रीतीने मानवी मूल्यात भर घालता येते. हे एकच माध्यम असे आहे की, व्यक्तीला इतरांच्या अनुभवातून आपल्या फायद्याकरता काही गोष्टी उपयोगात आणता येतात. संस्कृतीचे आणखी तपशीलवार विश्लेषण पुढे येईलच व त्यातून आपल्याला कळेल की, संस्कृती कशी उत्पन्न होते, तिचे जतन कसे होते व ती पुढील पिढ्यांना कशी दिली जाते. ह्या विश्लेषणातून आपल्याला हेही कळून येईल की, मनोगंड बनणे हा संस्कृती अस्तित्वात येण्याचा एक नैसर्गिक उपपरिणाम आहे.

डॉ. जोन्सचा निबंध वाचणाऱ्या प्रत्येकाला कळून येईल की, ते मानवी सुधारणेबद्दलची फ्रॉइडची उपपत्ती संपूर्णपणे मान्य करतात. पूर्वी त्यांच्या निबंधांतून दिलेल्या उताऱ्यांवरून स्पष्ट होईल की, ते ईडिपस मनोगंड हे सर्व गोष्टींचे उगमस्थान आहे असे मानतात. अर्थात हा मनोगंड संस्कृतिपूर्व कालातील असला पाहिजे हे उघड आहे. डॉ. जोन्स फ्रॉइडच्या उपपत्तीला अधीकच स्पष्टपणे मानतात हे पुढील उताऱ्यावरून सिद्ध होते. "मालिनौस्की ह्या विषयाच्या विवेचनात फ्रॉइडच्या 'प्राथमिक समूहा'ची कल्पना सोडून देतात किंवा तीत बदल करतात (ॲटकिन्सनचे 'प्रचंड कुटुंब') पण त्याच्या उलट मला वाटते की, ज्या गुंतागुंतीच्या प्रश्नाचा आपण विचार करीत आहोत त्यांचा अर्थ समजण्यास हीच कल्पना सर्वात अधिक उपयुक्त ठरते." त्याचप्रमाणे मूळ दुष्कृत्याची वांशिक आठवण (racial memory) कायम राहते हे मतही डॉ. जोन्स मान्य करतात. कारण ते भावनिक प्रेरणांची मूळच्या प्राथमिक समूहापासून आलेली आनुवंशिकता" अशी भाषा वापरतात.

♠ ♠

# प्रकरण ५ वे

# मूळच्या पितृहत्येचे विश्लेषण

आता आपण फ्रॉइड आणि जोन्स ह्यांच्या उपपत्तीचा एक एक मुद्दा घेऊन परीक्षण करू. अगदी प्रारंभी मानवांचा किंवा मानवसदृश वानरांचा एक थवा होता ही गोष्ट मानववंशशास्त्रज्ञ सहज मान्य करू शकेल. आपल्याला माहीतच आहे की, मानवी आणि मानवपूर्व अतिप्राचीन नात्याचे संबंध म्हणजे एका अगर अनेक स्त्रियांशी लग्न करून तयार झालेले कुटुंब. डार्विनची नात्यासंबंधीची उपपत्ती स्वीकारताना मनोविश्लेषणशास्त्राने प्राचीनकाळी वाटेल त्या नरमादीत लैंगिक संयोग होत असे, किंवा सामूहिक विवाहपद्धती होती, किंवा लैंगिक कम्यूनिझम होता ह्या सर्व उपपत्त्या टाकून दिल्या आहेत आणि ह्या त्यांच्या मताला सर्व तज्ज्ञ मानववंशशास्त्रज्ञ पाठिंबाच देतील. पण आपण पाहिलेच आहे की, डार्विन मानव व इतर प्राणी ह्यांच्यात भेद करीत नाही; आणि फ्रॉइडने जेव्हा डार्विनच्या उपपत्तीची पुनर्रचना केली तेव्हा त्या थोर सृष्टिशास्त्रज्ञाच्या लिखाणात जे काही थोडे फरक दर्शविले होते तेही फ्रॉइडने नाहीसे केले. म्हणून आपल्याला मानवसदृश वानरांच्या कुटुंबाच्या रचनेचा विचार केला पाहिजे म्हणजे मानवपूर्व परिस्थितीची आपल्याला कल्पना येईल. आपल्याला असा प्रश्न विचारला पाहिजे की, **मानवपूर्व** कुटुंबात एकत्र ठेवणारे बंध कोणते होते आणि **मानव अस्तित्वात आल्यावर** ते बंध कोणचे होते ? इतर प्राणी आणि मानव ह्यांच्यातील नात्याच्या संबंधांत काय फरक आहे ? मानवसदृश वानरांच्या नैसर्गिक स्थितीतील कुटुंब व अगदी प्रारंभीच्या पण संस्कृतीची सुरुवात झालेल्या मानवी कुटुंबात कोणते फरक असतात ?

मानवपूर्व वानरांच्या कुटुंबातील व्यक्ती उपजत बुद्धीने एकमेकांशी जोडलेल्या असतात. केव्हा केव्हा हे उपजत बुद्धीचे संबंध वैयक्तिक अनुभवांमुळे बदलू शकतात पण परंपरेने त्यांच्यात बदल होऊ शकत नाही. कारण मानवेतर प्राण्यांना भाषा, कायदे किंवा नियम किंवा प्रथा नसतात. निसर्गावस्थेत प्राण्यांमध्ये नर आणि मादी ह्यांचा लैंगिक संयोग फक्त मादी माजावर आलेली असेल त्याच वेळी लैंगिक निवडीच्या प्रेरणेमुळे होतो. मादी गर्भवती झाली म्हणजे एका नवीन प्रेरणेमुळे दोघांचे एकत्र जीवन सुरू होते. त्या वेळी नर गर्भवती मादीचे रक्षण करतो. पिल्लांचा जन्म झाल्या-नंतर मादीमध्ये मातेच्या प्रेरणा, म्हणजे पिल्लांना पाजणे, त्यांची काळजी घेऊन ती वाढवणे इत्यादी उत्पन्न होतात व नर ह्या नव्या परिस्थितीत अन्न पुरवणे, संरक्षणा-

करता पहारा करणे, आणि जरूर तर कुटुंबाच्या संरक्षणाकरता धोका पत्करून प्रतिस्पर्ध्याशी द्वंद खेळणे, ह्या गोष्टी करतो. मानवसदृश वानरांमधील पिल्ले वाढण्याचा दीर्घ काल लक्षात घेता त्या प्राणीजातीत नर आणि मादी ह्या दोघांमध्येही पिलांबद्दल प्रेम उत्पन्न होणे व ती मोठी होऊन आपले स्वतंत्र जीवन जगू लागेपर्यंत त्यांची काळजी घेणे जरूर असते. एकदा पिल्लाची पूर्ण वाढ होऊन ते स्वतंत्र झाले म्हणजे जीवशास्त्रदृष्ट्या कुटुंब एकत्र राहण्याची आवश्यकता उरत नाही. आपण पुढे पाहू की, ही आवश्यकता संस्कृतीमुळे उत्पन्न होते; कारण एकमेकांशी सहकार्य करण्याकरता कुटुंब एकत्र राहणे जरूर असते. तसेच परंपरा पुढे चालू ठेवण्याकरता पुढची पिढी मागच्या पिढीबरोबर राहणे हेही आवश्यक ठरते. परंतु मानवपूर्व प्रचंड भ्रम्यासारख्या कुटुंबात पिल्ले मोठी झाली की, ती नर असोत की, मादी असोत, ती टोळी सोडून निघून जात असत.

ही घटना आपल्याला सर्व प्रकारच्या माकडांमध्ये प्रत्यक्ष निरीक्षणात दिसून येते. ह्यात त्या विशिष्ट प्राणीजातीचे हितही होत असल्यामुळे सर्वसाधारण शास्त्रीय तत्त्वाच्या आधारेही आपल्याला ही घटना मान्य होऊ शकते. शिवाय प्राण्यांच्या उपजत बुद्धीबद्दल आपल्याला जी माहिती आहे तिच्याशीही वरील घटना जुळणारी आहे. बहुतेक उच्च सस्तन प्राण्यांत टोळीचा मुख्य जो नर असेल तो म्हातारा होऊन आपली शक्ती कमी झाल्याचे त्याला वाटू लागते तेव्हा तो आपण होऊन टोळी सोडून देऊन निघून जातो व एखाद्या तरुण नराला आपली जागा मोकळी करून देतो. हीही गोष्ट त्या विशिष्ट प्राणीजातीच्या हिताचीच असते. कारण मानवांप्रमाणेच प्राण्यांतही वयाबरोबर स्वभाव अधिक संतापी बनतो आणि म्हणून म्हातारा म्होरक्या कमी उपयुक्त ठरतो व त्याच्यामुळे कलह वाढण्याची शक्यता जास्त असते. ह्या सर्व घटनांमध्ये आपल्याला निसर्गामध्ये उपजत बुद्धीचे कार्य कसे होते ते कळते व त्यात काही विशेष गुंतागुंत, मनातील अंतःकलह, लपवलेल्या भावना किंवा दुःखद प्रसंग इत्यादींना जागा राहात नाही.

सर्वांत वरच्या प्राण्यांच्या जातीतील कुटुंबव्यवस्था अशा प्रकारे उपजत भावना व कल ह्यांवर आधारलेली असते. जेथे जेथे जीवशास्त्रीय गरज उत्पन्न होते तेथे तेथे तिला अनुरूप मानासिक प्रक्रिया होते; जेव्हा ही गरज नाहीशी होते तेव्हा तीमुळे उत्पन्न झालेल्या भावनाही नाहीशा होतात. विशिष्ट परिस्थितीत होणारी कृती आणि तिच्यामुळे होणारा आनंद अशी जर आपण उपजत बुद्धीची व्याख्या केली तर आपल्याला असे म्हणता येईल की, प्राण्यांचे कौटुंबिक जीवन उपजत बुद्धीच्या एका साखळीने घडविलेले असते. प्रियाराधना, लैंगिक संयोग, एकत्र जीवन, पिल्लांबद्दल प्रेम व आईबापांची एकमेकांस मदत. ह्या साखळीतील प्रत्येक दुवा एकामागून एक घडत जातो व मागचा दुवा नाहीसा होतो. कारण उपजत बुद्धीच्या प्रक्रियेचे हे वैशिष्ट्य आहे की, प्रत्येक नवीन परिस्थितीत नवी वागणूक व नवी भावना यांची

जरूर असते. मानसशास्त्रदृष्ट्या हे लक्षात ठेवणे जरूर आहे की, प्रत्येक नवीन प्रतिक्रियेमुळे पूर्वीची भावनात्मक प्रतिक्रिया नाहीशी होते व जुन्या भावनांचे कोणचेही अवशेष नव्या भावनेत शिल्लक राहिलेले नसतात. नव्या उपजत बुद्धीच्या अमलाखाली असताना प्राणी जुन्या उपजत बुद्धीच्या वर्चस्वाखाली असत नाही. पश्चात्ताप, मानसिक झगडा, द्विधा प्रवृत्ती ही सर्व संस्कृतीमुळे म्हणजे मानवी जीवनातच उत्पन्न होतात, इतर प्राण्यांच्या जीवनात त्यांना स्थान नाही. उपजत बुद्धीचे कार्य, उपजत बुद्धीमुळे घडून येणारी परिणामांची साखळी, ही कधी कधी कमी जास्त यशस्वी होतील, तर कधी त्यांच्यामुळे झगडा उत्पन्न होईल; पण त्यात " अंतर्मनातील दुःखद घटनांना " काही जागा राहात नाही.

ह्या सर्व विवेचनात प्राचीन काळी प्रथम घडलेल्या गुन्ह्याचा काय संबंध आहे ? मी पूर्वी अनेकदा दाखवून दिले आहे की, फ्रॉइडने ही " महान दुःखद घटना " म्हणजे संस्कृतीचे उत्पत्तिस्थान असून तीतील ही पहिली कृती आहे असे म्हटले आहे. फ्रॉइड आणि जोन्स ह्यांच्या लिखाणातील उतारे जरी बाजूला ठेवले— आणि तसे आणखी पुष्कळ उतारे देता येतील— तरी हे लक्षात ठेवले पाहिजे की, त्यांच्या उपपत्यांना ही गोष्ट गृहीत धरणे आवश्यक आहे : जर आपण कुलचिन्हांकरता केलेल्या पितृहत्येपासून संस्कृतीची सुरवात झाली असे मानले नाही तर त्यांचा सर्व सिद्धांतच कोसळून पडेल. मनोविश्लेषणशास्त्रज्ञ ईडिपस मनोगंड हा संस्कृतीचा मूलभूत पाया मानतात हे आपल्याला माहीत आहे. त्यांच्या मताने हा मनोगंड सर्व सांस्कृतिक घटनांचे नियंत्रण करतो; एवढेच नव्हे तर तो सर्व संस्कृतीच्या पूर्वीच्या कालात अस्तित्वात आला होता. कुलचिन्हांची व्यवस्था, कायद्याची प्राथमिक मूलतत्त्वे, विधींची सुरुवात, मातृसत्तेची प्रथा, थोडक्यात म्हणजे सर्वसाधारण मानववंशशास्त्रज्ञ आणि मनोविश्लेषणशास्त्रज्ञ संस्कृतीचा मूलारंभ म्हणून ज्या गोष्टी ओळखतात ज्या सर्वांचे उत्पत्तिस्थान व उगम ( Fons et Origo ) हा ईडिपस मनोगंड आहे. मी ईडिपस मनोगंडाची काही सांस्कृतिक कारणे आहेत की काय याबद्दल संशोधन करतो ह्याला डॉ. जोन्स ह्यांचा विरोध आहे; कारण त्यांच्या मते हा मनोगंड सर्व संस्कृतीच्या पूर्वी अस्तित्वात आला. पण एक मुद्दा आणखीच जोरदार आहे ( a fortiori ) की, जर हा मनोगंड सर्व संस्कृतीच्या आधीचा असेल तर मग ज्या कुलचिन्हाच्या गुन्ह्यामुळे हा मनोगंड उत्पन्न झाला तो गुन्हा त्याच्याही आधीचा असला पाहिजे. अशा रीतीने ही घटना संस्कृतीच्या पूर्वी घडलेली आहे हे सिद्ध केल्यानंतर आपल्यापुढील पेचप्रसंगाची दुसरी बाजू आपल्यापुढे उभी राहते : हा कुलचिन्हाचा गुन्हा अगदी रानटी म्हणजे निसर्गाच्या परिस्थितीत घडला असेल का ? त्याचे काही पडसाद, परंपरा आणि संस्कृती ह्यांच्यात उठणे शक्य होते का ? कारण आपली उपपत्ती अशी आहे की, त्या गुन्ह्यापूर्वी संस्कृती अस्तित्वात नव्हती. वर दर्शविल्याप्रमाणे आपल्याला असे गृहीत धरावे लागेल की, जमावाने केलेल्या एका पितृहत्येच्या कृतीमुळे वानराला

संस्कृती मिळाली व त्याचा मानव झाला. किंवा त्याच कृत्यामुळे त्यांना वांशिक आठवण ( racial memory ) मिळाली व त्यामुळे प्राण्यांच्या वरच्या पातळीवरची एक निसर्गदत्त देणगी त्यांच्या हस्तगत झाली.

आता ह्या सगळ्या विचारसरणीचे आपण अधीक तपशीलवार विश्लेषण करू. मानवपूर्व वानरांच्या कौटुंबिक आयुष्यात उपजत बुद्धीच्या साखळीचा एक एक दुवा जसजसा निकामी होतो तसतसा तो नाहीसा होतो. उपजत बुद्धीच्या भूमिकेचा अवशेषही राहात नाही, आणि अंतःकलह किंवा गुंतागुंतीच्या भूमिका अशक्य असतात. ही विधाने प्राण्यांच्या मानसशास्त्राच्या अभ्यासकांनी तपासून पाहिली पाहिजेत असे माझे म्हणणे आहे. पण आज आपले त्या विषयाचे जे ज्ञान आहे ते ह्या विधानात सामावलेले आहे. पण असे जर असेल तर फ्रॉइडची प्रचंड थव्याची उपपत्ती व प्रतिपादन ह्यांना आपण आव्हान दिले पाहिजे. मोठे झाल्यावर व आईबापांच्या संरक्षणाची जरूर नाहीशी झाल्यावर आपण होऊन टोळी सोडून जाण्याकडे जर तरुण नरांची प्रवृत्ती असेल तर बापाला त्यांना हाकलून देण्याची जरूरच काय? शिवाय त्यांना माद्यांचा तुटवडा का भासावा, कारण इतर टोळ्यांतून व त्यांच्याही टोळीमधून मांद्याही निघून जात असतीलच. तरुण नर आपल्या टोळीभोवतीच रेंगाळत का राहावेत, आपल्या बापाचा द्वेष त्यांनी का करावा व त्याचा मृत्यू व्हावा अशी इच्छा का करावी? आपल्याला माहीत आहे की, आपण स्वतंत्र झालो म्हणून त्यांना आनंद झालेला असतो; आणि बापाच्या टोळीत परत जाण्याची त्यांना आजिबात इच्छा नसते. केवळ बाप म्हातारा होऊन निवृत्त होईपर्यंत थांबल्याने जर त्यांना पाहिजे असल्यास टोळीत परत प्रवेश मिळत असेल तर बापाला ठार मारण्याचे अप्रिय व त्रासदायक कृत्य त्यांनी का करावे?

ह्यांपैकी प्रत्येक प्रश्नामुळे फ्रॉइडने आपल्या उपपत्तीत गृहीत धरलेल्या प्रत्येक गोष्टीला आव्हान दिले जाते. वस्तुस्थिती अशी आहे की, फ्रॉइड आपल्या प्रचंड थव्याच्या अंगी अनेक निरनिराळ्या प्रवृत्ती, सवई व मानसिक कल लादतो व त्या खरोखर कोणत्याही प्राणिजातीला घातक ठरतील अशा आहेत. हे मत जीवशास्त्राच्या दृष्टीने असमर्थनीय आहे. नैसर्गिक अवस्थेतील मानवसदृश वानरांमध्ये प्रजोत्पादनाच्या कार्याला विरोधक अशी उपजत बुद्धी असेल व तीमुळे त्या प्राणीजातीचे नुकसान होत असेल तर अशी गोष्ट गृहीत धरणे अशक्य आहे. खरोखर असे दिसते की, यूरोपातील मध्यम वर्गीय कुटुंबाचे सर्व पूर्वग्रह, एकमेकांशी बिघडलेले संबंध व चिडखोर स्वभाव फ्रॉइडने आपल्या प्राचीन काळच्या थव्याच्या अंगी चिकटवले आणि त्याला इतिहास-पूर्व काळांतील जंगलात सोडून देऊन एक आकर्षक पण विचित्र अशी उपपत्ती पुढे मांडली.

पण समजा आपण फ्रॉइडच्या स्फूर्तिदायक कल्पनेचा स्वीकार करण्याच्या मोहाला बळी पडलो आणि वादाकरता असे मान्य केले की, हा प्राथमिक गुन्हा प्रत्यक्ष घडला.

पण तरीही त्याचे परिणाम स्वीकारण्यात अनुल्लंघ्य अडचणी आहेत. आपण पूर्वी पाहिले की, कुलचिन्हाच्या दुष्कृत्याबद्दल पश्चात्ताप होतो, तो आपल्या जातीच्या मारलेल्या प्राण्याचे मास खाण्याच्या टोळीमधील विधीत दिसून येतो आणि त्यातूनच लैंगिक निर्बंध बनतात. ह्याचा अर्थ असा की, बापाला मारणाऱ्या ह्या मुलांना सदसद्विवेकबुद्धी होती. पण सहसद्विवेकबुद्धी ही मनुष्यावर संस्कृतीने लादलेली एक अनैसर्गिक भावना आहे. शिवाय ह्यातून असेही दिसते की, त्यांना कायदे करणे ( नियम करणे ), नैतिक मूल्ये, धार्मिक विधी आणि सामाजिक बंधने स्थापणे हेही शक्य होते. पण हे सगळे स्वीकारणे किंवा त्यांची कल्पना करणे अशक्य आहे; कारण मुळी उपपत्तीच अशी आहे की, ह्या सगळ्या घटना संस्कृतीपूर्व वातावरणात घडत आहेत; कारण हे आपण लक्षात ठेवले पाहिजे की, संस्कृती एका क्षणात आणि एकाच कृत्यापासून उत्पन्न होऊ शकत नाही.

नैसर्गिक अवस्था व संस्कृती ह्यांमधील अंतर एका उडीने तोडलेले नाही; तो काही जलद होणारा बदल नव्हता किंवा मोठ्या गतीने झाला असेही नाही. संस्कृतीच्या पहिल्या मूलभूत चिन्हांचा— भाषा, परंपरा, निरनिराळ्या वस्तूंचा शोध व कल्पनांसंबंधी विचार— विकास कसा झाला असेल हे आपण मनातून जाणले पाहिजे. हा एकंदर बदल अतिशय सावकाश व कष्टमय असला पाहिजे व त्याकरता अनेक लहान लहान पावलांनी व अत्यंत दीर्घ कालाने तो घडून आला असला पाहिजे. हा बदल कसा घडून आला हे आपल्याला तपशीलवार कळणे किंवा त्याच्या पुनर्रचनेचा प्रयत्न करणे अशक्य आहे. पण त्या बदलातल्या मुख्य अवस्था आपल्याला सांगता येतील; आपल्याला प्राचीन मानवाच्या संस्कृतीचे विश्लेषण करता येईल आणि काही मर्यादेपर्यंत हा बदल कसा घडून आला त्याची यंत्रणाही उघड करता येईल.

आपल्या टीकात्मक विश्लेषणाचा सारांश असा : आपल्याला असे दिसून आले आहे की, कुलचिन्हांशी संबंधित असा गुन्हा संस्कृतीच्या अगदी सुरुवातीस झाला असला पाहिजे; जर त्याला काही अर्थ असेल तर तो गुन्हाच संस्कृतीचे मूलभूत कारण आहे असे समजले पाहिजे. ह्याचा अर्थ असा की, हा गुन्हा आणि त्याचे परिणाम हे संस्कृतिपूर्व नैसर्गिक स्थितीतच झाले असे आपल्याला गृहीत धरले पाहिजे; पण हे गृहीत धरले की, आपल्याला अनेक प्रकारच्या विसंगतीला तोंड द्यावे लागेल. आपल्याला असे आढळेल की, पितृहत्येला कोणत्याही प्रकारचा हेतू नाही. कारण प्राण्यामध्ये उपजत बुद्धीचे कार्य परिस्थितीशी तंतोतंत जुळवून घेतलेले असते; त्यामुळे विरोध किंवा भांडण उत्पन्न होऊ शकेल पण दाबून ठेवलेली मनाची स्थिती उत्पन्न होऊ शकणार नाही. एकदा टोळी किंवा थवा सोडून गेल्यावर बापाचा द्वेष करण्याचे मुलांना काहीच कारण राहणार नाही. शिवाय दुसरे असे की, आपल्याला असेही आढळून आले आहे की, कुलचिन्हाशी संबंधित गुन्हा केल्यानंतर त्याचे परिणाम सांस्कृतिक प्रथेत गुंतवण्याचे साधन त्या वेळी उपलब्ध नव्हते. विधी, नियम

किंवा नीती ही ज्या माध्यमाद्वारे पुढे चालवता येतील असे कोणचेही माध्यम अस्तित्वात नव्हते.

वर दिलेले दोन्ही आक्षेप संक्षेपाने द्यावयाचे तर असे म्हणता येईल की, संस्कृतींची निर्मिती एका विशिष्ट क्रियेपासून सुरू झाली—म्हणजे सर्वसंपन्न संस्कृती एका गुन्ह्यापासून, एका लहान क्रांतीपासून, एका बंडापासून निघाली असे गृहीत धरणे अशक्य आहे.

आपण फ्रॉइडच्या उपपत्तीवर जी टीका केली तिचा मुख्य रोख त्या उपपत्तीवर जो मूलभूत आक्षेप आहे त्याकडे होता. हा आक्षेप म्हणजे संस्कृतीचे स्वरूप आणि संस्कृतीच्या विकासाचा मार्ग ह्यासंबंधीच आहे. ह्या उपपत्तीविरुद्ध तपशिलाबद्दलचे आणखी बरेच आक्षेप घेता येण्यासारखे आहेत, पण ते प्रो. क्रोबर ह्यांनी आपल्या उत्कृष्ट निबंधात पुढे मांडलेले आहेत व फ्रॉइडच्या उपपत्तीतील मानववंशशास्त्रीय आणि मनोविश्लेषणशास्त्रीय विसंगती स्पष्टपणे व वाचकाची खात्री पटेल अशा रीतीने दाखवून दिली आहे.[१]

तरी पण आणखी एक अडचण आहे की, तीमध्ये मनोविश्लेषणशास्त्र कुलचिन्हांच्या उत्पत्तीसंबंधी चुकीच्या तर्कावर आधारलेले सिद्धांत पुढे मांडते. जर ईडिपस मनोगंडाचे मूळ कारण व संस्कृतीचा उगम पितृहत्येच्या गुन्ह्यामध्येच शोधायचा असेल, म्हणजे हा मनोगंड मानवाच्या " वांशिक स्मरणशक्तीत " शिल्लक राहिलेला असेल, तर मग कालांतराने तो मनोगंड कमी कमी होत नाहीसा व्हायला पाहिजे. फ्रॉइडच्या उपपत्तीप्रमाणे ईडिपस मनोगंड ही एक प्रथम भयंकर वस्तुस्थिती व नंतर एक वारंवार मनात येणारी आठवण राहिली असती व उच्च संस्कृतीत ती अजिबात नाहीशी व्हावयास पाहिजे होती.

हा निष्कर्ष अटळ आहे, पण तो जोराने पुढे मांडण्याची जरुरी नाही. कारण डॉ. जोन्स आपल्या निबंधात त्याबद्दलचे संपूर्ण आणि सुस्पष्ट असे विवेचन करतात. त्यांच्या मताप्रमाणे सर्वोच्च संस्कृतीतील समाजरचना, म्हणजे पितृसत्ताक कुटुंबपद्धती, ही इतिहासपूर्वकालांत घडलेल्या गुन्ह्यामुळे उत्पन्न झालेल्या सर्व अडचणींचे निराकरण करू शकते.

" आपल्याला परिचित असलेली पितृसत्ताक पद्धती म्हणजे बापाचे श्रेष्ठत्व नुसते मान्य करते एवढेच नव्हे तर ते प्रेमाने मान्य करते आणि त्यात मातृसत्तेला किंवा गुंतागुंतीच्या निर्बंधांना वाव मिळत नाही. ह्या पद्धतीत मानव निरुपद्रवी बनतो व ईडिपस मनोगंड हळूहळू आतल्या आत मुरतो. शेवटी मनुष्य आपल्या खऱ्या बापासमोर उभा राहतो आणि त्याच्याबरोबर राहू शकतो. फ्रॉइडने जे म्हटले आहे की, कुटुंबातील बापाच्या स्थानाला मान्यता मिळणे ही संस्कृतीच्या विकासातील सर्वांत महत्त्वाची प्रगती आहे ते अतिशय योग्य आहे."[२]

अशा रीतीने डॉ. जोन्स व त्यांच्या अविकृत मतांच्या आधारावर फ्रॉइड स्वतः

हा निष्कर्ष काढतो. ते हे मान्य करतात की, त्यांनी पुढे मांडलेल्या अनुक्रमात मूळच्या मनोगंडापासून सर्वांत अधिक दूर असलेली पितृसत्ताक समाजरचनाच ईडिपस मनोगंड हळूहळू पचवून टाकू शकते. फ्रॉइडचा प्रख्यात ग्रंथ ' कुलचिन्ह व निर्बंध ( टोटेम अँड टाबू ) ' ह्यातील उपपत्तीशी वरील विधान उत्तम प्रकारे जुळते. पण ते मनोविश्लेषणाच्या सर्वसाधारण तत्त्वांशी आणि मानववंशशास्त्राच्या सिद्धांतांशी कसे जमते ?

ह्यातला पहिला मुद्दा घेतला तर आपल्याला असा प्रश्न विचारावा लागतो की, ईडिपस मनोगंडाचा शोध आपल्या एका आधुनिक पितृसमाजातच लागला नाही का ? हा मनोगंड आधुनिक पितृसत्ताक जगात मनोविश्लेषणशास्त्रज्ञ असंख्य व्यक्तींमध्ये रोज शोधून काढीत नाहीत काय ? ह्या प्रश्नाचे नकारार्थी उत्तर देणारा मनोविश्लेषणशास्त्र खासच असू शकणार नाही. म्हणजे आधुनिक मानवाने हा ईडिपस मनोगंड पूर्णपणे पचवून आत्मसात केला आहे असे दिसत नाही. समजा, जरी आपण एक वेळ मान्य केले की, मनोविश्लेषणातील शोधात बरीच अतिशयोक्ती असते तरी ह्या मुद्याला आधार देणारे सर्वसाधारण समाजशास्त्रीय निरीक्षण बऱ्याच प्रमाणात उपलब्ध आहे. पण मनोविश्लेषण करणाऱ्या शास्त्रज्ञाला दोन्ही बाजूंनी बोलता येणार नाही. वैयक्तिक मनाचे व समाजाचे आजार बरे करण्याकरता त्यांच्या कुटुंबातील बिघडलेले परस्पर संबंध अंतर्मनातून एका बाजूला बाहेर ओढून काढायचे, आणि त्याच वेळी मोठ्या आनंदाने आपल्याला खात्री द्यायची की, " बापाचे सत्ताधारी स्थान आपल्या समाजात सर्वमान्य आहे ", एवढेच नव्हे तर " त्याचा स्वीकार प्रेमाने होत आहे." खरे म्हटले तर ज्या समाजात पितृसत्तेचा अतिरेक झालेला असतो व कुटुंबातील सर्व अधिकार बापाच्या हातात केंद्रित झालेले असतात त्याच समाजातील कुटुंबात निरनिराळ्या माणसांची एकमेकांविषयीची मने बिघडण्याचा सर्वांत अधिक संभव असतो. मनोविश्लेषणशास्त्रज्ञ हे विधान सत्य आहे हे आपल्याला दाखवून देण्याकरता शेक्सपिअर, बायबल, रोमचा इतिहास व ग्रीक पुराणे ह्यांची मदत घेत आहेत. ह्या मनोगंडाला ज्याचे नाव दिलेले आहे तो नायक ( ईडिपस ) एका पितृसत्ताक समाजातच राहात नव्हता का ? आणि त्याची दु:खद कथा बापाचा मत्सर आणि अंधश्रद्धेमुळे वाटणारी भीती ह्यांच्यामुळेच घडली नाही का ? आणि ह्या भावना व हेतू समाजशास्त्रीयच नाहीत का ? जर ह्या लोककथेतील अथवा शोक-पर्यवसायी नाटकातील पात्रे पितृसत्ताक समाजाच्या विधिलिखिताप्रमाणे वागत नसती तर आपल्या मनावर त्याचा असा जोरदार आणि विघातक परिणाम झाला असता का ?

बहुतेक आधुनिक मानसिक विकृती, रोग्यांची स्वप्ने, इण्डोजर्मनिक लोकांतील दंतकथा, आपले वाङ्मय, आपले पितृसत्तेबद्दलचे संप्रदाय ही सर्व ईडिपस मनोगंडाशी जोडण्यात आली आहेत. म्हणजे " पितृसत्ताक कुटुंबव्यवस्थेत मुलगा बापाचे स्थान मानीत नाही "; त्याला आपल्या " खऱ्या बापासमोर उभे राहण्यास " नको असते;

त्याला "त्याच्या बरोबर शांततामय आयुष्य जगायला" नको असते. वस्तुस्थिती अशी आहे की, आपल्या समाजातील बिघडलेले परस्परसंबंध ईडिपस मनोगंडामुळे घडून आलेले आहेत की नाहीत ह्यावर मनोविश्लेषणाचा खरेखोटेपणा अवलंबून आहे.

वर उद्धृत केलेल्या विधानात जो आशावादीपणाचा सूर आहे त्याबद्दल मानववंशशास्त्राचे काय म्हणणे आहे? जर पितृसत्ताक कुटुंबव्यवस्थेमुळे ईडिपस मनोगंडाने उत्पन्न झालेल्या प्रश्नांचे उत्तर मिळत असेल, आणि प्रत्येक मनुष्याला आपल्या पित्याशी सुलभ नाते प्रस्थापित करता येत असेल तर मग हा मनोगंड आत्मसात न झालेल्या परिस्थितीत अस्तित्वात असतो तरी कुठे? ह्या ग्रंथाच्या पहिल्या दोन भागात मातृसत्ताक कुटुंबपद्धतीत तो "बाजूला वळवला जातो" हे दाखवून दिलेले आहे आणि डॉ. जोन्स ह्यांनीही ते स्वतःच स्वतंत्रपणे मान्य केले आहे. ज्या संस्कृतीचा कधीही सप्रयोग अभ्यास केला गेलेला नाही अशा संस्कृतीत ईडिपस मनोगंड आपल्या भव्य स्वरूपात सापडतो की नाही हा प्रश्न विचारण्यात काही अर्थ नाही. प्रस्तुत ग्रंथाचा एक उद्देश असा आहे की, क्षेत्रसंशोधन (प्रत्यक्ष समाजात जाऊन अभ्यास) करणाऱ्यांना आणखी संशोधन करण्यास प्रोत्साहन मिळावे, अशा प्रकारच्या प्रायोगिक संशोधनातून कोणते निष्कर्ष निघतील की नाही ह्याबद्दल मी तरी निदान काही भविष्य वर्तवू इच्छीत नाही. पण मला असे वाटते की ह्या प्रश्नाचे अस्तित्वच नाकारणे, त्याबद्दल एक उघडउघड अपुरी उपपत्ती पुढे मांडणे, आणि त्या प्रश्नाच्या सोडवणुकीकरता आजपर्यंत जे प्रयत्न झाले त्यांच्याकडे दुर्लक्ष करणे ह्यामुळे मानववंशशास्त्र किंवा मनोविश्लेषणशास्त्र ह्या दोहोंपैकी कुठल्याच शास्त्राच्या प्रगतीला मदत होत नाही.

ह्या प्रश्नाचा मनोविश्लेषणशास्त्राच्या दृष्टिकोनातून विचार करताना दिसून येणाऱ्या विसंगती व दुर्बोधता ह्यांचा डॉ. जोन्स ह्यांच्या चित्तवेधक निबंधाच्या आधारे मी पूर्वीच विचार केला आहे. ह्या विसंगती म्हणजे: "दाबून ठेवलेल्या मनोगंडाची" कल्पना; मातृसत्ता व पितृत्वाच्याबद्दलचे अज्ञान ह्यांचा एकमेकांशी संबंध आहे व तरी ती एकमेकांपासून स्वतंत्र आहेत; पितृसत्ताक पद्धती ही ईडिपस मनोगंडावर एक उपाय आहे व ती त्या मनोगंडाचे कारणही आहे. माझ्या मते ह्या सर्व विसंगतींची कारणे अशी आहेत की, ईडिपस मनोगंड हा सामाजिक व सांस्कृतिक घटनांचा परिणाम आहे हे न ओळखता तो त्या घटनांचे कारण आहे ही चुकीची समजूत; तो मनोगंड इतिहासपूर्व गुन्ह्यातून उत्पन्न झाला हा सिद्धांत; आणि तो मनोगंड वांशिक स्मरणात राहून एका पिढीकडून दुसरीकडे दिला जाऊन सामुदायिक प्रवृत्तीत त्याचे रूपांतर झाले हे मत.

मला आणखी एकच मुद्दा पुढे मांडावयचा आहे. कोणतीही ऐतिहासिक घटना काल आणि स्थळ ह्यांच्यावरच आधारित असली पाहिजे व त्या वेळच्या आणि त्या जागेच्याबद्दल आपल्याला तपशीलवार माहिती कळली पाहिजे. मग पहिल्या

पितृहत्येच्या गुन्ह्याबद्दल ह्या बाबतीत आपण काय कल्पना करू शकतो? कोणे एके काळी, कोणत्या तरी एका ठिकाणी एका प्रचंड टोळीत एक विशिष्ट गुन्हा घडला अशी आपण आपली समजूत करून घ्यायची का? आणि मग ह्या गुन्ह्याने संस्कृती उत्पन्न केली, मग ही संस्कृती सर्व जगभर पसरत गेली व ती जेथे जेथे पोचली तेथे वानरांचे मानव बनले? नुसती ही कल्पना पुढे मांडायचा अवकाश की ती कोलमडते; पण ह्याचा पर्यायही कल्पना करण्यास तितकाच अवघड आहे : अनेक निरनिराळ्या वेळी व ठिकाणी लहान लहान टोळ्यांत पितृहत्या होत होती, प्रत्येक टोळी आपला प्रचंड जुलमी कारभार करीत होती. नंतर गुन्ह्याकडे वळत होती व संस्कृती उत्पन्न करीत होती. जितके जितके आपण ह्या उपपत्तीकडे पाहू, जितके त्यातील तपशील तपासून पाहू तितके प्रोफेसर क्रोबर ह्यांनी म्हटल्याप्रमाणे ती एक " काही तरी गोष्ट " आहे असे आपण म्हणू व फ्रॉइडनेही ह्याला विरोध केलेला नाही.[३]

* *

## प्रकरण ६ वे

# मनोगंड की भावना ?

मी आतापर्यंत " मनोगंड " हा शब्द कुटुंबातील इतर व्यक्तींबद्दलच्या आपल्या भावनेबद्दल वापरला आहे. एवढेच काय, पण या शब्दाचा मी " केंद्रित कुटुंबातील मनोगंड " या नवीन शब्दप्रयोगात उपयोग केला आहे, व त्यातून एक सामान्य विधान सिद्ध व्हावे असा माझा हेतू होता. हे विधान निरनिराळ्या संस्कृतींना लागू पडते; कारण माझ्या मते इडिपस मनोगंड हा फक्त आर्यन पितृसत्ताक समाजालाच लागू पडतो. पण शास्त्रीय परिभाषेचा असा एक अलिखित नियम आहे की, आधीच उपयोगात असलेला पारिभाषिक शब्द जर एखादी विशिष्ट शास्त्रीय कल्पना स्पष्ट करण्यास पुरसा असेल तर त्याच कल्पनेकरता नवा पारिभाषिक शब्द सुचवणे योग्य होणार नाही. म्हणून मी " केंद्रित कुटुंबातील मनोगंड " हा नवा शब्दप्रयोग वापरणार नाही. माझ्या मते " मनोगंड " ( Comp'ex ) ह्या शब्दात काही कल्पना गृहीत धरलेल्या आहेत. व त्यामुळे केवळ शास्त्रीय बोलभाषेचा तो एक प्रकार बनतो. त्याला जर्मन भाषेत ( Schagwort ) म्हणजे नेहमीच्या प्रचारातील शब्द असे म्हणता येईल. निदान प्रत्येक वेळी आपण तो शब्द कोणत्या अर्थाने वापरतो हे स्पष्ट केले पाहिजे.

मनोगंड ( Complex ) हा शब्द पूर्वी जेव्हा मनोविश्लेषणशास्त्र केवळ मनोविकृती बऱ्या करण्याकरता वापरीत होते तेव्हापासून प्रचारात आला. त्या वेळी मानसिक रोगांवर उपचार करण्याकरताच मनोविश्लेषणाचा उपयोग होई. " मनोगंड " म्हणजे रोग्याच्या दाबून ठेवलेल्या भावनांमुळे होणारा परिणाम. पण आता असा प्रश्न उपस्थित झाला आहे की, सामान्य मानसशास्त्रात एखाद्या व्यक्तीचा दाबून ठेवलेला मानसिक भाग दाबून न ठेवलेल्या भागापासून वेगळा करून मानसशास्त्रदृष्ट्या त्याचा विचार होऊ शकतो की काय ? आमच्या संशोधनात आम्हाला असे आढळून आलेले आहे की, एका व्यक्तीची दुसऱ्या व्यक्तीबद्दल जी काही मनाची भूमिका असेल तीत अनेक निरनिराळ्या भावना एकमेकांत इतक्या खोलवर मिसळलेल्या असतात की त्या वेगळ्या करणे अशक्य असते, कारण त्यांचा एक सेंद्रिय गटच बनलेला असतो. उदाहरणार्थ पित्याबद्दल वाटणारा आदर आणि पूज्यबुद्धी ही नावड, द्वेष आणि तुच्छता ह्यांच्याशी मिसळलेली असतात. कारण ती एकमेकांची प्रतिबिंबेच असतात. ही पित्याबद्दलची विरोधक भूमिला खरोखर मनातील अति उच्च कल्पनेची प्रतिक्रिया असते. सत्य सृष्टीतील

पित्याबद्दलच्या अनुभवामुळे मनात जी काळी छाया पडते तिचाच हा परिणाम असतो. ही छाया "मनाच्या पुढच्या भागात" असते; पण सुप्त मनात तिचा जो भाग असतो तो तिच्याशी एकजीव झालेला असतो व ते दोन वेगळे करणे शक्य नसते; मनोविश्लेषणाचा तज्ज्ञ आपल्या रोगी तपासण्याच्या खोलीत ह्या विकृतीची उघड दिसणारी चिन्हे कदाचित दृष्टीआड करू शकतो; कारण त्यामुळे रोग्याच्या विकृतीत काही फरक होत नाही. तो दाबून टाकलेले विचार उघड करू शकतो, व ते एकत्र करून त्यांना मनोगंड हे नाव देतो. पण तो आपल्याकडे आलेल्या रोग्यांना सोडून ज्या वेळी सामान्य मानसशास्त्राची उपपत्ती शिकविण्याकरता व्याख्यानाच्या वर्गात जातो तेव्हा त्याला हे कळलेले बरे की, मनोगंड ( Complexes ) असे काही अस्तित्वातच नसतात; निदान ते अंतर्मनात स्वतंत्रपणे राहू शकत नाहीत, तर ते एका सेंद्रिय संपूर्णतेचे भाग असतात व त्याचे महत्त्वाचे घटक दाबून टाकलेले नसतात.

मी समाजशास्त्रज्ञ असल्यामुळे मला नेहेमीची मूलभूत वस्तुस्थिती कशी असते ते तपासायचे आहे; विकृतीच्या परिणामांशी माझा संबंध नाही. आणि जरी हे विश्लेषण आतापर्यंत पुढे ढकलले होते, कारण आता त्याला संशोधनाचा व वस्तुस्थितीचा आधार देता येतो, तरीही आतापर्यंतच्या कौटुंबिक परिणामांचा विचार करताना मी स्पष्टपणे पुढच्या ( बाहेरच्या ) मनातील व सुप्त मनातील मूलतत्त्वांचा उल्लेख केलेला आहे. मनोविश्लेषणशास्त्राचा हा मोठा गुण आहे की, पिता आणि माता ह्या दोघांबद्दलचेही चांगले व वाईट असे दोन्ही प्रकारचे विचार त्यामुळे माहीत झाले. त्यांच्याबद्दल आपल्या बाहेरच्या मनात काही विचार असतात, तर आतल्या सुप्त मनातही काही विचार असतात. पण आपण हे विसरता कामा नये की दोन्हीही सारखेच महत्त्वाचे असतात.

ज्या अर्थी आपल्याला हे स्पष्ट झाले आहे की, समाजशास्त्रात इतरांपासून वेगळा केलेला व दाबून ठेवलेला इतरांबद्दचा ग्रह उपयोगी पडत नाही, त्या अर्थी आपण असा प्रयत्न केला पाहिजे की, आपल्याला ह्या घटनेची स्पष्ट कल्पना कशी येईल व आपण पूर्वी ज्याला " केंद्रित कुटुंबातील मनोगंड " म्हणालो होतो त्याचा मानसशास्त्रातील कोणत्या तत्त्वांशी संयोग करावा म्हणजे मनातील उघड असलेली व सुप्त असलेली मूलतत्त्वे एकत्र येतील. मी पूर्वी असे स्पष्टपणे दर्शविले आहे की, आधुनिक मानसशास्त्रातील काही प्रवृत्ती मनोविश्लेषणशास्त्राच्या बऱ्याच जवळ येतात. तेथे माझ्या मनात श्री. ए. एफ. शांड ह्यांनी आपल्या भावनासंबंधीच्या उपपत्तीमुळे आपल्या ज्ञानात जी भर टाकली आहे तीच आहे. हीच उपपत्ती पुढे स्टाउट, वेस्टमार्क, मॅक्डूगल व इतरांनी जास्त विकसित केली. श्री शांड हे ही गोष्ट ओळखणारे पहिले शास्त्रज्ञ होते की, भावना ह्या वेगळ्या वेगळ्या मूलतत्त्वांसारख्या नसून त्यांचा विचार एकमेकांपासून अलग असा करता येणार नाही. त्या काही आपल्या मनाच्या माध्यमात इतस्ततः फिरणाऱ्या घटना असून क्वचित् पृष्ठभागावर दिसतात अशी वस्तुस्थिती

नाही. श्री. शांड यांची उपपत्ती, त्याचप्रमाणे इतरांनी केलेले नवीन संशोधन श्री. शांड ह्यांनीच प्रथम पुढे मांडलेल्या सिद्धांतावर आधारलेले आहे, तो सिद्धांत असा :

आपले भावनात्मक जीवन भोवतालच्या परिस्थितीशी जुळते झालेले असते. अनेक व्यक्ती व वस्तू आपल्या भावनांना उत्तेजित करीत असतात व त्यांच्याकडून त्यांना प्रतिसाद मिळत असतो. प्रत्येक व्यक्ती व वस्तू ह्यांच्याभोवती भावनांची एक विशिष्ट प्रकारची जुळणी झालेली असते – आईबाप, देश किंवा कामधंदा ह्यांबद्दल वाटणारे प्रेम, द्वेष किंवा भक्ती. अशा प्रकारच्या संघटित मनोविकारांच्या समुच्चयाला श्री. शांड भावना म्हणतात. आपल्या कुटुंबातील निरनिराळ्या व्यक्तींना आपल्याशी जोडणारे बंध, देशभक्ती, सत्याची, प्रामाणिकपणाची अथवा शास्त्राबद्दलच्या भक्तीची ध्येये ही सर्व " भावना " ह्या खालीच मोडतात. आणि प्रत्येक मनुष्याच्या जीवनावर ह्यापैकी काही मर्यादित भावनांचाच ताबा असतो. ही भावनांबद्दलची उपपत्ती श्री. शांड ह्यांनी एक-दोन लहान निबंधांत पुढे मांडली, व ते निबंध खरोखरच मानसशास्त्रात युगप्रवर्तक ठरले. पुढे त्यांनी त्यांचा विस्तार करून एक ग्रंथ लिहिला.[१] त्यांच्या ग्रंथात श्री. शांड ह्यांनी काही प्रवृत्तींबद्दल त्या जन्मजात प्रवृत्ती आहेत, उदाहरणार्थ प्रेम आणि द्वेष, असे गृहीत धरले आहे व त्या प्रत्येकीत इतर अनेक मनोविकार अंतर्भूत होतात असे ते मानतात. प्रत्येक मनोविकार परत श्री. शांड ह्यांच्या मते एका विशिष्ट परिस्थितीमुळे उत्पन्न होतो ( म्हणजे त्या व्यक्तीची त्या परिस्थितीबद्दलची ती प्रतिक्रिया असते ) व तो बराच गुंतागुंतीचा असतो. ह्याचा अर्थ असा की, प्रत्येक मनोविकारात अनेक उपजत बुद्धीच्या प्रक्रिया अंतर्भूत असतात. श्री. शांड ह्यांची मनोविकार व भावना ह्यांबद्दलची उपपत्ती समाज-शास्त्राच्या दृष्टीने नेहेमीच अतिशय महत्त्वपूर्ण राहील; कारण सामाजिक बंधने व सांस्कृतिक मूल्ये ह्या भावना, परंपरा व संस्कृती ह्यांच्यामुळेच प्रमाणभूत होऊ शकतात. दोन अगदी वेगळ्या संस्कृतीत कुटुंबव्यवस्था कशी विकसित होते ह्याचे उदाहरण आपण पूर्वी पाहिलेलेच आहे. ह्यातच श्री. शांड ह्यांची उपपत्ती प्रत्यक्ष परिस्थितीला कशी लागू पडते ह्याचा दाखला आलेला असून विशिष्ट सामाजिक परिस्थितीत भावनाविषयक उपपत्ती लागू केलेली आहे. लहान मुलाची आपल्या सभोवारच्या परिस्थितीतील महत्त्वाच्या वस्तूंबद्दलची प्रतिक्रिया कशी बनत जाते हे आपण पाहिले, व ती प्रतिक्रिया कोणत्या गोष्टींच्या प्रभावामुळे घडून येते हेही पाहिले.

श्री. शांड ह्यांच्या उपपत्तीला थोडी दुरुस्ती व काही जादा मुद्दे घालण्यात आपल्याला मनोविश्लेषणशास्त्राने जी मदत केली ती म्हणजे दाबून ठेवलेल्या भावनांचा विचार करण्याबद्दलची. पण ह्या दाबून ठेवलेल्या भावना एखाद्या जलाभेद्य पेटीसारख्या अलग करता येत नाहीत, आणि त्या इतर मनोविकारांपासून वेगळ्या व निराळ्या आहेत असे समजता येत नाही. म्हणजे आपल्याला असे स्पष्ट दिसून येते की, श्री. शांड यांची मनोविकार व भावना ह्यांबद्दलची उपपत्तीच आपल्याला

स्वीकारली पाहिजे आणि कौटुंबिक मनोगंडाबद्दल न बोलता आपल्याला कौटुंबिक भावना, नात्याचे संबंध त्या त्या विशिष्ट समाजात कसे आहेत ह्याचा विचार केला पाहिजे.

बाप, आई, बहीण, भाऊ ह्यांच्याबद्दलचा आपल्या मनातील ग्रह एकमेकांपासून अलग अलग बनत नाही. कुटुंबाची अतूट एकी आपल्या मनातील सर्व भावना एकत्र आणून जोडते व त्यांची एकत्र रचनाबद्ध संस्था बनवते. आमच्या संशोधनाने हे अगदी स्पष्टपणे दाखवून दिले आहे. म्हणजे, "केंद्रित कुटुंबाचा मनोगंड" म्हणजेच एकमेकांशी जोडलेल्या व संबंधित भावना, किंवा थोडक्यात पितृसत्ताक किंवा मातृसत्ताक कुटुंबातील व्यक्तींच्या प्रातिनिधिक भावनांचा समूह.



प्रकरण १ ले

# नैसर्गिक अवस्थेतून संस्कृतीत संक्रमण

ह्या ग्रंथाच्या पूर्वीच्या भागात काही विशिष्ट मनोविश्लेषणशास्त्राच्या निष्कर्षांचा आपण विचार केला व त्यांवर थोडीबहुत टीकाही केली. आपण असे तत्त्व प्रस्थापित केले आहे की, संस्कृतीपूर्व काळात असे कोणतेही माध्यम उपलब्ध नसते की, त्याच्यातून समाजव्यवस्था, नीतितत्त्वे, धर्म इत्यादी अस्तित्वात येऊ शकतात; आणि अशा संस्थांबद्दलची माहिती एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे जाईल अशी स्मरणयंत्रणाही अस्तित्वात असत नाही. एका विशिष्ट कृत्यामुळे किंवा एका विशिष्ट क्षणी संस्कृतीचा एकदम उगम होऊ शकतो, व प्रथा, नीती, धर्म इत्यादी एकदम अस्तित्वात येतात हे ज्यांना मान्य नाही त्यांना वरील सिद्धांत खरे असल्याची खात्री पटेल. त्या विशिष्ट कृत्यामुळे अगर त्या विशिष्ट क्षणी समाजात केवढीही उलथापालथ झाली तरी वरील विधान सत्यच आहे हे आपल्याला कळून येईल. निसर्गावस्थेत राहणारे प्राणी असे एकदम संस्कृतिसंपन्न मानव बनू शकत नाहीत. पण केवळ एखाद्या उपपत्तीची असत्यता दाखवून किंवा चुकांचा केवळ निर्देश करूनच आपण स्वस्थ बसता कामा नये. तर सत्य काय आहे हेही आपण शोधून काढले पाहिजे, व विधायक सूचनाही केली पाहिजे. त्याकरता सांस्कृतिक बदल व नैसर्गिक बदल ह्यांतील संबंधाबद्दल आपण जास्त विचार केला पाहिजे.

नैसर्गिक परिस्थितीतील प्राण्यांची वागणूक आणि संस्कृती आल्यानंतरची मानवाची वागणूक ह्यात फार फरक आहे. मानवाची संस्कृती कितीही साधी किंवा प्राथमिक असली तरी त्याच्याजवळ काही साधी अवजारे ( implements ) असतात, शस्त्रे असतात, घरातील उपयोगाच्या वस्तू असतात. तो ज्या समूहात वावरतो त्याकडून त्याला मदतही मिळते व त्याच्यावर त्याचा दाबही पडतो. त्याला भाषेचा उपयोग करून आपले विचार दुसऱ्याला कळवता येतात व त्यातून तर्काधिष्ठित किंवा धार्मिक किंवा जादूसंबंधीच्या कल्पना उद्भवतात. ह्याचा अर्थ असा की, मानवाजवळ काही मालकीच्या वस्तू असतात, तो एका सामाजिक संघटनेत राहतो, भाषेने इतरांशी व्यवहार करतो, आणि आध्यात्मिक मूल्यांकडून त्याच्या मनावर परिणाम होतो. मानवाच्या सांस्कृतिक साध्यांचे सर्वसाधारणपणे वरील चार गोष्टींच्या साहाय्याने वर्णन केले जाते. म्हणजे आपल्याला जेव्हा एखाद्या समाजात संस्कृती दिसते तेव्हा ती आधीपासूनच तेथे अस्तित्वात असली पाहिजे. आणि एक गोष्ट आपण स्पष्टपणे

ओळखली पाहिजे की, संस्कृती जन्माला येण्यापूर्वीच आपल्याला ती कळू शकणार नाही. तसेच " अमुक एका घटनेपासून संस्कृतीचा जन्म झाला " अशा प्रकारची उपपत्ती पुढे मांडणे हेही फायदेशीर ठरणार नाही. तर मग मानवी संस्कृतीबद्दल काही तरी भरमसाट विधाने न करता किंवा पुराव्याच्या अभावी काहीही गोष्टी गृहीत न धरता जर आपल्याला मानवी संस्कृतीच्या उत्पत्तीबद्दल विचार करावयाचा असेल तर आपण कोणता मार्ग स्वीकारावा ? एक गोष्ट आपल्याला करता येईल, आणि ती म्हणजे संस्कृतीच्या विकासात निरनिराळ्या घटकांचे कार्य काय होते ह्याचा विचार करणे, त्या घटकांमुळे मानवाच्या गुणांवर व मनावर काय परिणाम झाला हे पाहणे, आणि मानसशास्त्राच्या बाहेरच्या गोष्टींमुळे मानवाच्या नैसर्गिक देणगीवर काय परिणाम होतो हे तपासणे. कारण मानवाच्या सांस्कृतिक विकासाचे घटक एकमेकांत गुंतलेले आहेत व एकमेकांवर अवलंबून आहेत. आपल्याला विकासाच्या ऐतिहासिक कालानुक्रमाची काही एक माहिती नाही व अमुक गोष्ट प्रथम की तमुक गोष्ट मागून हे आपल्या बुद्धीला कळू शकत नाही; किंवा तिच्यावर आपला काही ताबा राहात नाही. तरीही घटकांचा परस्पर संबंध काय आहे ह्याचा अभ्यास करून आपल्याला बरेच ज्ञान होऊ शकते. ह्या परस्पर संबंधांचा अभ्यास आपल्याला पूर्ण संस्कृती असलेल्या समाजातच करावा लागतो, पण मागे मागे जाऊन त्यांचे प्राथमिक स्वरूप काय होते ते आपण तपासून पाहू शकतो. अशा रीतीने जर आपल्याला एक विशिष्ट पक्की पद्धती सर्व सांस्कृतिक विकासात आढळली तर मग आपल्याला असे म्हणता येईल की, आपल्याला दिसून आलेल्या नियमांविरुद्ध जी उपपत्ती जाते ती चुकीची असली पाहिजे. एवढेच नव्हे तर जर सांस्कृतिक विकासाच्या नियमांमध्ये आपल्याला काही विशिष्ट घटकांचा प्रभाव दिसून आला तर हे घटक संस्कृतीच्या उत्पत्तीतही महत्त्वाचे असलेच पाहिजेत हे उघड आहे. ह्या विचारसरणीप्रमाणे संस्कृतीच्या उत्पत्तीमध्ये विशिष्ट कालाची कल्पना नसून फक्त संस्कृतीच्या विकासाच्या सर्व अवस्थेत आणि म्हणून अर्थातच तिच्या उत्पत्तीमध्ये कांही विशिष्ट घटक महत्त्वाचे असले पाहिजेत हे उघड आहे.

एक गोष्ट आपण अगदी आरंभापासूनच ओळखली पाहिजे की, संस्कृतीची मुख्य अंगे एकमेकांत गुंतलेली असतात व अर्थातच ती एकाच वेळी कार्यक्षम होतात. ती एकामागून एक उत्पन्न झालेली असणे शक्य नाही, व त्यांचा कालानुक्रम ठरविता येणार नाही. उदाहरणार्थ वस्तुरूप संस्कृती मानवाला आपली पारंपरिक हत्यारे व अवजारे वापरण्याचे ज्ञान होण्याआधीच अस्तित्वात येणे शक्य नव्हते. ज्ञान आणि परंपरा ही भाषा आणि कल्पनांसंबंधीचे विचार ( Conceptual Thought ) ह्यांशिवाय शक्य नाही. म्हणजे भाषा, विचार आणि वस्तुरूप संस्कृती ही एकमेकांशी जुळलेली आहेत, तशी ती संस्कृतीच्या सर्व अवस्थांत असली पाहिजेत आणि म्हणून अर्थातच संस्कृतीच्या प्रारंभीही त्यांचे एकत्र अस्तित्व असले पाहिजे. जीवनाची

वस्तुसंबंधीची व्यवस्था, उदाहरणार्थ घरांचा वापर, घरांतील भांडीकुंडी व इतर उपकरणे, रोजचे जीवन जगण्याची पद्धती, ही सर्व सामाजिक जीवनाची आवश्यक अंगे आहेत, व एकमेकांवर अवलंबून आहेत. चूल आणि उंबरठा ही केवळ कौटुंबिक जीवनाची कल्पनेतील चिन्हे आहेत असे नव्हे तर नात्याचे संबंध जोडण्याची ती प्रत्यक्ष साधने आहेत. त्याचप्रमाणे नीतिबंधनाची शक्ती व्यक्तीला आपल्या प्रबळ प्रेरणेवर ताबा मिळवण्यास आणि मिळालेल्या उपजतबुद्धीच्या सीमेपलीकडे जाण्यास मदत करते; कारण सांस्कृतिक परिस्थितीत अगदी साध्या तांत्रिक क्रियांतही ही गोष्ट कायम जरूर असते. उपजत गुणामध्ये काय बदल घडून येतात त्यात आपल्याला विशेष कुतूहल आहे, कारण इथे दाबून ठेवलेल्या प्रेरणांचा प्रश्न उत्पन्न होतो. मनोविकारांच्या प्रवृत्तीमधील बदल हा सुप्त अथवा अंतर्मनाचाच भाग असतो. मी असे दाखविण्याचा प्रयत्न करणार आहे की, मानवी उपजत प्रवृत्तींत संस्कृतीमध्ये काय फरक पडतो ह्याच्या अभ्यासाकडे दुर्लक्ष केल्यामुळे ईडिपस मनोगंडाच्या उत्पत्तीबद्दलची विलक्षण उपपत्ती पुढे मांडण्यात आली. माझा उद्देश असा आहे की, संस्कृतीचा प्रारंभ म्हणजे मानवाच्या उपजत प्रवृत्तींवर ताबा मिळवणे व त्या नियंत्रित करणे होय. आणि ईडिपस मनोगंड किंवा दुसरा कोणताही “ मनोगंड ” हे हळूहळू विकास पावणाऱ्या व रूप घेणाऱ्या संस्कृतीतून उद्भवणारे उपघटक आहेत.

ह्या उद्दिष्टाकरता मी असे दाखवणार आहे की, संस्कृतियुक्त मानवी समाजातील आईबाप आणि मूल ह्यांच्यात अनैतिक लैंगिक संबंधाबद्दलचा मोह उत्पन्न होणे अटळ आहे. उलट प्राण्यांच्या कुटुंबात, जेथे केवळ उपजत बुद्धीचेच वर्चस्व असते तेथे ही परिस्थिती उद्भवत नाही. मी असेही प्रतिपादन करणार आहे की, मानवाच्या मनातील हा मोह अगदी दयामाया मनात न आणता दाबून टाकलाच पाहिजे कारण अनैतिक संबंध व कुटुंबव्यवस्था समाजात एकत्र नांदू शकत नाहीत. तसेच संस्कृती म्हटली की, शिक्षणाची जरुरी भासते आणि थोडासा जुलूम केल्याखेरीज शिक्षण देणे शक्य होत नाही. हा अधिकार कुटुंबात पित्याकडे असतो, आणि पितापुत्रांच्या संबंधातूनच दाबून टाकलेला द्वेष आणि मनोगंडातील इतर भावना उद्भवतात.

▲ ▲

## प्रकरण २ रे

# संस्कृतीचे उत्पत्तिस्थान म्हणजे कुटुंब

उपजत बुद्धीच्या प्रतिक्रियेतील मूलभूत बदल आता आपण अभ्यासला पाहिजे. कारण तोच आपल्या संशोधनाचा विषय आहे. कुटुंबाचे प्राथमिक स्वरूप काय होते व प्राण्याच्या कुटुंबाचे मानवी कुटुंबात रूपांतर कसे झाले ? सर्व मनोविश्लेषणातील प्रश्न कुटुंबाच्या जीवनावर केंद्रित झालेले आहेत, आणि हा लेखक ज्या मानववंशशास्त्रीय विचारसरणीचा अनुयायी आहे त्याच्या मते कुटुंब हा सर्व आदिवासी समाजांचा सर्वांत महत्त्वाचा घटक आहे.[१] पुढे प्रियाराधन, लैंगिक संयोग, वैवाहिक संबंध व आईबापांकडून मुलांची काळजी ह्यासंबंधी प्राणी व मानव ह्यांच्या समाजांची जी तुलना केली आहे त्यावरून असे दिसून येईल की, कुटुंब ही समाजाची मूलभूत पेशी व मानवी संघटनेचा प्रारंभ समजली पाहिजे.

आपल्या विवेचनात ह्यापुढे जाण्यापूर्वी एक मुद्दा समजून घेतला पाहिजे. पुष्कळसे मानववंशशास्त्रज्ञ असे गृहीत धरतात की, मोठाले कळप करून राहणाऱ्या कोणत्या तरी वानरापासून मानवाचा विकास झाला, व त्या वानरांची उपजत प्रवृत्ती "(तथाकथित टोळी बनवण्याची प्रवृत्ती)" मानवात अनुवंशाने आली. ही उपपत्ती मी पुढे मांडलेल्या उपपत्तीच्या अगदी विरुद्ध आहे. कुटुंबातील व्यक्तींशी जे संबंध प्रस्थापित होतात त्यांचाच विस्तार होऊन सामाजिक संबंध बनतात; दुसऱ्या कोणत्याही पद्धतीने नाही. जोपर्यंत आपल्याला असे दाखवून देता येत नाही की, संस्कृतिपूर्व जमाव कधी नव्हतेच, तोपर्यंत प्राण्यांच्या जमावाची व मानवी समाजातील संबंधांची तुलना करता येणार नाही. मानवी समाजातील संबंध ही एक संस्कृतीने साध्य झालेली घटना आहे. प्राण्यांचे जमाव हे उपजत प्रवृत्तीमुळे बनतात. अर्थातच इतिहासपूर्व कुटुंबातून संस्कृती उत्पन्न झाली हे म्हणणे बरोबर नाही. ही "जमाव करण्याची प्रवृत्ती" प्रत्येक मुद्द्याच्या विचाराच्या वेळी आपल्याला भेटून ती चुकीची आहे असे दर वेळी सांगण्याऐवजी प्रथमच त्या दृष्टिकोनाचा विचार करून तो चुकीचा आहे हे दाखवणे जास्त सोईचे आहे.

मला वाटते, मानवाचे पूर्वज मोठाले कळप करून राहात होते आणि एकमेकांशी उपजत बुद्धीमुळे सहकार करून जीवन कंठीत होते, की ते एकेका वेगवेगळ्या कुटुंबात राहात होते ह्याबद्दल केवळ विचार करून काही निष्कर्ष काढणे उपयुक्त होणार नाही. आपल्याला ज्या प्रश्नाचे उत्तर पाहिजे आहे तो असा की, प्राण्यांच्या कळप करून

राहण्याच्या साहजिक प्रवृत्तीतून काही मानवी समूहरचना निघालेली आहे की काय? म्हणजे प्राण्यांच्या कळप करून राहण्याच्या प्रवृत्तीतून काही समाजरचना उत्पन्न झाली आहे की काय?

प्रथम आपण प्राण्यांच्या एकत्र राहण्याच्या प्रवृत्तीचा विचार करू. असे कित्येक प्राणी आहेत की ते मोठाले कळप करून राहतात आणि आपल्यापुढील प्रश्न परस्पर सहकार्याने सोडवतात. अशा प्राण्यांमध्ये एक विशिष्ट "एकत्र राहण्याची उपजत प्रवृत्ती" किंवा "घोळक्याची इच्छा" असते असे आपल्याला म्हणता येईल का? उपजत बुद्धीबद्दल सर्व तज्ञांचे एकमत आहे की, तीमुळे होणारी वागणूक कायम राहते, बदलत नाही, व तीमुळे शरिराची कोणती तरी गरज भागवली गेली पाहिजे. तसेच ती त्या विशिष्ट जातीच्या सर्व प्राण्यांत दिसून आली पाहिजे. उपजत बुद्धीची उदाहरणे पुढीलप्रमाणे देता येतील: अन्नाचा शोध घेण्याच्या व अन्नग्रहण करण्याच्या पद्धती; लैंगिक संयोग, पिल्ले वाढवण्याची व त्यांना शिकविण्याची तऱ्हा; चालणे, पळणे, उडणे ह्या क्रिया; हल्ला करण्याची किंवा बचाव करण्याची पद्धती— ह्या सगळ्या उपजत प्रवृत्ती आहेत. ह्या प्रत्येकीत सहज प्रवृत्ती व शरीररचना ह्यांचा संबंध आहे. शरीरक्रियाविज्ञानाचा संबंध आहे व जीवजातीच्या प्रचंड प्रक्रियेत व्यक्ती आणि प्राणीजात टिकून राहण्याला त्यांचा खास उपयोग आहे. जेव्हा जेव्हा बाह्य परिस्थिती किंवा त्याच्या शरीराची अवस्था विशिष्ट प्रकारची असेल तेव्हा तेव्हा कोणत्याही प्राणीजातीतला प्रत्येक प्राणी उपजत बुद्धीमुळे एकाच विशिष्ट पद्धतीने वागतो.

मग एकत्र जमून थवे करण्याच्या प्रवृत्तीचे काय? ही एक लक्षात घेण्यासारखी गोष्ट आहे की, निरनिराळ्या क्रियांची विभागणी, वागणुकीतील परस्परावलंबन आणि सामुदाइक जीवनाची व्यवस्था कीटक किंवा पोवळ्यांचे खडक अशा अगदी खालच्या थरावरील प्राण्यात सर्वांत अधिक प्रमाणात आढळतात. (लेखकाचा निबंध "नेचर" ह्या नियतकालिकाच्या १९-७-१९२४ च्या अंकात "सहज प्रवृत्ती व संस्कृती" ह्या शीर्षकाखाली पाहा.) पण एकत्र राहणारे कीटक किंवा टोळ्यांत राहणारे सस्तन प्राणी ह्यांच्या शरीरात एकत्र राहण्यास (herding) उद्युक्त करणारी कोणतीही विशिष्ट शरीररचना सापडत नाही. प्राण्यांची सामुदायिक वागणूकही त्यांच्या सर्व जीवनाला व्यापते, त्यांच्या सर्व सहजप्रवृत्तींना अनुसरते, पण ती काही एक विशिष्ट, वेगळी अशी सहजप्रवृत्ती नाही. तिला सहजप्रवृत्तींचा एक घटक किंवा त्यांच्यातील झालेला एक साधारण बदल म्हणता येईल व त्यामुळे सर्व महत्त्वाच्या कार्यात तो प्राणी आपल्या इतर सोबत्यांबरोबर सहकार्य करतो. एक महत्त्वाची गोष्ट आपण लक्षात ठेवली पाहिजे की, एकत्र जीवन जगताना प्राणी एकमेकांशी जे सहकार्य करतात ते जन्मजात प्रवृत्तींमुळे होते. मानवी समाजात ज्या प्रकारचे सहकार्य आपण पाहतो तशा प्रकारचे सहकार्य प्राण्यांच्या थव्यात नसते. वर मी ज्या निबंधाचा संदर्भ दिला आहे त्यात ही गोष्ट मी जास्त विस्तारपूर्वक मांडून दाखविलेली आहे.

म्हणजे मानवाला एकत्र थवा करून राहण्याची उपजत प्रवृत्ती नाही व प्राण्यामध्येही ही उपजत बुद्धी नसून थवे अथवा टोळ्या करण्याची सर्वसाधारण पद्धती असते. ह्याचा अर्थ असा की, मानवामध्ये वैयक्तिक फरक होण्यापेक्षाही एकत्रित राहून काही गोष्टी साध्य करून घेण्याची प्रवृत्ती असते. पण ही गोष्ट गृहीत धरून मानववंशशास्त्रातील एखादा सत्यसृष्टीतला प्रश्न सोडवण्यास आपल्याला कोणतीच मदत होणार नाही. एवढेच नव्हे तर समूह करून राहण्याची प्रवृत्ती असते असे गृहीत धरणे हेही चुकीचे आहे. कारण कोणतीही महत्त्वाची कृत्ये सामूहिक रीत्या पार पाडण्याची मानवाची प्रवृत्ती दिसून येते का ? किंवा एखादी स्पष्ट दिसणारी कृती " एकत्रित रीत्या " तो करतो का ? अर्थात त्याला आपल्या सहाकाराच्या शक्ती खूपच वाढवता येतात, इतर अनेक लोकांची मदत एखाद्या सांस्कृतिक कार्यात घेता येते. पण कोणत्याही उद्योगाचा अथवा कार्यक्रमाचा विचार केला तरी तो मानव एकट्याने, दुसऱ्याच्या मदतीशिवायही करू शकतो. जर संस्कृतीच्या परिस्थितीत व प्रकारात ते शक्य असेल तर अन्नग्रहण किंवा इतर शारीरिक गरजा भागविण्याच्या बाबतीत आपल्याला निरनिराळ्या कार्यक्षमतेचे दर्शन घडते : अन्न जमा करणे, मासे पकडणे, शेती ही सर्व एकट्यानेही करता येतात किंवा सामूहिक रीत्याही केली जातात. आपली मानवजात टिकवण्याकरता मानव लैंगिक स्पर्धेकरता समूह करू शकतो, सामूहिक लैंगिक स्वातंत्र्याबरोबरच एकट्याने प्रियाराधनही करू शकतो. कीटक ज्याप्रमाणे सर्वांची प्रजा एकत्र आणून त्यांची काळजी घेतात तसा प्रकार मानवी समाजात आढळत नाही. तेथे आईबाप आपल्या मुलांची जोपासना करून ती वाढवतात. त्याचप्रमाणे जादू किंवा धर्म ह्यासंबंधीचे पुष्कळसे विधी सामूहिक रीत्या केले जातात तरी एकेकट्याने करावयाचे दीक्षाविषयक विधी, एकांतातील अनुभव व एकेकट्याला आलेली प्रचीती ह्यांनाही धर्मात एकत्र केलेल्या समारंभाइतकेच महत्त्व आहे. इतर सांस्कृतिक कृत्यांप्रमाणेच पावित्र्याच्या क्षेत्रातही समूह करण्याच्या " उपजत प्रवृत्ती "चा कोठे मागमूस दिसत नाही.[२] म्हणजे सांस्कृतिक कार्यक्षमतेच्या अभ्यासातून मानवामध्ये एकत्र येण्याची प्रवृत्ती आहे असे आढळत नाही. एवढेच काय, इतिहासात आपण जो जो मागे जावे तो तो एकट्यानेच निदान आर्थिक कृती करावी असे आपल्याला दिसून येते. मात्र हे अगदी केवळ एकट्यानेच केलेले असते असे नाही. अन्नाचा शोध एकेकटा माणूस करीत होता हे काही शास्त्रज्ञांनी पुढे मांडलेले मत मला मान्य नाही. अगदी प्राथमिक अवस्थेतही काही कार्ये एकत्र तर काही एकेकट्याने केली जात होती, व दोन्हीही एकाच वेळी समाजात रूढ होती. पण ह्यात संशय नाही की जसजशी संस्कृतीची प्रगती होत होती तसतशी, विशेषतः आर्थिक क्षेत्रात एकट्याचे कार्य जाऊन अनेकांनी एकत्र येऊन उत्पादन करण्याचे कार्य प्रचंड प्रमाणावर होऊ लागले. म्हणजे संस्कृती वाढेल तशी उपजत प्रवृत्ती वाढेल असला सिद्धांत आपल्याला पुढे मांडावा लागेल, व तो उघडउघड हास्यास्पद आहे. ( उपजत प्रवृत्ती वाढत जाणे ही कल्पनाच चुकीची आहे.)

सामाजिक "समूह बनवण्याच्या प्रवृत्ती"चा विचार आणखी एका दृष्टीकोनातून करता येईल, आणि तो म्हणजे समाजातील व्यक्तींना एकमेकांशी जोडणारे बंध कोणत्या प्रकारचे असतात त्याचा विचार, हे सर्व बंध, मग ते राजकीय, कायदेविषयक, भाषिक किंवा व्यावहारिक म्हणजे नेहमीचे असोत, ते सर्व संपादित म्हणजे जन्मानंतर मिळवलेले असतात. त्यांच्यात जन्मजात किंवा उपजतच अस्तित्वात असलेले काहीच नसते हे सहज कळून येईल. भाषेचेच उदाहरण घेऊ. भाषेने मानवांचे निरनिराळे समूह एकत्र येतात व ज्या प्राण्यांना भाषेने एकमेकांशी संपर्क साधता येत नाही त्यांपेक्षा मानव अगदी वेगळा पडतो. पण मानवाला भाषा शिकावी लागते, ती काही अनुवंशिक नाही. ती मानवजातीतील समाजाच्या, टोळीच्या मालकीची असते व ती कधीही उपजत बुद्धीसारखी पूर्वजांकडून जन्मतःच येत नाही. तसेच "भाषेची उपजत बुद्धी" मानवपूर्व प्राण्यांकडून मानवाकडे आली असणेही शक्य नाही. कारण मानवेतर प्राणी भाषा किंवा तत्सम चिन्हे वापरून एकमेकांशी संपर्क साधू शकत नाहीत.

कोणत्याही प्रकारचे संघटित सहकार्य घेतले तरी थोड्या विचारानंतर आपल्याला कळून चुकते की, ते सांस्कृतिक वापरातील वस्तूवर अवलंबून असते व त्यासंबंधी समाजाचे आलिखित नियम असतात. आर्थिक कार्यक्षेत्रात मानव हत्यारे वापरतो व पारंपरिक पद्धती उपयोगात आणतो. म्हणजे आर्थिक सहकार्य करणाऱ्या समूहातील सामाजिक संबंध संपूर्णपणे सांस्कृतिक चौकटीत असतात. हीच विचारसरणी युद्धाकरता केलेल्या व्यवस्थेला, धार्मिक विधींना किंवा न्यायालयांच्या निर्णयांची कार्यवाही करण्यामध्ये लागू पडते. सृष्टीने मानवाला अशी काही उपजत प्रवृत्ती दिलेली असणे शक्य नाही की तो तिच्या मदतीने वस्तू तयार करतो, पारंपरिक नीतितत्त्वे पाळतो, भाषेचे आवाज समजतो इत्यादी. आणि ह्याचे अगदी साधे कारण असे की, ह्या सर्व गोष्टी निसर्गाच्या कक्षेच्या बाहेरच्या आहेत. मानवी समाजाचे नियम व परंपरा व शक्ती संस्कृतीमुळे अस्तित्वात येतात व समाजावर लादल्या जातात, निसर्गामुळे नव्हे. एखादे रेल्वेचे इंजन चालवणे किंवा मशीनगनचा मारा करणे ह्याबद्दलची उपजत प्रवृत्ती मानवात असणे शक्य नाही. कारण ज्या नैसर्गिक परिस्थितीत मानवाचा विकास झाला तीत ह्या यंत्रांची कल्पना देखील अस्तित्वात नव्हती.

मानवाच्या संघटित वागणुकीत त्याच्यावर ज्या प्रवृत्तींचे नियंत्रण असते त्या सर्व त्याच्या उपजत प्रवृत्तींच्या पलीकडच्या असतात. मानसशास्त्रदृष्ट्या मानवाची संघटना भावनांवर आधारलेली आहे— म्हणजे त्याच्यात बनलेले कल किंवा भूमिका ह्यांवर, पण उपजत बुद्धीवर नव्हे. तांत्रिकदृष्ट्या मानवी संघटना नेहमी वस्तू, हत्यारे, उपकरणे, शस्त्रे इत्यादी पदार्थांवर अवलंबून असते व ही सर्व मानवाच्या शरिराबाहेरची असतात. मानवाची मैत्री अथवा संगती ही नेहमी निरनिराळ्या मूलतत्त्वांच्या एकीकरणाच्यामुळे होते व त्यात कायदा, राजकारण व संस्कृती ह्यांचा

मिलाफ असतो. सर्वांची सारखी भावनात्मक प्रेरणा किंवा एकाच उत्तेजकामुळे होणारी एकच प्रतिक्रिया असा प्रकार नसून एक मिळवलेली सवय व तीही बाह्य परिस्थितीमुळे उत्पन्न झालेली अशी परिस्थिती असते. कुटुंबातील जन्मजात प्रवृत्तीमधून सामाजिक बंधने कशी बनतात हे पुढील विवेचनातून ध्यानात येईल.

ह्या सर्वांचा निष्कर्ष असा की, मानवाला इतरांबरोबर एकजुटीने काम करावेच लागते, आणि त्याची संघटित वागणूक हा संस्कृतीच्या पायाचा एक दगड आहे. प्राण्यामध्ये एकत्र होऊन वागण्याचा प्रकार त्यांच्यामधील उपजत प्रवृत्तीचा परिणाम असतो तर मानवामध्ये तीच क्रिया सवईने उत्पन्न झालेली असते. मानवाचे सामाजिक जीवन संस्कृतीबरोबर वाढत जाते, तेच जर उपजत प्रवृत्तीमुळे उत्पन्न झालेले असते, म्हणजे थवे करण्याच्या जन्मजात बुद्धीमुळे झालेले असते तर ते हळूहळू कमी होत गेले असते किंवा एकाच पातळीवर कायम राहिले असते. वस्तुस्थिती अशी आहे की, संस्कृतीचा मूलभूत पाया म्हणजे उपजत बुद्धी हळूहळू कमी होत जाणे व त्या जागी लवचीक पण विशिष्ट ध्येयाकडे नेणाऱ्या प्रवृत्ती येणे. त्यांच्यातूनच सांस्कृतिक प्रतिक्रिया उत्पन्न होतात. ह्या प्रतिक्रियांचे सामाजिक एकात्मीकरण हा त्या कार्यपद्धतीचा महत्त्वाचा घटक आहे. पण हे एकात्मीकरण उपजत बुद्धीच्या लवचीकपणामुळे उत्पन्न होते. इतर बांधवांशी एकत्र होण्याची एखादी काल्पनिक जन्मतात प्रवृत्ती हे त्याचे कारण नव्हे !

म्हणजे आपल्याला आता असा निष्कर्ष काढता येईल की, कोणतेही मानवी संघटण जन्मजात समाजशील प्रवृत्तीमुळे घडून येत नाही व तशी थवा किंवा कळप करण्याची उपजतबुद्धी मानवात नसते. शिवाय आपल्याला असे स्पष्ट दिसून येते की, प्राण्याकडून मानव जी एक गोष्ट घेतो ती म्हणजे कुटुंब. पण तेथेही प्राण्यांकडून मानवांकडे जाताना ह्या संस्थेत मूलभूत बदल होतो व तिचे स्वरूप आणि रचना पार बदलून जातात; पण तिचा बाह्य आकार मात्र तोच राहतो. आईबाप व मुले ह्यांचा समूह, आई व मुले ह्यांचा कायम संबंध, बापाचे आपल्या मुलांशी नाते व वागणूक ह्या बाबतीत सांस्कृतिक समाजातील मानव व उच्च पातळीवरचे प्राणी ह्यांच्यात पुष्कळच साम्य आहे. पण जसजशी कुटुंबसंस्था संस्कृतीच्या वर्चस्वाखाली जाते तसतसे मानवपूर्व वानरांच्यामधील कुटुंबसंस्थेवर मानवी समाजात निरनिराळी नियंत्रणे येतात; व म्हणून मानवी कुटुंब ही पूर्वी अस्तित्वात नसलेली अशी एक संघटना उत्पन्न होते. तिच्यात सामाजिक संघटनेचे सांस्कृतिक बंध उत्पन्न होतात. आता आपल्याला जन्मजात प्रतिक्रिया बदलून त्यांचे सांस्कृतिक वागणुकीत कसे रूपांतर होते ते पाहावयाचे आहे.

♠ ♠

# प्रकरण ३ रे

# प्राण्यांतील माज व प्राण्यांतील तसेच मानवातील लैंगिक संयोग

प्राण्यांतील प्रियाराधन, लैंगिक संयोग व कुटुंब ह्या जन्मजात प्रवृत्तींची आपण मानवाच्या त्याच प्रकारच्या घटनांशी प्रथम तुलना करू. एक एक मुद्दा घेऊन मानवसदृश वानरांच्यात प्रेम करणे व कुटुंब स्थापन करणे ह्यांच्याशी मानवाच्या बाबतीत तुलना करून कोणते सादृश्य व कोणते फरक दिसतात ते पाहू.

वानरांच्यात प्रियाराधनेला सुरुवात मादीच्या इंद्रियात झालेल्या फरकामुळे होते. ह्या फरकांचे कारण मादीच्या शरीरातील झालेल्या बदलात असते व त्यामुळे आपोआपच नरामध्ये लैंगिक प्रतिक्रिया उत्पन्न होते.[१] त्या विशिष्ट प्राणीजातीत प्रियाराधनेची जी प्रमाण पद्धत असते तिला अनुसरून नर मादीशी वागू लागतो. ह्या परिस्थितीत जे जे नर मादीच्या आसपास असतात ते सर्व तिच्याकडे आपोआप आकर्षिले जातात. मादीला माज आला म्हणजे नर तिच्यापुढे आपल्या अवयवांचे, रंगाचे किंवा इतर गुणांचे प्रदर्शन करतो व मादीला निरनिराळ्या नरांमधून एक निवडण्याची संधी मिळते. ह्या परिस्थितीत त्या विशिष्ट प्राणीजातीतील सर्व प्राणी एकाच प्रकारे वागतात. ह्यामुळे प्राणिशास्त्रज्ञांना प्रत्येक प्राणीजातीच्या ह्या वागणुकीचे एकच प्रमाण वर्णन दिले म्हणजे भागते. अर्थात प्रत्येक प्राणीजातीबद्दल वेगवेगळे वर्णन द्यावे लागते हे उघडच आहे. पण एका प्राणिजातीत वैयक्तिक किंवा इतर फरक इतके क्षुल्लक असतात की प्राणीशास्त्रज्ञांनी त्यांकडे दुर्लक्ष केले तर ते अगदी योग्यच ठरते.

मानववंशशास्त्रज्ञ मानवाच्या प्रियाराधनेच्या व लैंगिक संयोगाच्या बाबतीत अशा प्रकारचे सूत्रबद्ध वर्णन देऊ शकेल काय ? अर्थातच नाही. मानवाच्या लैंगिक जीवनावरील कोणताही ग्रंथ घेतला, मग तो हॅवेलॉक एलिस यांचा सर्वमान्य ग्रंथ असो, किंवा वेस्टर्मार्क, फ्रेझर इत्यादींचे असोत, किंवा क्रॉले याचे ( Mysric Rose ) मधील उत्कृष्ट वर्णन असो, त्यात प्रियाराधन व विवाह ह्यांची अनेक स्वरूपे आढळतात. प्रेम करण्याचे ऋतू दर संस्कृतीत वेगळेवेगळे असतात. त्याचप्रमाणे स्त्रीचे प्रेम संपादन करण्याचे व तिला वश करून घेण्याचे मार्गही भिन्न असातात. प्राणिशास्त्रज्ञाच्या दृष्टीने प्राणीजात हा स्वयंपूर्ण गट असतो, तर मानववंशशास्त्रज्ञाला संस्कृती हा स्वयंपूर्ण गट

दुसऱ्या असतो. शब्दांत सांगायचे तर असे म्हणता येईल की, प्राणिशास्त्रज्ञ प्राणीजातीमध्ये उपजत प्रवृत्तीमुळे होणाऱ्या वागणुकीचा अभ्यास करतो, तर मानववंशशास्त्रज्ञ संस्कृतीमुळे जडलेल्या सवईने होणाऱ्या प्रतिक्रियेचा अभ्यास करतो.

त्या परिस्थितीचा आपण जरा जास्त तपशिलात जाऊन विचार करू. प्रथमच हे लक्षात घेतले पाहिजे की, प्राण्यांप्रमाणे मानवात स्त्री माजावर येण्याचा काळ नसतो. ह्याचाच अर्थ असा की, पुरुष कोणत्याही वेळी संयोग करू शकतो व स्त्री त्याला प्रतिसाद देऊ शकते. मात्र ह्या परिस्थितीत मानवी संयोग सोपा होतो असे मात्र म्हणता येत नाही. सस्तन प्राण्यांतील मादीमध्ये अंडाशयामधून एक पेशी निघाल्याबरोबर तिच्यात जे बदल होतात तसे मानवात होत नाहीत. ह्यावरून आपल्याला असे म्हणता येईल का की मानवाच्या कोणत्या तरी समाजात तारतम्य-हीन पद्धतीने लैंगिक संयोग होतो? आपल्याला माहीत आहे की, ज्या मानवी समाजात पूर्ण लैंगिक स्वातंत्र्य असते तेथेही वाटेल त्या स्त्री-पुरुषात संयोग होत नाही, किंवा पूर्वी कधी होत नव्हता. प्रत्येक मानवी संस्कृतीत प्रथम आपल्याला स्पष्टपणे घालून दिलेले निर्बंध किंवा निषेध आढळून येतात; व त्यामुळे विरुद्ध लिंगाच्या अनेक लोकांची भिन्नता दिसून येते व विशिष्ट समूहातील व्यक्तीत लैंगिक संयोग त्याज्य मानला जातो. ज्या व्यक्ती नेहमी एकमेकांजवळ असतात, म्हणजे एकाच कुटुंबात राहणाऱ्या व्यक्ती— उदाहरणार्थ मातापितरे व मुले, बहीणभाऊ ह्यांच्यातील लैंगिक संबंधावर सक्त निर्बंध असतात. ह्याचाच आणखी विस्तार म्हणजे कित्येक आदिवासी समाजात आणखीही मोठ्या समुदायातील लैंगिक संबंधावर बहिष्कार असतो. हाच बहि-र्विवाहाचा कायदा ( वर व वधू वेगळ्यावेगळ्या टोळ्यांतील असण्याचा नियम ). ह्याच्याच-सारखा दुसरा नियम म्हणजे व्यभिचाराविरुद्ध असलेला नियम. वर दिलेला पहिला नियम कुटुंबाचे संरक्षण करतो तर दुसरा नियम विवाहाचे पावित्र्य कायम ठेवतो.

पण संस्कृतीमुळे लैंगिक प्रवृत्तीवर नुसते निर्बंधच घातले जातात असे नाही. प्रत्येक समाजात निर्बंध व निषेध ह्यांच्याबरोबरच, प्रियाराधन व संयोग ह्यांना प्रोत्साहन दिले जाते. निरनिराळ्या ऋतूंतील समारंभ, नाच आणि स्वतःच्या स्वरूपाचे व कौशल्याचे प्रदर्शन, भोजनसमारंभ व मद्य वगैरे उत्तेजक पेयांचे प्राशन, ह्या सर्व प्रसंगी लैंगिक गोष्टींना पुष्कळच वाव मिळतो व लोकांची तशी अपेक्षाही असते. अशा प्रसंगी स्त्रीपुरुष मोठ्या संख्येने एकत्र येतात व कुटुंबाच्या व आपल्या टोळीबाहेरच्या निरनिराळ्या टोळ्यांतील तरुण-तरुणी एकमेकांना भेटतात. पुष्कळदा समाजातले नेहेमीचे निर्बंध शिथिल होतात व मुलेमुली कोणत्याही बंधनाशिवाय एक-मेकांत मिसळतात. थोडक्यात म्हणजे अशा प्रसंगी प्रियाराधनाला उत्तेजन मिळते; कारण एकंदर समाजाचा उत्सवप्रिय मनाचा कलच ( मूडच ) त्याच्या बाजूचा असतो. शिवाय उत्तेजक पदार्थांचाही उपयोग केला जातोच आणि नृत्य इत्यादी कलाही तेथे पाहावयास मिळतात.

म्हणजे प्रियाराधन व संयोग ह्यांच्याकरता इशारा केवळ शारिरिक बदलामुळे मिळत नसून सांस्कृतिक घटनांच्या संयुक्त परिणामांमुळे मिळतो. अर्थात ह्या सांस्कृतिक घटना शरिरावर परिणाम घडवतात कारण त्यांच्यामुळे तरुण तरुणी एकमेकांजवळ येतात, एक अनुकूल असे मानसिक वातावरण तयार होते व अनुरूप सूचना दिल्या जातात. शरिराची तयारी नसेल तर लैंगिक संयोग घडवून आणता येणार नाही हे उघडच आहे. पण एका आपोआप होणाऱ्या घटनेऐवजी त्यात बरीच कृत्रिम मूलतत्त्वे मिसळलेली असतात. येथे दोन मुद्दे लक्षात घेतले पाहिजेत: मानवात अगदी केवळ शारिरिक यंत्रणा अस्तित्वात नाही, म्हणजे शरीरशास्त्राच्या नियंत्रणाखालीच मानव उत्तेजित होतो असे म्हणता येणार नाही, तर त्याऐवजी मन व शरीर ह्या दोन्हींवर स्थल, काल व परिस्थिती ह्याचा संयुक्त परिणाम होतो व त्याचे मूळ सांस्कृतिक परंपरेत असते. त्याच वेळी त्याच्याच बरोबर निरनिराळे सामाजिक निर्बंधही कार्यक्षम असतात व ते लैंगिक प्रवृत्तीचे नियंत्रण करतात.

प्राण्यांतील मादी माजावर येते व मानवात ही गोष्ट घडून येत नाही ह्याचे शारीरशास्त्रदृष्ट्या मूल्य काय आहे ह्याचा आपण आता विचार करू. सर्व प्राण्यांमध्ये मादीकडून विशिष्ट नराची निवड केली जाते, आणि त्यांच्यात दोन्ही लिंगाच्या प्राण्यांना तुलना आणि निवड ह्यांची संधी मिळते. मादी व नर ह्यांना आपली आकर्षकता प्रदर्शित करण्याची संधी जरूर असते, व आपल्या आवडीचा भिन्न लिंगी प्राणी निवडण्याची त्यांना संधी मिळते. रंग, आवाज, शारीरिक बल, युद्धातील चापल्य व कौशल्य,— ह्यांतील प्रत्येक शारिरिक जोर व सेंद्रिय निर्दोषता ह्यांचे प्रतीक असते— ह्यावरून अखेरची निवड ठरते. निवड करून केलेला लैंगिक संयोग हा विकासाच्या प्रक्रियेतील नैसर्गिक निवडीचा एक अविभाज्य घटक असतो. कारण लैंगिक निवड नसेल तर ती प्राणीजात हळूहळू ऱ्हास पावेल. जसजसे आपण संघटित जीवनाच्या वरच्या वरच्या पातळ्यांवर जातो तसतशी नैसर्गिक निवडीची आवश्यकता वाढत जाते. अगदी खालच्या जातीच्या प्राण्यात लैंगिक संयोगाचीही जरुरी नसते. ह्यावरून असे स्पष्ट होईल की, सर्वात श्रेष्ठ प्राणी जो मानव त्याच्या बाबतीत नैसर्गिक निवडीची आवश्यकता नाहीशी झाली असणे शक्य नाही. उलट नैसर्गिक निवडीची नितांत जरूर आहे हेच विधान जास्त खरे ठरण्याचा संभव जास्त आहे.

प्राण्याच्या मादीचा माज फक्त निवडीची संधी प्राप्त करून देतो, एवढेच नव्हे तर त्यामुळे लैंगिक आकर्षण मर्यादित होऊन विशिष्ट समूहातच सक्रिय होते. मादीला माज येण्याच्या ऋतुशिवाय इतर वेळी लैंगिक प्रवृत्ती सुप्तावस्थेत असते आणि एकमेकांशी स्पर्धा, तसेच लैंगिक गोष्टींबद्दलची अमर्याद उत्सुकता ही सर्वत्र प्राण्यांच्या नेहेमीच्या जीवनामध्ये लुप्त होतात. बाहेरील शत्रूकडून संभाव्य धोका, व अंतर्गत कलह, जे प्रियाराधनेमुळे घडू शकतात, त्या सर्वांचाच मादीच्या माजाचा थोडा काळ सोडला तर बाकीचा वेळ त्या विशिष्ट प्राणीजातीच्या टिकून राहण्याकडे लावला जातो.

अर्थातच ती प्राणिजात टिकून राहण्याकरता ह्या गोष्टीला फार महत्त्व आहे.

ह्या सर्वांचा विचार केल्यानंतर मानवाच्या स्त्रीला माजाचा विशिष्ट ऋतू नसल्याचा काय परिणाम होतो? मानवातील लैंगिक प्रवृत्ती एका विशिष्ट ऋतूला बांधलेली नाही, ती कोणत्याही शारिरिक घटनेवर अवलंबून नाही आणि केवळ शरीरक्रियाशास्त्राप्रमाणे मानवातील पुरुष व स्त्री ह्या दोघांच्याही जीवनात कोणत्याही क्षणाला एकदम फरक घडून येईल अशी परिस्थिती आहे. लैंगिक वासना सर्व काळी कोणत्याही इतर गोष्टींमधील मानवाचे कुतूहल नाहीसे करू शकतात. शिवाय तीमुळे इतर सामाजिक बंधने शिथिल होऊ शकतात. ही लैंगिक वासना इतर सर्व प्रवृत्तींपेक्षा अधिक प्रबल असते आणि मानवाच्या दुसऱ्या उद्योगात व्यत्यय आणू शकते, इतरांशी सहकार्य करण्याची अंतःकरणात नुकतीच फुलू लागलेली प्रवृत्ती नाश करू शकते—थोडक्यात म्हणजे समाजात बेदिली माजणे व बाहेरून धोका उत्पन्न होणे तीमुळे शक्य होते. आपल्याला ठाऊक आहे की, हा केवळ कल्पनेचा खेळ नाही. ॲडॅम व ईव्ह ह्यांच्यापासून तो आजपर्यंत लैंगिक प्रवृत्तीमुळे बहुतेक सर्व अडचणी निर्माण झालेल्या आहेत. बहुतेक सर्व शोकपर्यवसायी घटनांचे ती मूळ आहे. मग त्या घटना प्रत्यक्ष जीवनातील असोत, ऐतिहासिक असोत, पुराण कथांतील असोत वा वाङ्मयातील असोत. तरी पण लव्याची वस्तुस्थितीच असे दर्शविते की, लैंगिक प्रवृत्तीला आळा घालणाऱ्या काही शक्ती अस्तित्वात आहेतच; कारण मानव आपल्या अतृप्त भावनांच्या पूर्णपणे आहारी जात नाही. तो काही निर्बंध व निषेध उत्पन्न करतो व मानतो आणि ते दैवी शक्ती-इतकेच प्रबल बनतात. नैसर्गिक अवस्थेत लैंगिक वासना ज्या आडकाठ्यांनी व नियंत्रणांनी कह्यात ठेवली त्यापेक्षा सुसंस्कृत समाजात ती निराळ्या मार्गांनी नियंत्रित केली जाते हे लक्षात ठेवले पाहिजे. प्राण्यांना जन्मजात प्रवृत्तीची देणगी असल्यामुळे व त्यांच्या शारीरिक बदलांमुळे ते ज्या परिस्थितीत आणले जातात त्यातून नर आणि मादी ह्यांना उपजत बुद्धीच्या सरळसरळ साहाय्यानेच बाहेर पडता येते. मानवाच्या बाबतीत नियंत्रण संस्कृती व परंपरा ह्यांच्यामुळे होते हे आपल्याला माहीत आहे. प्रत्येक समाजात असे नियम असतात की, पुरुष आणि स्त्री लैंगिक प्रवृत्तीला संपूर्ण वाव देऊ शकत नाहीत. हे निर्बंध कसे उत्पन्न होतात व त्यांची क्रिया कशी होते हे आपण लवकरच पुढे पाहू. सध्या एवढेच लक्षात ठेवले तरी पुरे की, सामाजिक निर्बंध उपजत बुद्धीतून उत्पन्न होत नाहीत, एवढेच नव्हे तर ह्या निर्बंधाला कोणत्या तरी जन्मजात प्रवृत्तीला विरोधच करावा लागतो. ह्यात आपल्याला मानवाची संपादित देणगी व प्राण्यांची जन्मजात प्रवृत्ती ह्यांतील भेद स्पष्ट दिसतो. जरी मानव कोणत्याही क्षणी लैंगिक वासनेला बळी पडणे तत्त्वतः शक्य आहे तरी त्याला कृत्रिम नियंत्रणाच्या आधीन होणे भाग पडते. तसेच जरी कोणताही विशिष्ट शारिरिक बदल क्रियाशील लैंगिक प्रवृत्ती स्त्री व पुरुष ह्यांच्यात मोकळी सोडतो अशी परिस्थिती नसते तरी प्रियाराधन व संयोग हयाकरता इतर अनेक गोष्टींनी लैंगिक प्रवृत्तीला स्वातंत्र्य मिळते.

आता आपल्याला " जन्मजात प्रवृत्तींचा लवचिकपणा " म्हणजे काय ह्याची अर्धीक बिनचूक अशी व्याख्या करता येईल. लैंगिक वासनेसंबंधीच्या वागण्याच्या पद्धती ह्या मानवाच्या बाबतीत फक्त अंतिम हेतूशी संलग्न असतात. मानवाला आपल्या सहचराची किंवा सहचारिणीची निवड करावी लागते; मन मानेल त्या व्यक्तीशी लैंगिक संयोग करता येत नाही. ह्याच्या उलट लैंगिक वासनेला स्वातंत्र्य देणे, प्रियाराधनेला उत्तेजन, आणि विशिष्ट प्रकारची निवड करण्याची प्रवृत्ती ह्या सर्वांना संस्कृतीचा पाठिंबा असतो. हा पाठिंबा प्राण्याच्या नैसर्गिक गुणांना अनुसरूनच मिळू शकतो. निवड करण्याचे तत्त्व त्यात असावेच लागते. विशिष्ट वर्ग वगळले जाऊ नयेत ह्याची काळजी घ्यावी लागते, आणि सर्वांत महत्त्वाचे म्हणजे लैंगिक वासना रोजच्या व्यवहारात एकसारखा हस्तक्षेप करणार नाही हेही पाहावे लागते.

मानवातील जन्मजात प्रवृत्तींचा लवचिकपणा शरीरक्रियाशास्त्रातील बदलांच्या गैरहजेरीमुळे कळतो व जीवशास्त्रान्वये प्रियाराधनेच्या प्रवृत्तीला प्रोत्साहन मिळते हे मुद्दे महत्त्वाचे आहेत. सांस्कृतिक घटनांमुळे लैंगिक वागणुकीवर परिणामकारक दाब पडतो हे स्पष्ट होते. मानवाला लैंगिक प्रवृत्ती आहेत पण त्यांवर निरनिराळ्या प्रकारच्या समाजात निरनिराळी बंधने येतात. प्रस्तुत विवेचनात जास्त बिनचूकपणे ह्या बंधनांचा विचार होईल व प्राण्यांच्या मूलभूत वागणुकीपासून मानवाची वागणूक कशी व किती बदलते हे आपल्याला कळून येईल.



२७४

## प्रकरण ४ थे

# वैवाहिक संबंध

सर्व जगातील प्रेमाची जीवनातील अद्भुत भूमिका लक्षात घेऊन त्याच्या पुढील अवस्थेबद्दल विचार करू. तसेच आपण वैवाहिक संबंधाचाही विचार करू. कारण हे संबंध अश्मयुगातील गुहांत राहणारा प्राचीन मानव आणि मानवसदृश वानर ह्या दोहोमध्येही आढळतात. प्राण्यांमध्ये, विशेषतः वानरांच्यात विवाहसंबंध म्हणजे कसे असतात? प्रियाराधनेच्या शेवटची स्थिती म्हणजे लैंगिक संयोग, आणि त्यानंतर मादीला गर्भधारणा होते. गर्भधारणा झाली की मादीचा माज नाहीसा होतो, व अर्थातच इतर नरांना त्या मादीविषयी वाटणारे आकर्षण नाहीसे होते. पण ज्या नराशी तिचा लैंगिक संयोग झालेला असतो व ज्याच्या ती स्वाधीन झालेली असते त्याची गोष्ट वेगळी असते. आम्ही जमवलेल्या माहितीवरून नर वानर नैसर्गिक परिस्थितीत मादीला गर्भधारणा झाल्यानंतरही तिच्याशी लैंगिक संयोग करतो की काय हे नक्की सांगता येत नाही. पण इतर नरांना त्या मादीबद्दल आकर्षण वाटत नाही. पण तिच्याशी ज्याने संयोग केला तो नर तिच्याजवळ राहतो हाच वानरांमधील व इतर प्राण्यांमधील विवाहाचा मुख्य बंध असतो. नर व मादी ह्या दोघांची ह्या नव्या परिस्थितीत होणारी प्रतिक्रिया, त्यांचे एकमेकांबद्दलचे आकर्षण, नराची त्या विशिष्ट मादीजवळ राहण्याची प्रवृत्ती, तिचे संरक्षण करणे, तिला मदत करणे, व तिला जरूर तेव्हा अन्न पुरवून तिचे पालन करणे, ही सर्व प्राण्यांच्या वैवाहिक जीवनाची मूलभूत अंगे आहेत. ह्या नव्या परिस्थितीत प्राण्यांची वागणूकही बदलते. ह्या वागणुकीवर उपजत बुद्धीच्या साखळीतील एका नव्या दुव्याचा प्रभाव पडतो. ह्या नव्या दुव्याला लैंगिक वासनेच्या ऐवजी वैवाहिक जीवन प्रवृत्ती असे म्हणता येईल. प्राण्यांचे एकत्र येणे माजावर आलेल्या मादीच्या अनियंत्रित आकर्षणावर किंवा नराच्या लैंगिक मत्सरावर किंवा नराला वाटणाऱ्या सर्वसाधारण मालकी हक्कावर अवलंबून नसते. ते एका विशिष्ट जन्मजात प्रवृत्तीवरच अवलंबून असते.

जेव्हा आपण मानवी समाजाचा विचार करतो तेव्हा वैवाहिक संबंध अगदी वेगळ्या प्रकारचे असल्याचे दिसून येते. नुसता लैंगिक संयोग झाला तर त्यामुळे वैवाहिक संबंध प्रस्थापित होत नाही. वैवाहिक संबंधाकरता एका विशिष्ट समारंभपूर्वक दिलेल्या परवानगीची जरूर असते आणि मागच्या प्रकरणात ज्या निर्बंधाबद्दल व आमिषांबद्दल आपण विचार केला त्याहूनही सामाजिक कृती अगदी वेगळी असते.

विवाह हा संस्कृतीच्या सर्जनशील कृतींपैकी एक असतो व ह्या कृतीमुळे दोन व्यक्तींच्या परस्पर संबंधावर एक नवा छाप बसतो. ह्या नव्या संबंधामध्ये जी शक्ती असते ती समाजाच्या नियंत्रणामुळे आलेली असते, जन्मजात प्रवृत्तीमुळे नव्हे. हा नवा संबंध म्हणजे शारिरिक संबंधाच्या पलीकडचा व वरचा असतो. जोपर्यंत हा सामाजिक संबंध प्रस्थापित झालेला नाही तोपर्यंत स्त्री व पुरुष ह्यांनी कितीदा जरी लैंगिक संयोग केला तरी त्यांचा परस्पर संबंध समाजाने परवानगी दिलेल्या संबंधाहून वेगळाच राहातो. ज्या अर्थी मानवात जन्मजात वैवाहिक प्रवृत्ती नसते त्या अर्थी त्यांचा संबंध शारिरिकदृष्ट्या सुरक्षित नसतो. शिवाय समाजाची त्याला परवानगी नसल्यामुळे त्याला सांस्कृतिक महत्त्वही लाभत नाही. वस्तुस्थिती अशी आहे की, प्रत्येक समाजात जी स्त्री व जो पुरुष समाजाच्या परवानगीशिवाय म्हणजे विवाहसमारंभाशिवाय एकमेकांजवळ राहून जणू काय आपण विवाहित आहो असे दाखवतात त्यांना अनेक संकटांना तोंड द्यावे लागते व शिक्षा भोगाव्या लागतात.

प्राण्यांच्या जन्मजात प्रवृत्तींच्यापेक्षा वेगळी एक परिस्थिती मानवाच्या बाबतीत अस्तित्वात येते—एक नवी शक्ती, एक नवे मूलभूत तत्त्व—म्हणजे समाजाचा वैयक्तिक जीवनात हस्तक्षेप. आणि एकदा समाजाची परवानगी मिळाली आणि दोन व्यक्तींचा विवाह झाला म्हणजे ह्या संबंधामुळे त्यांच्यावर शारिरिक, आर्थिक, धार्मिक, आणि गृहविषयक ज्या जबाबदाऱ्या येऊन पडतात त्या त्यांना पार पाडाव्याच लागतात. आपण पाहिलेच आहे की मानवाचा विवाहबंधनात प्रवेश ही काही जन्मजात प्रवृत्तीं-मुळे घडलेली घटना नाही तर अनेक गुंतागुंतीच्या सामाजिक आमिषांचा परिणाम आहे. पण एकदा समाजाने विवाहावर आपले शिक्कामोर्तब केले म्हणजे अनेक कर्तव्ये बंधने व प्रतिक्रिया त्या दांपत्यावर येऊन पडतात आणि त्यांना कायदा, धर्म, आणि नीतिनियम ह्यांचा पाठिंबा असतो. मानवी समाजात विवाहविच्छेदन शक्य असते व कोणत्याही व्यक्तीला दुसरा भागीदार निवडता येतो, पण ही गोष्ट बरीच अवघड असते आणि काही संस्कृतीत घटस्फोटाची किंमत इतकी जबर असते की तो जवळजवळ अशक्यच होतो.

इथे आपल्याला जन्मजात प्रवृत्तीमुळे झालेले नियमन आणि समाजाने ठरव-लेले नियम ह्यांतील फरक स्पष्ट दिसतो. प्राण्यांच्या बाबतीत विवाह हा प्रियाराधनेने केलेल्या निवडीवर आणि त्यानंतर झालेल्या गर्भधारणेवर अवलंबून असतो व जन्म-जात वैवाहिक प्रवृत्तीमुळे चालू राहतो; तर मानवात तो संस्कृतीच्या मूलभूत तत्त्वामुळे व समाजाने केलेल्या शिक्कामोर्तबामुळे, तसेच अनेक सामाजिक नियंत्रणांमुळे घडून येतो व टिकतो; पण तरीही एक गोष्ट स्पष्ट दिसते की, सांस्कृतिक शक्ती नैसर्गिक निवडीच्या बाजूनेच कार्य करीत असतात व जरी यंत्रणा अगदी वेगळी असली तरी साध्य एकच असते. उच्च पातळीवरच्या प्राण्यांच्या बाबतीत गर्भावस्था बरीच दीर्घ-कालपर्यंत असते आणि मादी व पिल्लू जितके अधीक असहाय असेल तितकी त्या

दोघांनाही नराच्या संरक्षणाची व मदतीची जरुरी असते व म्हणून विवाहाची आवश्यकता वाढते. आपण निवड केलेल्या मादीवरील प्रेमाचा बंध नरातील जन्मजात प्रवृत्तीतून उद्भवलेला असतो आणि त्यामुळे त्या विशिष्ट प्राणीजातीची गरज भागते व ती प्राणीजात टिकून राहते.

मानवामध्येही गर्भवती स्त्रीच्या प्रेमळ व हितसंबंधी संरक्षणाची जरूर राहतेच. नरातील जन्मजात प्रवृत्ती नाहीशी झालेली असते हे आपण पाहिलेच आहे. उच्च आणि नीच अशा दोन्ही प्रकारच्या संस्कृती असणाऱ्या समाजात पुरुष आपल्या मुलांची जबाबदारी अंगावर घेण्यास उत्सुक नसतो पण समाजाने त्याच्यावर ती लादल्यामुळे त्याला ती घ्यावीच लागते. कारण वैवाहिक करार सामाजिक असतो, पण प्राणीजातींमध्ये जन्मजात प्रवृत्तींकडून जे कार्य होते ते निरनिराळ्या समाजातील सांस्कृतिक व्यवस्था व नियम ह्यांच्याकडून होते. म्हणजे विवाह ही संस्था प्राण्यांमधील जन्मजात प्रवृत्तींतून विकसित झालेली नसून मूलभूत सांस्कृतिक, नैतिक, कायदेविषयक व धार्मिक शक्तींचा परिणाम असते. ह्या संस्थेमुळे पुरुष व स्त्री ह्यांची वागणूक नियंत्रित केली जाते व मानव जातीचा त्यामुळे प्राणीजातीच्या जन्मजात प्रवृत्तीप्रमाणेच फायदा होतो.

आपण पुढे पाहूच की, ज्या शक्तीमुळे संस्कृती पती व पत्नी ह्यांना एकत्र बांधते ती शक्ती म्हणजे त्यांच्या भावना घडवून आणि संघटित करून त्यांचा एकमेकांविषयीची भूमिका बनवण्याची. ही सर्व घटना अधीक तपशिलात जाऊन पुढे आपण तिचा विचार करू; आणि त्यातच प्राणी आणि मानव ह्यांच्या संबंधांतील फरक स्पष्ट होईल. प्राण्यांमध्ये साखळीसारख्या जोडलेल्या दुव्यांची जन्मजात प्रवृत्तींची एक मालिकाच असते व ती आपोआप एकामागून एक कार्यक्षम होत जाते. त्याच्या उलट मानवाची वागणूक पूर्णपणे संघटित अशा भूमिकेवरून म्हणजे भावनेवरून ठरवली जाते. ह्या भावनेला मानसशास्त्रात "सेंटिमेंट" असे म्हणतात. एका बाजूला प्राण्यांत शरीरशास्त्रविषयक क्षण असतात, शरीराच्या यंत्रणेत घटना घडत असतात आणि त्यातल्या प्रत्येकीकडून जन्मजात प्रतिक्रिया घडत असते; तर त्याच्या उलट मानवात भावनांची एकसारखी विकास पावणारी पद्धती असते. भावी प्रेमिकांच्या पहिल्या भेटीपासून, हळूहळू एकमेकांविषयी वाटणाऱ्या प्रेमामुळे व दोघांच्या आवडीनिवडी आणि इतर सहकारी वस्तूंबद्दलचे कुतूहल ह्यांतून आपल्याला त्या दोघांमधील आकर्षणाचा विचार करता येतो व त्यातूनच एक सुखी आणि एकमेकांशी जुळणारे नाते उत्पन्न होते. ह्या गुंतागुंतीच्या भूमिकेत जन्मजात प्रवृत्ती तर येतातच पण अनेक सामाजिक मूलतत्त्वे, उदाहरणार्थ नीतिनियम, आर्थिक अपेक्षा व आत्मिक कळकळ ह्याही गोष्टी त्यात समाविष्ट असतात.

वैवाहिक प्रेमाच्या पुढच्या अवस्था प्रियाराधनेच्या शक्तिमान प्रेरणेवर अवलंबून असतात. उलटपक्षी एकमेकांबद्दल वाटणारे कुतूहल व प्रियाराधना ह्यात पुढील वैवाहिक

जीवनात मिळणाऱ्या सुखाचा व फायद्यांचा विचार हाही महत्त्वाचा ठरतो. भविष्यकाली मिळणाऱ्या सुखाची अपेक्षा ह्या वर्तमानकालातील परिस्थितीलाही लागू केल्या जातात; आठवणी व अनुभव ह्यांचाही विचार होतो. म्हणजे मानवातील परस्परसंबंध ही एकजिनसी व अविरत घडणारी अशी घटना असते व त्यात भूत, वर्तमान व भविष्य ह्या तिहींचा मिलाफ होतो. ह्याच्या उलट प्राण्यातील जन्मजात प्रवृत्तीमुळे निरानिराळ्या व वेगवेगळ्या अवस्था मानवात दिसत नाहीत.

ह्या सर्वांमध्ये आपल्याला जन्मजात प्रवृत्तींचा लवचिकपणा आढळून येतो, आणि तो आपण पूर्वीही पाहिलाच आहे. आणि संस्कृतीमुळे अस्तित्वात येणारी यंत्रणा जरी शरीरक्रियाशास्त्राहून बरीच निराळी असते तरी तीमुळे मानवी समाजातील वैवाहिक जीवन ज्या पद्धतीने घडविले जाते ती पद्धती प्राण्यांमधील नैसर्गिक निवडी-सारखीच असते.



# प्रकरण ५ वे

# आईबापांचे मुलांवरील प्रेम

प्रियाराधन, लैंगिक संयोग व गर्भधारणा यामुळे प्राणी आणि मानव ह्यांच्यात एकच गोष्ट साध्य होते, म्हणजे प्रजेचा जन्म. ह्या घटनेला मानवपूर्व प्राणीजातींत व सांस्कृतिक समाजातील स्त्री-पुरुषात एकाच प्रकारची प्रतिक्रिया व्यक्त होते. एवढेच काय, मुलाचा किंवा पिल्लाचा जन्म ह्या एका गोष्टीत इतर प्राणी व मानव ह्यांत काहीच फरक नाही असे म्हणता येईल. मातृत्व हे एक नाते असे आहे की, ते शारिरिक दृष्ट्या वानरांकडून मानवांकडे आलेले आहे. आणि हे नाते जीवशास्त्रीय आहे, सांस्कृतिक नाही. पण हे विधान बरोबर नाही. मानवी मातृत्व हे पुष्कळ अंशी सांस्कृतिक घटनांनी ठरले जाते. मानवी पितृत्वाची गोष्ट मात्र जरा निराळी आहे. प्राथमिक अवस्थेतील समाजात पित्याचा मुलाशी जीवशास्त्रदृष्ट्या काही संबंध असतो ही गोष्ट माहीत नसते; पण पितृत्वाची भावना नैसर्गिक देणगी व शारिरिक गरजेवर अवलंबून असते. म्हणजे इथेसुद्धा प्राण्यांचे कुटुंब व मानवी कुटुंब ह्यांची सूक्ष्म रीतीने तुलना करून त्यांच्यातील साम्य व फरक ह्यांचा विचार करावा लागतो.

प्राण्यांमध्ये पिल्लाच्या जन्मामुळे नर आणि मादी ह्यांच्यातील नाती बदलतात. कुटुंबात एक नवा जीव आलेला असतो. आई ताबडतोब त्याला आपले संरक्षण देते. ती पिल्लाला चाटते, त्याच्यावर एकसारखे लक्ष ठेवते, आपल्या शरीराच्या उबेने त्याला ऊब देते, आणि आपल्या स्तनातील दूध त्याला पाजते. माता मुलाची जी ही काळजी घेते तिच्याशी काही शारिरिक व्यवस्था अवलंबून असते. उदाहरणार्थ, कांगारू वगैरे जातीच्या प्राण्यांना पिल्लू सुरक्षित ठेवण्यास पोटाजवळ एक पिशवी असते, तर सस्तन प्राण्यात दुधाच्या ग्रंथी असतात. मूल जन्मल्याबरोबर त्याच्याबद्दलची मातेची प्रतिक्रिया सुरू होते व त्याच्या उलट पिल्लाचीही मातेबद्दलची प्रतिक्रिया स्पष्ट होते. थोडक्यात म्हणजे ज्याबद्दल अजिबात कोणती शंका उरत नाही अशी ही एक जन्मजात प्रवृत्तीची प्रक्रिया असते.

मानवी मातेलाही शारीरिक दृष्ट्या प्राण्यांतील मातेप्रमाणेच सर्व इंद्रिये असतात. गर्भधारणा, गर्भारपण व मुलाला स्तनपान ह्यामुळे मानवी मातेच्या शरीरात जे बदल घडून येतात ते इतर सस्तन प्राण्यांप्रमाणेच असतात. जेव्हा मूल जन्माला येते तेव्हा इतर प्राणी व मानव ह्यांच्या शरीरात होणारे बदल इतर प्राण्यांच्या माद्यांच्या मातृत्वाच्या स्थितीप्रमाणेच असतात व मानवी मातेला मातृपद मिळते. तिचे

दुधाने भरून फुगलेले स्तन मुलाला दुग्धपानाला उद्युक्त करतात. कारण दुग्धपानाची त्याची प्रवृत्ती तहान व भूक ह्या मूलभूत गरजांइतकीच तीव्र असते. मुलाला सुरक्षित उबदार व सुखकारक अशा जागेची गरज भासते, आणि आईही त्याला मोठ्या प्रेमाने व भावनापूर्ण रीतीने आपल्या पोटाशी धरते. मुलाबद्दलची माया व ममता ह्यांच्याशी व मुलाच्या हिताच्या दृष्टीने आई ह्या सर्व गोष्टी करीत असते.

पण मानवी समाज सांस्कृतिक दृष्ट्या कितीही उच्च किंवा नीच पातळीवर असला तरी मानवी मातेची वागणूक निव्वळ जीवशास्त्रीय किंवा निव्वळ जन्मजात प्रवृत्तींवर अवलंबून नसते. प्रेमी जोडपी किंवा पतिपत्नी ह्यांच्या परस्पर संबंधात ज्याप्रमाणे सांस्कृतिक गोष्टींचा प्रभाव निश्चितपणे पडतो, तोच प्रकार माता आणि बालक ह्यांच्या संबंधातही दिसून येतो. गर्भधारणा झाल्यापासून ह्या सर्व घटनेत समाज सहभागी होऊ लागतो. गर्भवतीला काही विशिष्ट निर्बंध पाळावे लागतात, काही विशिष्ट नियमांप्रमाणे वागावे लागते आणि काही विधियुक्त आचारांचे पालन करावे लागते. उच्च पातळीवरच्या समाजात बहुधा हे नियम व निर्बंध प्रकृती व आरोग्य ह्यासंबंधीचे असतात किंवा नैतिक आचरणासंबंधी असतात. खालच्या दर्जाच्या म्हणजे अप्रगत समाजात हे जादू किंवा धर्म ह्यासंबंधी असतात. पण कसेही असले तरी हे सर्व निर्बंध व नियम पुढे जन्माला येणाऱ्या बालकाच्या हिताच्या दृष्टीनेच केलेले असतात. त्याच्याकरता मातेला समारंभात विधिपूर्वक भाग घ्यावा लागतो, उपासमार सोसावी लागते व काही बाबतीत अडचणी व त्रास सहन कराव्या लागतात. म्हणजे भविष्यकाळी तिच्या जन्मजात प्रवृत्तीने बालकाबद्दल जी प्रतिक्रिया होणार तिच्या अपेक्षेने भावी मातेवर बंधने घातली जातात. तिची कर्तव्ये तिच्या भावनांपेक्षा अधीक तीव्रतेने जाणवतात आणि तिची भावी मनोरचना घडवतात.

मूल जन्मल्यानंतर पारंपरिक संबंध कमी तीव्र किंवा कार्यक्षम होत नाहीत. शुद्धीकरणाचे समारंभ इतर समाजापासून माता व बालक ह्यांना दूर ठेवण्याबद्दलचे नियम, नाव ठेवण्याचे किंवा दीक्षा देण्याचे विधी, तसेच नवीन जन्मलेल्या बालकाला जमातीत स्वीकारण्याचे विधी, ह्या सर्वांमुळे दोघांमध्ये एक विशेष प्रकारचा संबंध उत्पन्न होतो. अशा प्रकारच्या चालीरीती मातृसत्ताक व पितृसत्ताक अशा दोन्ही प्रकारच्या समाजात आढळून येतात. त्यातल्या त्यात मातृसत्ताक समाजात समारंभ व विधी अधीक तपशीलवार व गुंतागुंतीचे असतात; आणि मातेचा बालकाशी अधीकच निकट संबंध येतो. हा संबंध केवळ लहानपणीच असतो असे नव्हे तर पुढेही कायम राहतो.

म्हणजे अतिशयोक्ती न करता असे म्हणता येईल की, संस्कृती आपल्या आज्ञा व नियम ह्यांच्या मदतीने जन्मजात प्रवृत्तीचे अनुकरणच करीत असते. अधीक स्पष्टपणे म्हणायचे तर ती जन्मजात प्रवृत्तीच्या नियमांची अपेक्षाच करीत असते. त्याच अनुषंगाने असे म्हणता येईल की, सर्व सांस्कृतिक प्रेरणा-मातेची जी जन्मजात प्रवृत्ती,—

की बालकाचे संरक्षण करावे, त्याला स्तनपान द्यावे व त्याची काळजी घ्यावी,— तिचा विस्तार करते, तिला मान्यता देते व तिला वैशिष्टय प्राप्त करून देते.

प्राण्यांच्या व मानवांच्या समाजात पिता आणि बालक ह्यांच्यामधील संबंधांचा जर आपण विचार करू लागलो तर आपल्याला असे दिसून येईल की मानवी समाजात सांस्कृतिक मूलतत्त्वे शोधून काढणे सोपे असते, पण प्राण्यांच्या बाबतीत जन्मजात प्रवृत्ती कोणत्या असू शकतील ते शोधून काढणे कठीण. खरे म्हणजे उच्च संस्कृतीत विवाहाचे बंधन अशाकरता घातलेले असते की, बापाला आपल्या मुलांची काळजी घेण्यास भाग पडावे. विवाहबाह्य संबंधापासून झालेल्या मुलाला वैवाहिक संबंधापासून झालेल्या मुलाइतकी काळजी त्याच्या खऱ्या बापाकडून मिळण्याची शक्यता नसते. कारण कायदेशीर बापावर मुलाची काळजी घेण्याचे सामाजिक बंधन असते. ह्याचा अर्थ असा आहे का, की मानवात पितृत्वाची उपजत प्रवृत्तीच नसते? आपल्याला असे दाखवून देता येईल की उलट मानवी पित्याच्या अंगी निश्चित प्रेरणा असतात— अर्थात त्या पितृत्व सिद्ध करता येईल इतक्या शक्तिमान नसतात, पण ज्यांच्यावर सामाजिक नियम व निर्बंध आधारलेले असतात त्यांना त्या प्रेरणांचा कच्चा माल म्हणून उपयोग होतो.

प्रथम आपण उच्च वर्गीय सस्तन प्राण्यांतील पितृत्वाचा विचार करू. त्यांच्या बाबतीत नराची अत्यंत आवश्यकता असते; कारण गर्भधारणेचा दीर्घ काळ, स्तनपानाला लागणारा वेळ, पिल्लू मोठे होऊन स्वतंत्र होईपर्यंत जरूर असलेले त्याचे शिक्षण इत्यादींमुळे मादी आणि पिल्लू ह्यांना शक्तिमान अशा संरक्षणाची जरूर असते. ह्याचबरोबर गर्भवती मादीबद्दल नराच्या मनात प्रेमाची व आपुलकीची भावना असते. मादीला पिल्लू झाल्यावर ती कमी न होता बळावते, आणि नर सर्व कुटुंबाचे रक्षण करू लागतो. नर व मादी ह्यांच्यातील आकर्षण हे जीवशास्त्रदृष्ट्या पितृत्वाच्या आकर्षणाच्या आधीची पायरी आहे असे समजले पाहिजे.

आता मानवी समाजाचा आपण विचार करू लागलो की वरील प्रकारची गरज कमी होण्याऐवजी उलटी जास्तच निकडीची होते. गर्भवती व बालकाला स्तनपान देणारी स्त्री वानर मादीच्या तुलनेत जास्तच असाहाय्य असते; आणि ही असहायता संस्कृतीबरोबर वाढतच जाते. शिवाय मुलांची प्राण्यांच्या पिल्लांपेक्षा किती तरी जास्त काळजी घ्यावी लागते. दुग्धपान आणि इतर प्रकारच्या काळज्या त्यांच्याकरता घ्याव्याच लागतात पण कित्येक प्रवृत्तींना उपजत शिक्षण द्यावे लागते, तसेच भाषा, परंपरा व हस्तव्यवसाय ह्यांचे शिक्षण अगदी आदिवासी समाजातसुद्धा आवश्यक असते.

म्हणजे आपल्याला अशी कल्पना करता येईल का, की समाज जसा नैसर्गिक अवस्थेतून सुसंस्कृत अवस्थेत प्रगत होत गेला तसतशी पुरुषाची प्रवृत्ती— जी खरोखर अधीक आवश्यक होत गेली होती, ती हळूहळू नाहीशी झाली? अशा तऱ्हेची

परिस्थिती जीवशास्त्राच्या नियमांविरुद्ध गेली असती. मानवी समाजाबद्दलच्या आपल्या निरीक्षणाने ही कल्पना समुळ चुकीची आहे असे वस्तुस्थितीवरून दिसून येते. एकदा पुरुष आपल्या पत्नीबरोबर राहून तिचे रक्षण करून तिची गर्भावस्था सुरक्षित ठेवू लागला व मुलाच्या जन्माच्या वेळी व जन्मल्यानंतर आपली निरनिराळी कर्तव्ये पार पाडू लागला की मुलाबद्दल त्याच्या मनात माया उत्पन्न होऊन त्याच्याशी प्रेमाचे नाते जडेल ह्यात शंका नाही.

अशा रीतीने आपल्याला सांस्कृतिक व नैसर्गिक गुण ह्यांच्यात एक चित्तवेधक फरक आढळतो. संस्कृती म्हणजे कायदा, नैतिक नियम व चालीरीती ह्यांच्यामुळे पुरुषाला प्राप्त परिस्थितीशी जुळवून घ्यावे लागते, म्हणजे गर्भवती स्त्रीचे संरक्षण करावे लागते. त्याचप्रमाणे तिला आपल्या भावी प्रजेबद्दल कळकळ वाटते त्यात त्याला निरनिराळ्या कारणांमुळे सहभागी व्हावे लागते. पण एकदा तो ह्या स्थितीपर्यंत पोचला की मग त्याची प्रतिक्रिया अनुकूल अशीच होते आणि त्यालाही मुलाबद्दल तीव्र कळकळ वाटून तो त्याची काळजी घेऊ लागतो.

आणि ह्या सगळ्यामुळे आपण एका महत्त्वाच्या टप्प्याशी येऊन पोचतो. मानवी समाज लैंगिक नीतिमत्ता, प्रजोत्पत्तीबद्दलची माहिती किंवा प्रियाराधनेचे मार्ग ह्यांत कितीही वेगवेगळे असोत, त्यांच्यात प्रजेच्या कायदेशीरपणाबद्दल एकवाक्यता असल्याचे आढळते. ह्याने मी असे दर्शवितो की, गर्भधारणा होण्याच्या आधी प्रत्येक मुलीने विवाहविधी केलाच पाहिजे असा निर्बंध असतो. अविवाहित स्त्री गर्भवती होणे किंवा तिला मूल होणे ही सर्व समाजात शरमेची गोष्ट समजली जाते.[1] ह्या निबंधात वर्णन केलेल्या मेलानेशियन समाजातही हीच परिस्थिती आहे. तसेच ज्या ज्या मानवी समाजांची आपल्याला माहिती आहे तेथेही असाच प्रकार असल्याचे दिसून येते. मला मानववंशशास्त्रीय वाङ्मयात असा एकही समाज दिसून आला नाही, की ज्यात बेकायदेशीर ( म्हणजे अविवाहित स्त्रीच्या ) संततीला समाजात कायदेशीर ( म्हणजे विवाहांतर्गत ) संततीच्या सारखीच वागणूक मिळते किंवा सारखाच दर्जा प्राप्त होतो.

संततीच्या कायदेशीरपणाबद्दलचा हा जो सार्वत्रिक नियम आहे त्याला समाजशास्त्रात फार महत्त्व आहे, पण अद्याप ते पुरते ओळखले गेलेले नाही. ह्याचा अर्थ असा की, एक स्त्री व तिची संतती हा समाजशास्त्रदृष्ट्या परिपूर्ण असा गट नाही असे सर्व मानवसमाजातील नैतिक परंपरा व कायदा ही सांगतात. इथेही संस्कृतीचे नियम निसर्गनियमांना धरूनच आहेत हे उघड आहे. त्यांच्या मते मानवी कुटुंब म्हणजे स्त्री व पुरुष ह्या दोघांचे मिळून झालेले असावयास पाहिजे.

आणि ह्या अपेक्षेत पुरुषाच्या नैसर्गिक प्रवृत्तीत संस्कृतीला योग्य प्रतिसाद मिळतो. संस्कृतीच्या सर्व अवस्थांत बापाला आपल्या मुलांबद्दल आस्था वाटत असते आणि काही पितृसत्ताक समाजात त्या आस्थेला जरी तर्काचे अधिष्ठान दिले तरी मातृसत्ताक कुटुंब-

पद्धतीतही पित्याचे आपल्या अपत्यावरील प्रेम अगदी उघड दिसून येते. येथे तर अपत्य हा पित्याच्या मालमत्तेचा मालकही नसतो; एवढेच नव्हे तर पुष्कळदा बापाचा अपत्याशी काही शारिरिक संबंध असतो ही गोष्टही त्या समाजात ओळखली जात नाही.[२] तसेच ज्या समाजात बहुपतित्वाची चाल आहे आणि अर्थातच मुलाचा पिता कोण हे ठरवणे अशक्य असते तेथे देखील जो पुरुष पिता म्हणून काम करतो तोही मुलां-बद्दल प्रेमळ भावनेने वागतो.

पित्याच्या जन्मजात प्रेरणेने तो मुलांशी प्रेमाने का वागतो ह्या प्रश्नाचा विचार करणे बोधप्रद ठरेल. आईच्या बाबतीत तिची अपत्याबद्दलची प्रतिक्रिया शारीरिक संबंधातून उत्पन्न झालेली असते हे निर्विवाद आहे. जे मूल आपण गर्भाशयात वाढवले व जन्माला घातले त्यावर प्रेम करणे व त्याच्याबद्दल कळकळ वाटणे साहजिक आहे. पित्याच्या बाबतीत मात्र त्याच्या ज्या विशिष्ट शुक्रजंतूकडून मातेचे बीजांड फलित होते त्याच्या मार्फत अशा तऱ्हेचा शारीरिक संबंध प्रस्थापित होणे शक्य नाही व त्यामुळे अपत्याबद्दल विशेष प्रकारची माया त्याच्या मनात उत्पन्न होणार नाही. माझ्या मते पित्याच्या मनात अपत्याविषयी प्रेम उत्पन्न होण्याचे कारण म्हणजे गर्भवती स्त्रीबरोबर त्याने घालविलेला काळ हेच होय. हा तर्क जर बरोबर असेल तर पुरुषांमध्ये पितृत्वाची भावना वाढवण्यास संस्कृतीचे महत्त्व फार असणार हे उघड आहे. तसेच पुरुषाच्या मनातील उपजत प्रेरणाही किती अत्यावश्यक आहे हेही लक्षात येईल. केवळ सामाजिक शक्तींनी पुरुषावर इतकी कर्तव्ये लादणे शक्य झाले नसते. तसेच त्याची मनोरचना जर योग्य प्रकारची नसती तर त्याने स्वखुशीने ह्या भावनात्मक जबाबदाऱ्या अंगावर घेतल्या नसत्या.

पिता व अपत्य ह्यांच्या संबंधात जी सांस्कृतिक मूलतत्त्वे असतात ती मातृत्व ठरविणाऱ्या मूलतत्त्वांशी अगदी जवळ व समांतर अशी असतात. गर्भवतीला किंवा मातेला ज्या प्रकारचे निर्बंध पाळावे लागतात तेच किंवा तशाच प्रकारचे निर्बंध भावी पित्यालाही पाळावे लागतात. भावी अपत्यावर काही दुष्परिणाम होऊ नये म्हणून पाळावा लागणारा एक महत्त्वाचा निर्बंध म्हणजे गर्भवती स्त्रीबरोबर लैंगिक संयोग करण्यावर घातलेली बंदी. त्याचप्रमाणे मूल जन्मल्यानंतर बापाला काही विशिष्ट कर्तव्ये नेमून दिलेली असतात. ह्यांतील सर्वांत सुप्रसिद्ध म्हणजे "कूव्हाड" हे आहे. त्यात बाप बाळंतिणीचे सोंग घेऊन निजून राहतो व माता आपले नेहेमीचे उद्योग करीत असते. हे उदाहरण म्हणजे जरी एक आत्यंतिक उदाहरण झाले तरी सर्व समाजात पित्याकडे काही ना काही जबाबदारी येतेच व आपल्या पत्नीला मदत होईल अशी कामे त्याने करावी अशी सर्व प्रकारच्या समाजांची अपेक्षा असते. आपल्या एकंदर विचारसरणीत ह्या गोष्टींचा समावेश करणे कठीण नाही. अगदी "कूव्हाड"ची हास्यास्पद पद्धती घेतली तरी त्यातही एक खोल अर्थ आहे, व ते एक आवश्यक कर्तव्य होऊ शकते. मानवी कुटुंबाला जीवशास्त्रीय मूल्यांच्या दृष्टीने माता व पिता ह्या,

दोहोंची आवश्यकता असते. जर पारंपरिक चालीरीती व नियम असे असले की, त्यांमुळे पिता व अपत्य ह्यांत निकट संबंध प्रस्थापित होत असतील; किंवा ह्या चालीरीतींमुळे बापाचे लक्ष अपत्याकडे ओढले जात असेल, तर मग "कूव्हाड"लाही महत्त्व प्राप्त होते. कारण त्यात बाप आईला बाळंतपणात होणाऱ्या दुःखाचे व आजाराचे सोंग करतो. ह्यानेही त्याच्या पितृत्वाच्या भावनेला पाठिंबा मिळतो. "कूव्हाड" किंवा त्यासारख्या इतर चाली ह्यांमुळे मुलाच्या कायदेशीरपणाला आधार मिळतो व अपत्याची पित्याबद्दलची गरज भागवली जाते.

ह्या सर्वांमध्ये आपल्याला ह्या प्रश्नाच्या दोन बाजू दिसतात. केवळ जन्मजात प्रवृत्तीमुळे मानवाची वागणूक ठरत नाही. न बदलणारी व कडक अशी उपजत बुद्धी मानवाला नवीन परिस्थितीशी जुळवून घेण्यास असमर्थ करील आणि त्यामुळे मानवजातीला तिचा उपयोग होणार नाही. उपजत बुद्धीचा लवचिकपणा ही सांस्कृतिक प्रगतीची अट आहे. पण प्रवृत्तींचे अस्तित्व तर नाकारता येत नाही; आणि त्यांचा विकास कृत्रिम रीतीने करता येणार नाही. जरी मातृत्वाचे नाते संस्कृतीने ठरवले जाते, जरी तिच्यावरील जबाबदारी बाहेरून परंपरेने ठरली जाते, तरी ह्या सर्व घटना जन्मजात प्रवृत्तींशी जुळणाऱ्या आहेत, कारण त्यांच्यामुळे पिता व अपत्य ह्यांच्यातील संबंध अधिक निकट होतो, त्यांना इतरांपासून वेगळे करून एकत्र आणले जाते व ते एकमेकांवर अवलंबून राहू लागतात. येथे हे लक्षात ठेवले पाहिजे की, पुष्कळसे सामाजिक संबंध भावी अपेक्षेवर अवलंबून असतात. ते पित्याचे मन आपल्या भावी प्रतिक्रियेला तयार करतात. तसेच त्याला पुढे कसे वागावे ह्याची सूचना त्यांच्याकडून मिळते व तो पुढे तिचा विकास करतो.

आपण पाहिले आहे की, पितृत्व ही केवळ एक सामाजिक व्यवस्था आहे असे मानता येणार नाही. सामाजिक परिस्थितीमुळे पुरुषाची मनःस्थिती अशी होते की, त्याच्या भावना तीव्र बनतात आणि त्याला अशा कृती कराव्या लागतात की त्यातून त्याची पितृत्वाची प्रवृत्ती स्पष्ट होऊ लागते. म्हणजे मातृत्व हे जसे सामाजिक व जीवशास्त्रीय अशा दोन्ही प्रकारचे असते, तसेच पितृत्वही जीवशास्त्रीय मूलतत्त्वांनी ठरवले जाते; आणि म्हणून मातृत्व आणि पितृत्व ही दोन्ही समसमान आहेत असे म्हणता येते. ह्या सर्वांमध्ये जन्मजात प्रवृत्तींना संस्कृतीचा आधारच मिळतो. इतर गोष्टींच्या साहाय्याने संस्कृती कुटुंबाला एक विशिष्ट स्वरूप देते व ते नैसर्गिकच असते. संस्कृती कधी भडकून बंड करून उठत नाही.

# प्रकरण ६ वे

# मानवामध्ये कौटुंबिक संबंधांची चिकाटी

सस्तन प्राण्यांमध्ये कौटुंबिक जीवन प्रजोत्पत्तीनंतर बराच काल टिकते, आणि प्राणीजात जितकी उच्च पातळीवर असेल तितकी आईबापांना प्रजेची काळजी जास्त दिवस घ्यावी लागते. पिल्लाचा सावकाश होणारा विकास अर्थातच आईबापांना त्याची दीर्घकाल काळजी घेण्यास भाग पाडतो; आणि अर्थातच त्याकरता त्या दोघांना एकत्र राहावे लागते. पण कोणत्याच प्राणीजातीत कुटुंब सर्व जन्मभर कायम राहात नाही. पिल्ले स्वतंत्र झाली की ती आईबापांना सोडून निघून जातात; आणि हे प्राणीजातीच्या हिताचेच आहे कारण जर पिल्ले जन्मभर आईबापांजवळच राहिली तर त्यांना त्यांची अडचणच होईल. अर्थात त्याला काही विशेष कारण असेल तर गोष्ट वेगळी.

मानवाच्या बाबतीत मात्र वेगळीच परिस्थिती निर्माण होते. समाजाकडून व निसर्गाकडून अपेक्षित अशी अपत्याची प्रेमळ काळजी हे तर एक कारण आहेच, पण शिवाय पुढील प्रजेला सांस्कृतिक शिक्षण देणे हेही आवश्यक असते. प्राणी आपल्या पिल्लांना अन्न मिळवणे किंवा विशिष्ट प्रकारच्या हालचाली करणे हे शिकवतात. त्या रीतीने जन्मजात प्रवृत्तींचा विकास करण्याची तर जरूरी असतेच; पण मानवाच्या बाबतीत काही सांस्कृतिक सवयीही भावी प्रजेला शिकवाव्या लागतात. प्राण्यांच्या जन्मजात प्रवृत्तींच्याशीच ह्याची तुलना करता येईल. मानवाला आपल्या मुलांना हस्तकौशल्य, तसेच कला आणि धंदा ह्यांतील ज्ञान द्यावे लागते. त्याहीपलीकडे भाषा, परंपरा व नैतिक संस्कृती, समाजरचनेत अंतर्भूत अशा वागण्याच्या पद्धती व चालीरीती ह्याही शिकवाव्या लागतात.

ह्या सर्वांमध्ये दोन पिढ्यांमध्ये पुष्कळच सहकार्य असावे लागते— वरची पिढी ज्ञान देत असते खालची पिढी ते घेत असते. आणि इथे आपल्याला कुटुंब ही त्या सगळ्या सांस्कृतिक विकासाची भूमी म्हणून ओळखू येते. विशेषतः अविकसित समाजात मानवी संस्कृतीचे अखंडत्व ही एक आवश्यक अट आहे; आणि ती कुटुंबाच्या संघटनेनेच पुरी केली जाते. वंश चालू राहाणे हे जितके महत्त्वाचे आहे तितकेच परंपरेचे व संस्कृतीचे अखंडत्व चालू राहाणे महत्त्वाचे आहे; ही गोष्ट अत्यंत आवश्यक आहे हे आपण ओळखले पाहिजे. ज्याप्रमाणे संस्कृतीविना मानव अस्तित्वात राहू शकणार नाही त्याचप्रमाणे

संस्कृती पुढे चालवायला मानवजात अस्तित्वात नसेल तर संस्कृतीही नामशेष होईल. आधुनिक मानसशास्त्र आपल्याला असे सांगते की, कुटुंबात मुलांच्या शिक्षणाची जी सुरुवात होते ती अतिशय महत्त्वाची असते; व पूर्वीच्या अभ्यासकांनी तिच्याकडे पूर्णपणे दुर्लक्ष केलेले होते. आणि आज कुटुंबाचा मुलांच्या मनावरील परिणाम जरी प्रचंड असला तरी संस्कृतीच्या प्रारंभीच्या काळात तो आजच्याहूनही अधिक बलवत्तर असला पाहिजे. कारण कुटुंब ही एकच शिक्षण देणारी संस्था त्या वेळी होती. त्यात दिले जाणारे शिक्षण अगदी साधे होते; पण ते इतक्या जोरदारपणे दिलेले व आज्ञार्थी होते की, समाज विकसित झाल्यानंतर त्याची तितकी आवश्यकता राहू नये.

आईबापाकडून मिळणाऱ्या ह्या शिक्षणात सांस्कृतिक अखंडत्व कायम राहाते आणि ह्यात समाजातील कार्यांची उभारणी आपल्याला दिसून येते. समाजाचा एक भाग मार्गदर्शन करतो तर दुसरा त्याच्यामागून जातो— एक सांस्कृतिक दृष्ट्या वरच्या दर्जाचा तर दुसरा खालच्या दर्जाचा.

तांत्रिक ज्ञान व नैतिक मूल्ये ह्यांचे ज्ञान देण्याला एका विशिष्ट प्रकारचे सहकार्य लागते. आईबापांना मुलाला ज्ञान देण्याचा उत्साह असावा लागतो. मुलाला शिकून घेण्याची उत्कट इच्छा असावी लागते. पण शिवाय त्यांच्यात एक प्रकारचे भावनात्मक वातावरणही आवश्यक असते. एका बाजूला आदर, विश्वास आणि आज्ञाधारकपणा ही हवी तर दुसऱ्या बाजूला माया, अधिकाराची जाणीव आणि मुलाला योग्य दिशा दाखविण्याची इच्छा ही पाहिजेत. शिक्षण हे काही प्रमाणात अधिकार व प्रतिष्ठा ह्यांच्याशिवाय दिले जाऊ शकत नाही. आईबाप मुलाला जे सत्यकथन करतात, जी उदाहरणे देतात, ज्या आज्ञा करतात त्यांचा हेतू सफल होणे किंवा त्यांचा योग्य रीतीने स्वीकार होणे ह्याकरता सप्रेम आज्ञाधारकपणा आणि मायेचा अधिकार ही आईबाप व मुले ह्यांच्या संबंधात आवश्यक असलीच पाहिजेत. विशेषतः हे संबंध व ह्या परस्पर प्रतिक्रिया पिता व पुत्र ह्यांच्यात फार महत्त्वाच्या आहेत. तरुणांच्या जोरदार नव्या समजुती आणि वडिलांची पुराणमतवादी विचारसरणी ह्यांमुळे कायम आदराची भावना प्रस्थापित होण्यात अडचण निर्माण होते. आई ही निदान प्रथम तरी सर्वांत निकटची पालक व मायाळू मदतनीस असल्यामुळे तिला मुलांशी वागण्यात काही अडचण येत नाही. मुलगा आणि आई ह्यांच्यातील संबंध जर आज्ञाधारकपणा, आदर आणि खालचा दर्जा ह्यांवर अवलंबून राहून एकमेकांशी जुळणारे असावयास पाहिजे असले तरी पुढे त्यात काही बिघाड करणाऱ्या गोष्टी येऊ शकतात. ह्या गोष्टींचा प्रस्तुत ग्रंथाच्या पूर्वीच्या भागात उल्लेख आलेलाच आहे व पुढेही त्याबद्दल विचार होईल.

पूर्ण वाढ झालेला प्राणी आपल्या आईबापांना सोडून निघून जातो. मानवांत जास्त दिवस टिकणाऱ्या संबंधांची आवश्यकता निर्विवाद आहे. मुलांच्या शिक्षणामुळे त्यांची पूर्ण वाढ झाल्यानंतरही ती दीर्घकाल कुटुंबात राहतात. पण सांस्कृतिक अंत

हीदेखील कुटुंबाच्या विलीनीकरणाची खूण नाही. सांस्कृतिक शिक्षणाकरता उत्पन्न झालेले परस्पर संबंध जास्त दिवस टिकतात आणि त्यामुळे नवीन सामाजिक संघटनेच्या प्रस्थापनेला शक्ती मिळते.

पूर्ण वाढ झालेल्या व्यक्तीने आईबापांपासून वेगळे होऊन जरी नवीन घर केले तरी तिचा मूळच्या कुटुंबाशी संबंध तुटत नाही. सर्व अविकसित जमातींत, अगदी अपवादाशिवाय क्लॅन, किंवा जमात ही कुटुंबाच्या विस्तारातूनच उद्भवते. गुप्त संघ, कुलचिन्हांचे समूह किंवा जमाती ह्या प्रियाराधनेच्या तत्त्वावर बसवलेल्या असतात. त्यांच्या मुळाशीं राहण्याची जागा, अधिकाराची स्थाने व दर्जा इत्यादी गोष्टी असतात पण तरीही त्यांच्या मागे कुटुंबांतील व्यक्तींचे परस्पर-संबंध निश्चितपणे असतात.[1]

समाजांतील इतर मोठे गट ह्यांच्यातील प्रत्यक्ष व प्रयोगसिद्ध संबंध एका बाजूला आणि कुटुंबातील संबंध दुसऱ्या बाजूला, ह्यांची तुलना करून कुटुंबाचे मूलभूत महत्त्व आपल्याला लक्षात घ्यावयाचे आहे. अविकसित समाजात प्रत्येक व्यक्ती इतरांशी आपले संबंध आई, बाप, बहीण, भाऊ ह्यांच्या संबंधांच्या नमुन्यावर जमवीत असते. ह्या प्रमेयाबद्दल, मानववंशशास्त्रज्ञ मनोविश्लेषणशास्त्रज्ञ व मानसशास्त्रज्ञ ह्यांचे एकमत आहे व मॉर्गन व त्याचे काही अनुयायी ह्यांच्या विलक्षण उपपत्तींना ते पाठिंबा देत नाहीत म्हणजे पूर्ण वाढ झाल्यानंतरही कुटुंबाचे बंध कायम राहतात हा सामाजिक संघटनेचा एक महत्त्वाचा नमुना आहे आणि आर्थिक, धार्मिक किंवा जादूविषयक सहकार्याला तो आवश्यक आहे. मागील एका प्रकरणात आपण हा निष्कर्ष काढलाच होता. त्या वेळी आपण मानवांच्या समूह करण्याच्या प्रवृत्तीबद्दलचा विचार करून असे ठरवले होते की, अशी काही गट करण्याची जन्मजात प्रवृत्ती किंवा एकत्रित राहाण्याची इच्छा मानवात नसते. पण जर सामाजिक बंधने गट बनवण्याच्या मानवपूर्व प्रवृत्तीतून निघालेली नसती तर मग त्यांचा उगम मानवाने आपल्या प्राणी-पूर्वजांकडून घेतलेल्या एकाच गोष्टीत संभवतो, आणि ती म्हणजे पति व पत्नी ह्यांच्यातील, आई-बाप व मुले ह्यांच्यातील, भाऊ आणि बहिणी ह्यांच्यातील म्हणजे थोडक्यात अविभक्त कुटुंबातील परस्पर संबंध.

असे असल्यामुळे आपल्याला दिसून येते की, कौटुंबिक संबंध टिकून राहणे हे केवळ परंपरा चालू राहण्याकरताच नव्हे तर सांस्कृतिक सहकार्याकरताही आवश्यक आहे. आणि ह्या वस्तुस्थितीतच इतर प्राणी व मानव ह्यांच्या उपजतबुद्धीतील फरक सर्वांत अधिक स्पष्ट होतो. कारण पूर्ण वाढ झाल्यानंतरही कुटुंबाशी संबंध कायम राहणे हे प्राण्यांच्या जन्मजात प्रवृत्तीशी अजीबात जुळणारे नाही. येथे आपल्याला जन्मजात प्रवृत्तींच्या लवचिकपणाबद्दल काही विधान करणे शक्य नाही. कारण ज्या अर्थी इतर प्राण्यांमध्ये पूर्ण वाढ झाल्यानंतर कौटुंबिक बंधने टिकून राहात नाहीत त्या अर्थी येथे जन्मजात प्रवृत्ती असणे शक्य नाही. शिवाय जन्मभर टिकणाऱ्या कौटुंबिक संबंधाची उपयुक्तता व कार्ये ही संस्कृतीतून उद्भवलेली आहेत, जीवशास्त्रीय आवश्यकतेतून नाहीत. ह्याच्याचबरोबर आपल्याला असेही दिसते की, इतर प्राण्यांच्यात जीवशास्त्रीय

गरज संपल्यानंतर कुटुंबातील संबंध टिकून राहात नाहीत. मानवात संस्कृती एक नवीन गरज निर्माण करते आणि ती म्हणजे आईबाप व मुले ह्यांच्यातील निकट संबंध सर्व जन्मभर टिकवणे. एका बाजूला ही गरज संस्कृती एका पिढीकडून खालच्या पिढीकडे जाणे ह्यावर अवलंबून असते, तर दुसऱ्या बाजूला सामाजिक संघटनेचा नमुना व तिची सुरुवात ह्या आजन्म टिकणाऱ्या संबंधाशी निगडित असते. कुटुंब हा जीवशास्त्रीय समूह असा आहे की इतर सर्व नाती त्याच्या संदर्भात ठरली जातात व त्याच्यामुळेच अपत्यांचा वंश, त्यांचे समाजातील स्थान व त्यांचा वारसा हीही ठरतात. हे उघड आहे की, कोणत्याही व्यक्तीच्या बाबतीत कौटुंबिक संबंधांचे महत्त्व कमी होत नाही, ते कायम जिवंत राहते. संस्कृती मानवांच्या बाबतीत असा एक नवा संबंध उत्पन्न करते की, त्याला प्राणीसृष्टीत दुसरा काही नमुना नाही. आणि आपल्याला असेही दिसून येईल की, ही जी नवीन परिस्थिती संस्कृतीने उत्पन्न केली आहे व जन्मजात प्रवृत्तींच्या व नैसर्गिक घटनांच्या पलीकडे नेली आहे तीत मानवाला काही धोकेही आहेत. नैसर्गिक प्रवृत्तीपासून मुक्तता होताच मानवाला दोन आकर्षणे ग्रासू लागतात— एक लैंगिक आकर्षण व दुसरे बंड करण्याची इच्छा. मानवाच्या प्रगतीच्या पहिल्या अवस्थेतील समाजात दोन मोठे धोके उत्पन्न होतात— एक म्हणजे जवळच्या नात्याच्या व्यक्तींतील लैंगिक संयोगाचे आकर्षण आणि दुसरे म्हणजे सत्तेविरुद्ध बंड करण्याची इच्छा.



## प्रकरण ७ वे

# मानवाच्या उपजत प्रवृत्तींचा लवचीकपणा

वर जे दोन धोके— जवळच्या नात्यातील व्यक्तींचा लैंगिक संयोग व बंडखोरपणा— सांगितले त्यांचा विचार करण्यापूर्वी मागील काही प्रकरणांत मानव आणि इतर प्राणी ह्यांच्या कुटुंबांची तुलना करण्यात आली त्या प्रकरणांच्या मुद्द्याकडे दृष्टिक्षेप करू. आपल्याला असे दिसून आले की, बाह्यदृष्टया इतर प्राणी आणि मानव ह्यांच्या सर्वसाधारण वागणुकीत बरेच साम्य आहे. उदाहरणार्थ, त्यांच्यात मर्यादित स्वरूपात काही कालपर्यंत प्रियाराधन असते व ते मानवी समाजात व इतर प्राणीजातींत एकाच प्रकारचे असते. शिवाय आपआपला सहचर निवडल्यानंतर प्राण्यात नर-मादी आणि मानवात पति-पत्नी ही एकत्र राहू लागतात व एकपतिव्रत आणि एकपत्नीव्रत पाळतात. अखेरीस इतर प्राणी व मानव ह्यांच्यात मातृपितृत्वाच्या जबाबदाऱ्या व काळज्या एकाच प्रकारच्या असल्याचे दिसून आले. थोडक्यात, त्यांची वागणुकीची पद्धत व त्यांची कार्ये ही एकमेकांसारखीच आढळली. आपली जात टिकून राहावी ह्याकरता सहचराची योग्य निवड व्हावी, एकदा निवड झाल्यावर एकपतिव्रत व एकपत्नीव्रत पाळावे, व अपत्यांची काळजी घ्यावी हाच मानवी संघटनेचा व प्राण्यांच्या उपजत प्रवृत्तींचा मुख्य उद्देश असतो.

इतर प्राणी व मानव ह्यांच्यात वर सांगितलेल्या साम्यांप्रमाणेच स्पष्ट दिसणारे फरकही आढळतात. हे फरक उद्देशांच्या पूर्तीविषयीचे नसून त्याकरता वापरलेल्या उपायांविषयीचे आहेत. इतर प्राण्यांमध्ये सहचर निवडण्याची पद्धती, नरमादींमधील संबंध कायम राखण्याची व अपत्यांची काळजी घेण्याची यंत्रणा ह्या सर्व जन्मजात प्रवृत्ती, शरीरक्रिया शास्त्रविषयक बदल आणि उपजत बुद्धीची प्रतिक्रिया ह्यांवर अवलंबून असतात. एका विशिष्ट जातीच्या सर्व प्राण्यांत ह्या बाबतीत पूर्ण साम्य आढळते. मानवात मात्र ह्या यंत्रणेत फरक असतो. जरी इतर प्राण्यांप्रमाणेच मानवात सर्वसाधारणपणे प्रियाराधन, लैंगिक संयोग व अपत्यांची काळजी ह्या गोष्टी दिसून येतात आणि जरी त्या इतर प्राण्यांइतक्याच बलवान असतात, तरी त्या सर्व मानवांना तितक्याच प्रमाणात लागू पडतात असे म्हणता येणार नाही. महत्त्वाची खूण नाहीशी झालेली आहे व तिची जागा सांस्कृतिक मर्यादांनी घेतलेली आहे. लैंगिक संयोगाची प्रवृत्ती नेहमी कार्यक्षम असते व इतर प्राण्यांप्रमाणे मादीला माज येत नाही, व संयोगानंतर नराचे तिच्याविषयीचे आकर्षण नाहीसे होत नाही. नैसर्गिक पितृत्व दिसून येत

नाही आणि मातृत्वाचे नातेसुद्धा जन्मजात प्रवृत्तींनीच केवळ ठरले जात नाही. अगदी स्पष्ट अशा जन्मजात प्रवृत्तींच्या जागी सांस्कृतिक घटनांचा परिणाम होऊन उपजत बुद्धीमध्ये बदल होतो. ह्या सर्वांचा अर्थ असा की, जन्मजात प्रवृत्ती व शरीरव्यापार ह्यांच्या परस्परसंबंधात अतीशय फरक पडतो आणि त्यांच्यात महत्त्वाचे बदल होऊ शकतात. ह्या बदलांना आपण "उपजत बुद्धीचा लवचीकपणा" असे म्हणतो. ह्या विधानाने वर सांगितलेल्या सर्व वस्तुस्थितीचे यथार्थ आकलन होते. ह्या सर्वांवरून असे कळते की, ज्या शरीरक्रियांमुळे उपजतबुद्धीला चालना मिळते त्या मानवाच्या बाबतीत नाहीशा झाल्या आहेत, पण त्याच वेळी जन्मजात प्रवृत्तींना पारंपरिक शिक्षण मिळून सांस्कृतिक सवयींची प्रतिक्रिया प्रस्थापित होते. ह्या सांस्कृतिक यंत्रणांचे सत्य विश्लेषण करण्यात आलेले आहे. जवळच्या नात्यातील व्यक्तींशी लैंगिक संबंध किंवा व्यभिचार ह्यांवरील निर्बंध त्यात येतात. तसेच सहचराशी होणाऱ्या लैंगिक संबंधावरील सांस्कृतिक बंधनांतून मुक्तता त्यात येते. त्यात नैतिक व ध्येयरूप प्रमाणित वागणुकीचा व पतिपत्नींना एकत्र ठेवण्याच्या म्हणजे विवाह कायम ठेवण्याच्या कायदेशीर तरतुदींचा समावेश आहे. तसेच आईबापांच्या अपत्यांविषयींच्या प्रवृत्ती त्यामुळे बनवल्या जातात व बाहेर दिसतात. ह्या सर्व सांस्कृतिक घटना निसर्गाने इतर प्राण्यांची वागणूक ज्या प्रकारची बनवली त्याच्याशी समांतर असल्याचे आपल्याला माहीत आहे. पण जर आपण तपशिलात शिरलो तर प्रेमाराधनेचे प्रत्यक्ष स्वरूप, विवाहविधी, आणि मातृ-पितृत्व ही सर्व संस्कृतीप्रमाणे बदलतात, आणि मानवाची वागणूक ठरविणाऱ्या शक्ती केवळ जन्मजात प्रवृत्ती नसून परंपरेने मानवाला शिकवलेल्या सवयी आहेत असे दिसून येते. कायद्याची सामाजिक शक्ती, लोकमताचा प्रभाव, धर्माचा मनावरील ताबा आणि परस्परसंबंधांचे प्रत्यक्ष आकर्षण ह्या सर्वांमुळे जन्मजात प्रवृत्तींचा जोर कमी होतो.

म्हणजे संस्कृतीमुळे मानव नैसर्गिक प्रवृत्तींच्या विरुद्ध वागणुकीला प्रवृत्त होतो असे म्हणता येणार नाही. मानवाला आपल्या भावी सहचरीचा अनुनय करावाच लागतो व तिला अखेरीस आपली निवड पक्की करून आपल्या प्रियकराच्या स्वाधीन व्हावेच लागते. तसेच त्या दोघांना एकमेकांजवळ राहून होणाऱ्या अपत्यांचे पालन-पोषण करावेच लागते. स्त्रीला गर्भधारणा करावीच लागते व पुरुषाला तिचा पालक म्हणून तिच्याजवळ रहावेच लागते. आईबापांना आपल्या मुलांची काळजी घेऊन त्यांचे शिक्षण करावे लागते व नैसर्गिक अवस्थेत इतर प्राणी व त्यांची पिल्ले ह्यांचे जसे निकट संबंध असतात तसेच मानवाच्या बाबतीत संस्कृतीच्यामुळे असतात. पण इतर प्राण्यांच्या बाबतीत ज्याप्रमाणे विशिष्ट जातीतील प्राण्यांच्या वागणुकीत पूर्ण सारखेपणा दिसून येतो तसे मानवाच्या बाबतीत होत नाही. एकाच समाजातील मानवांच्या वागणुकीत अनेक निरनिराळे प्रकार दिसून येतात हे आश्चर्यकारक आहे. उपजत बुद्धीच्या प्रत्यक्ष प्रतिक्रियेच्या ऐवजी परंपरेने ठरलेल्या वागणुकीचे दृश्य आढळते. प्रियाराधन व मातृ-पितृत्व ह्यांच्या सर्व अवस्थांत चालीरीती, कायदा, नैतिक

बंधने, विधी व धार्मिक मूल्ये ह्यांचा परिणाम दिसून येतो. पण त्यांची मुख्य क्रिया प्राण्यांच्या उपजत बुद्धीशी समांतर असल्याचे दिसते. प्राण्यांच्या लैंगिक संयोगापासून प्रतिक्रियांची जी साखळी सुरू होते तोच नमुना मानवाच्या सांस्कृतिक भूमिकेच्या विकासात व परिणतीत दिसून येतो. आता आपल्याला प्राण्यांची उपजत बुद्धी व मानवाच्या भावना ह्यांची तपशीलवार तुलना केली पाहिजे.



प्रकरण ८ वे

# उपजत बुद्धीकडून भावनेकडे

मागील प्रकरणात प्राण्यांच्या व मानवांच्या कुटुंबांच्या घटनांच्या मुख्य वैशिष्ट्यांचे आपण तुलनात्मक परीक्षण केले. विशिष्ट शरीरव्यापाराच्या महत्त्वाच्या घटना नाहीशा झाल्यामुळे तसेच मानवाच्या वागणुकीवर वाढते सांस्कृतिक नियंत्रण आल्यामुळे मानवाची प्रतिक्रिया गुंतागुंतीची होते व तिच्यात इतके निरनिराळे प्रकार दिसतात की, प्रथमदर्शनी गोंधळ आणि अव्यवस्था आहे असे भासते. पण खरोखर परिस्थिती तशी नसते. प्रथम आपल्याला असे आढळते की, लैंगिक संयोगाच्या घटनेला ज्या निरनिराळ्या प्रतिक्रिया दिसतात त्या एका बाबतीत अगदी सरळ असतात असे दिसून येते. मानवांमध्ये लैंगिक आकर्षणाची परिणती विवाहात होते आणि आईबाप बनूमुळे ह्यांचा एक जन्मभर टिकणारा गट बनतो. दोन्ही प्रकारात भावना एका विशिष्ट ठिकाणीं केंद्रित होतात— मग तो सहचर ( किंवा सहचारिणी ) असो, अपत्य असो किंवा मातापिता असोत. म्हणजे एक विशिष्ट व्यक्ती मानवी भावनांच्या भूमिकेत अग्रस्थान पटकावते हे एक वैशिष्ट्य लक्षात घेतले पाहिजे.

वस्तुस्थिती अशी आहे की, ही प्रवृत्ती आपण जसजसे खालच्या पायरीवरच्या प्राण्यांकडून वरच्या श्रेणीतल्या प्राण्यांकडे जातो तसतशी जास्त स्पष्ट होते. अगदी खालच्या प्राणीजातीत नराचे शुक्र पुष्कळदा सभोवतालच्या अवकाशात पसरून दिले जाते व मादीच्या शरिरातील अंड्याचे फलन केवळ भौतिक शक्तींवर अवलंबून राहाते. वैयक्तिक निवड, एकमेकांशी जुळवून घेणे इत्यादी गोष्टींचा विकास हळूहळूच होतो आणि त्यांना पूर्णत्व फक्त सर्वोच्च प्राण्यांतच आढळते.

मानवाच्या बाबतीत मात्र ही प्रवृत्ती विशिष्ट समाजव्यवस्थेने अंमलात आणली व लागू केली जाते. उदाहरणार्थ विवाहाचा जोडीदार निवडण्याबद्दल कित्येक सामाजिक संकेत आहेत. त्यांच्यातल्या काहींमुळे काही स्त्रिया जोडीदारीण म्हणून निवडणे शक्य होत नाही तर दुसरे काही असे आहेत की, त्यामुळे विशिष्ट जोडीदार निवडणे आवश्यक होते व दोन व्यक्तींची जोडी ठरली जाते. काही प्रकारच्या विवाहात जोडीदार केवळ सामाजिक पद्धतींनी ठरले जातात, उदाहरणार्थ बालवयात ठरलेले अगर सामाजिक चालीरीतींमुळे ठरलेले विवाह काही झाले तरी दोन विवाहित व्यक्ती, प्रियाराधन, वैवाहिक संबंध आणि अपत्यांची काळजी ह्यांमुळे आपापसात घनिष्ट वैयक्तिक संबंध प्रस्थापित करतात. एका व्यक्तीच्या आर्थिक, लैंगिक, कायद्या संबंधींच्या आणि

धार्मिक आवडीच्या गोष्टींवर जोडीदाराच्या व्यक्तित्वाचा प्रभाव पडतो. आपल्याला माहीत आहे की, विवाहाला कायद्याचा व समाजाच्या परवानगीचा जो आधार मिळतो त्यामुळे सामाजिक शक्तींच्यामुळे दोन व्यक्तींत एक आजन्म टिकणारे नाते प्रस्थापित होते. म्हणजे मानवी संबंधात भावनांच्या जुळण्यामुळे एका विशिष्ट ध्येयाची पूर्तता होते, क्षणिक प्रवृत्तीमुळे नव्हे. एकाच संबंधात भावना व आवडीनिवडी बदलू शकतात. प्रियाराधनेच्या सुरवातीला त्या एकतर्फी व तुटक अशा असतात. पण त्या हळूहळू परिपक्व होत जातात आणि विवाहातील एकत्र जीवनामुळे, तसेच अपत्यांच्या आगमनामुळे त्यांच्यात अर्थ भरतो आणि त्या अधिक गुंतागुंतीच्याही बनतात. तरी पण ह्या भावनांच्या जुळवणीच्या निरनिराळ्या अवस्थांमुळे एका व्यक्तीची जोडीदाराच्या जीवनावरील पकड– म्हणजेच विवाहाचा मूळ हेतू– एकसारखी वाढत जाते. हा वैवाहिक बंध सहजासहजी तोडता येत नाही व तसे करण्याला मानसशास्त्रीय व सामाजिक निर्बंध असतात. उदाहरणार्थ अविकसित व पुढारलेल्या अशा दोन्ही प्रकारच्या समाजात घटस्फोट किंवा आईबाप व अपत्य यांच्यातील बेबनाव ही वैयक्तिक दुःखकारक बाब तर असतेच पण ती एक सामाजिक दुर्घटनाही असते.

मानवी कुटुंबात ज्या भावना असतात त्या जरी एकसारख्या बदलत असल्या, त्या जरी बाह्य परिस्थितीवर अवलंबून असल्या— उदाहरणार्थ विवाहातील प्रेमाची भावना, तीत प्रेम, आनंद, दुःख भीती आणि उत्कट आवड— जरी त्या गुंतागुंतीच्या असल्या, तरी उपजत बुद्धीच्या नियंत्रणाखाली असत नाहीत. पण त्या गोंधळलेल्या किंवा असंघटित नसतात एवढेच नव्हे तर त्यांची पद्धतशीर मांडणी झालेली असते. विवाहातील एका जोडीदाराविषयी दुसऱ्याची भावना, आईबाप व अपत्य ह्यांच्यातील परस्परसंबंध हे काही आकस्मित किंवा अनपेक्षित नसतात. नात्याचा प्रत्येक संबंध निरनिराळ्या प्रकारच्या भावनात्मक भूमिकांशी जुळवून घेणे जरूर असते व त्यामुळे काही सामाजिक ध्येये साध्य व्हावी लागतात. प्रत्येक भूमिका एका विशिष्ट पद्धतीने हळूहळू विकास पावते आणि तिच्या मार्फत भावनांचे संघटन होत असते. जसे विवाहातील दोन जोडीदारांमध्ये भावनांचा प्रारंभ लैंगिक तीव्र आकर्षणाने होतो.

संस्कृतीमध्ये हा क्षण केवळ उपजत बुद्धीवर अवलंबून नसतो हे आपल्याला माहीत आहे. अनेक निरनिराळ्या गोष्टी, उदाहरणार्थ, स्वहित, आर्थिक आकर्षण, सामाजिक प्रगती इत्यादी गोष्टी तरुणाला आकर्षित करणाऱ्या स्त्रीमध्ये किंवा स्त्रीला आकर्षित करणाऱ्या पुरुषामध्ये महत्त्वाच्या असतात आणि ह्या गोष्टी अविकसित व विकसित अशा दोन्ही प्रकारच्या समाजात आढळतात. एकदा एका व्यक्तीला दुसरीबद्दल आकर्षण वाटू लागले की, मग समाजातील प्रियाराधनेच्या चालू पद्धतीप्रमाणे त्याची वाढ होत जाते. एकदा दोघांमधील हा संबंध दृढ झाला की मग विवाह करण्याचा निश्चय म्हणजे एक सामाजिक करारनामा होतो व सामाजिक दृष्ट्या त्या दोघांत एक

विशिष्ट संबंध प्रस्थापित होतो. ह्या कालात वैवाहिक संबंधाची तयारी सुरू होते. विवाहाच्या कायदेशीर बंधनामुळे पूर्वीच्या नात्यात म्हणजे ज्यात लैंगिक आकर्षणाला जास्त महत्त्व असते, त्याचे रूपांतर होऊन समाईक जीवन सुरू होते व भावनात्मक भूमिकांचे पुनर्घटन व्हावे लागते. येथे एक गोष्ट महत्त्वाची आहे.

प्रियाराधनेचे विवाहात रूपांतर होण्यासंबंधी सर्व समाजात निरनिराळ्या म्हणी व विनोदी चुटके प्रचलित आहेत, पण त्या बदलामध्ये निश्चित आणि अवघड असे मानसिक फरक होत असतात. मानवी संबंधात लैंगिक भाव नाहीसे होत नाहीत किंवा प्रियाराधनेच्या स्मृती विसरल्या जात नाहीत; तरी अगदी नवीन आवडीनिवडी आणि भावना समाविष्ट केल्या जातात. ह्या नवीन भूमिका जुन्या वैयक्तिक सहिष्णुतेच्या आणि सहनशीलतेच्या पायावरच उभारलेल्या असतात व जेथे तणाव उत्पन्न करणारी परिस्थिती उद्भवते तेथे लैंगिक आकर्षणाला दुय्यम स्थान दिले जाते. प्रारंभीच्या जीवनातील लैंगिक अनुभवांची आकर्षकता व सुख आणि जोडीदाराबद्दल वाटणारी कृतज्ञता ह्यांना निश्चित असे स्थान जीवनाच्या उत्तरभागात असते व त्याचे मानसिक मूल्यही महत्त्वाचे असते. ह्यामध्ये मानवी भावनांचे एक महत्त्वाचे मूलतत्त्व आपल्याला आढळते, व ते म्हणजे पूर्वजीवनातील आठवणी जीवनाच्या नंतरच्या अवस्थांत पुढे नेणे. आपण पुढे आई व मूल आणि बाप व मुलगा ह्यांच्या संबंधांचे अधिक विश्लेषण करू आणि असे दाखवून देऊ की वरीलप्रमाणेच भावना हळूहळू परिपक्व व संघटित होत जातात.

शारिरिक संबंधाच्या बाबतीत भावनांची एक प्रमुख भूमिका असल्याचे दिसून येते पती आणि पत्नी ह्यांच्या बाबतीत लैंगिक संयोगाची इच्छा ही अत्यावश्यकच आहे पण त्याचबरोबर त्यांना एकमेकांबद्दल वैयक्तिक आकर्षण वाटले पाहिजे व त्यांचे स्वभाव एकमेकांशी जुळणारे असले पाहिजेत. प्रियाराधनेतील भावनात्मक घटक, पहिल्या मीलनाच्या वेळची उत्कटता ही पुढे शांत अशा प्रेमात समाविष्ट झाली पाहिजेत व त्यामुळे पतिपत्नींना त्यांच्या उर्वरित आयुष्यात एकमेकांच्या सहवासात आनंद वाटला पाहिजे. तसेच त्यांच्या भावनांच्या घटकांमुळे त्यांना आवडणाऱ्या सारख्यासारख्या गोष्टी इत्यादींचा मिलाफ होऊन ती दोघे एकाच घराचे अवयव बनले पाहिजेत.

ही एक सर्वांना माहीत असलेली घटना आहे की, प्रियाराधन व लैंगिक संयोग, त्यानंतर पुढे अस्तित्वात येणारे वैवाहिक जीवन, त्यानंतरचे मातृत्व व पितृत्व ह्या प्रत्येक स्थित्यंतरात अनेक अडचणी, धोके आणि गैरसमज होत असतात. ह्या स्थित्यंतराच्या वेळीच प्रत्येक जोडीदाराच्या भूमिकेत विशेष प्रकारची पुनर्रचना होत असते.

वरील घटनेत आपल्याला जी यंत्रणा दिसते ती जन्मजात प्रवृत्ती, मानवी मनातील भावना आणि सामाजिक घटक ह्यांच्या प्रक्रियेतून बनते. आपण असे पाहिले की, पुरुष व स्त्री ह्यांच्यामधील लैंगिक आकर्षणावर समाजाच्या संघटनेतील आर्थिक,

सामाजिक, आणि धार्मिक ध्येयाची छाप पडत असते. ह्या आकर्षणातून काही व्यक्ती विवाहबाह्यतेच्या नियमांमुळे, काही जातिबंधनांमुळे तर काही मानसिक शिक्षणामुळे वगळल्या जातात. ह्याच्या उलट काही व्यक्तींच्या बाबतीत आर्थिक आकर्षकर्ता, उच्च दर्जा किंवा समाजातील वरचे स्थान ह्यांच्यामुळे त्यांच्याकडे मन वळते.

आईबाप व मुले ह्यांच्या परस्पर संबंधात देखील परंपरेमुळे विशिष्ट भूमिकांवर जोर दिला जातो, व त्यामुळे काही प्रकारच्या घटनांची आधीच अपेक्षा केली जाते. सामाजिक यंत्रणेची क्रिया ज्या वेळी वाढणाऱ्या तरुण मनांवर होते, त्यावेळी तिला जास्तच महत्त्व प्राप्त होते. विशेषतः अविकसित समाजात मुलाच्या शिक्षणात सामाजिक, नैतिक व बौद्धिक तत्त्वे प्रत्यक्षपणे मनावर ठसवली जात नाहीत तर परिपक्व होणाऱ्या मनावर भोवतालच्या सांस्कृतिक परिस्थितीची ती क्रिया असते. अशाच रीतीने मुलाला जात, दर्जा, किंवा जमातीतील विभाग ह्यांचे ज्ञान होते. कारण प्रत्यक्ष कृतीमुळे त्याला विटाळ, पसंती आणि शरणागती ह्यांचे शिक्षण मिळते. अशा रीतीने एक विशिष्ट ध्येय मुलांच्या मनावर ठसवले जाते आणि त्यांच्यात लैंगिक आकर्षण उत्पन्न होण्याच्या वेळेसच सामाजिक निर्बंध आणि उत्तेजक गोष्टी, प्रियाराधनेचे बिनचूक प्रकार, इच्छित वैवाहिक जीवन इत्यादींच्या कल्पना त्याच्या मनात उद्भवतात.

येथे हे लक्षात घेणे जरूर आहे की, ही ध्येये मनात हळूहळू सक्रिय होण्याची घटना काही गूढ वातावरणामुळे घडून येत नसून अगदी स्पष्ट दिसणाऱ्या व प्रत्यक्ष अशा घटनांमुळे अस्तित्वात येते. जर आपण ह्या ग्रंथाच्या पूर्वभागाकडे लक्ष दिले तर असे दिसून येईल की, यूरोपातील शेतकरी कुटुंबातील किंवा रानटी मेलानेशियामधील मूल आई-बापांच्या रागावून उच्चारलेल्या अपशब्दांमुळे, वयस्क मंडळींच्या सार्वजनिक मतांमुळे आणि काही प्रकारच्या वागणुकीमुळे उत्पन्न होणाऱ्या शरमेने व मानसिक त्रासामुळे योग्य प्रकारची वागणूक स्वीकारते. अशा रीतीने योग्य आणि अयोग्य हे वागणुकीचे दोन प्रकार दिसू लागतात. प्रतिबंध केलेले संबंध टाळणे, इतर काही गटांशी आपुलकीने वागणे, आणि आई, बाप, मामा, बहीण व भाऊ ह्यांच्याशी वागताना होणारे सूक्ष्म भेद ह्या सर्व गोष्टी स्पष्ट होतात. शिवाय ह्या पद्धतीची जोरदार बाह्य चौकट व तिची सांस्कृतिक मूल्ये ह्यांच्या संदर्भात आपल्याला राहण्याचे ठिकाण, जमातीची मांडणी व घरातील सामानसुमान ह्यांचाही विचार केला पाहिजे. उदाहरणार्थ, मेलानेशियामध्ये एका बाजूला एका कुटुंबाचे घर, अविवाहितांचे राहण्याचे ठिकाण, पितृगृहातील विवाह व मातृसत्ताक पद्धतीचे अधिकार ह्या सर्वांचा संबंध खेडी आणि घरे ह्यांची रचना, तसेच जमिनीची विभागणी, आणि दुसऱ्या बाजूला नियम, निर्बंध, निषेध, नीतिविषयक कायदे आणि विचारांच्या निरनिराळ्या अवस्था ह्यांचा परस्पर-संबंध असतो. ह्यावरून आपल्याला दिसून येते की, मानव आपल्या भावनांची भूमिका हळूहळू कायदा, सामाजिक व भौतिक व्यवस्था ह्यांच्या द्वारे व्यक्त करीत असतो, आणि ह्या सर्व गोष्टींचा त्याच्या वागणुकीवर व दृष्टिकोनावर परिणाम घडत असतो.

मानव आपल्या सांस्कृतिक भूमिकेला अनुरूप अशी आपल्या सभोवारच्या जगाची मांडणी करीत असतो आणि उलट त्याच्या भोवतालची दुय्यम परिस्थिती त्याच्या सांस्कृतिक भावना बनवीत असते.

आणि वरील विवेचनाद्वारे आपण एका महत्त्वाच्या निष्कर्षांशी येऊन पोचते व त्यामुळे आपल्याला कळून चुकते की, मानवाची उपजतबुद्धी का लवचिक बनते व जन्मजात प्रवृत्तींचे रूपांतर मनातील भूमिका व भावना ह्यांच्यात का होते.

मानवी भावना किती प्रमाणात शिक्षित करता येतात आणि गुंतागुंतीच्या व लवचिक पद्धतीत बसवता येतात ह्यावर संस्कृति अवलंबून असते. संस्कृतीच्या अंतिम कार्यक्षमतेमुळे मानवाला आपल्या आजूबाजूच्या परिस्थितीवर वर्चस्व मिळवता येते. कारण त्याला यांत्रिक उपकरणे, शस्त्रे, प्रवासाची साधने आणि हवामान, तसेच वारा, ऊन पाऊस ह्यांपासून संरक्षण इत्यादी गोष्टी साध्य होतात. अर्थात ह्या गोष्टी वापरण्याकरता लागणारे पारंपरिक ज्ञान व कला साध्य झाली तरच ते शक्य होते. भौतिक सामुग्रीचा उपयोग करून घेण्याचे ज्ञान प्रत्येक पिढीला नव्याने मिळवावे लागते. हे पारंपरिक शिक्षण केवळ बुद्धीच्या साहाय्याने किंवा जन्मजात प्रवृत्तींच्या मदतीने घेता येत नाही. एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे ज्ञान देताना अनेक अडचणी येतात, परिश्रम करावे लागतात, व मोठ्या पिढीजवळ लहान पिढीबद्दल सहनशीलता व प्रेम ह्यांचा भरपूर साठा असावा लागतो. ही मानसिक तयारी काही थोड्याच प्रमाणात जन्मजात प्रवृत्तींवर अवलंबून असते. कारण ज्या सांस्कृतिक कार्यामध्ये तिचा उपयोग होतो ते कृत्रिम, वैशिष्ट्य नसलेले असे असते व म्हणूनच उपजत बुद्धीच्या प्रेरणेशी त्याचा संबंध नसतो. दुसऱ्या शब्दात सांगायचे म्हणजे; सामाजिक परंपरेच्या अखंडत्वात वैयक्तिक भावनात्मक संबंध येतात व त्यात अनेक प्रतिक्रियांना शिक्षित व विकसित करून त्यांतून गुंतागुंतीच्या भूमिका बनवाव्या लागतात. आईबापांवर मुलांच्या सांस्कृतिक शिक्षणाचा किती भार पडणार हे मानवी स्वभाव सांस्कृतिक व सामाजिक प्रतिक्रियांना किती प्रमाणात जुळवून घेऊ शकतो त्यावर अवलंबून असते. याचा अर्थ असा की, संस्कृतीची एक बाजू उपजत बुद्धीच्या लवचिकपणावर अवलंबून असते.

पण मानवाच्या संस्कृतीशी संबंध म्हणजे केवळ एका व्यक्तीकडून दुसरीकडे परंपरेचे संचारण करणे नव्हे. अगदी साध्या स्वरूपाच्या संस्कृतीतसुद्धा सहकार्याखेरीज कोणचीच गोष्ट होणार नाही. प्राण्यांच्या कुटुंबातसुद्धा अगदी प्राथमिक स्वरूपात विभागणी असते. मादीच्या व पिल्लांच्या विशिष्ट अवस्थेत त्यांना अन्नाचा पुरवठा करणे हे नराचे काम असते व त्यानंतर नर व मादी ही दोघेही पिल्लांचे संरक्षण करतात. मात्र सर्व प्राण्यांच्या जातीत अन्नपुरवठ्याची भोवतालच्या वातावरणाशी जुळवून घेण्याची व्यवस्था आणि कार्यक्षेत्रांची आर्थिक विभागणी कडक असते. संस्कृतीमुळे मानवाला अनेक निरनिराळ्या आर्थिक परिस्थितीशी जुळवून घ्यावे लागते आणि तिच्यावर तो जे नियंत्रण घालतो ते लवचिक नसलेल्या उपजत बुद्धीच्या

सहाय्याने नसून विशेष प्रकारच्या कौशल्याच्या व आर्थिक संघटनेच्या मदतीने घालतो. तसेच त्याला काही विशिष्ट प्रकारच्या आहाराची सवय करावी लागते. पण ह्या केवळ यांत्रिक दृष्टिकोनाबरोबरच एक सुयोग्य कार्य विभागणी व्हावयास पाहिजे व योग्य असा सहकारही झाला पाहिजे. अर्थात ह्यात सभोवतालच्या निरनिराळ्या परिस्थितीत भावना जुळवून घ्याव्या लागतात. पती व पत्नी ह्यांच्या आर्थिक कर्तव्यात फरक असतो. उत्तरेकडील बर्फमय प्रदेशात अन्नाचा पुरवठा करण्याची जबाबदारी पतीवर पडते. अविकसित शेतीप्रधान समाजात घरातील माणसांना अन्नाचा पुरवठा करण्याचे मुख्य काम स्त्रीकडे असते. ह्या आर्थिक कार्यविभाजनाबरोबरच धार्मिक, कायदेशीर आणि नैतिक भेद आर्थिक कामात जुळवले जातात. वैवाहिक संबंधात सामाजिक दर्जाचे आकर्षण, प्रत्यक्ष कामात मदत करणाऱ्या जोडीदाराचे मूल्य, नैतिक व धार्मिक ध्येय, ह्या सर्वांमुळे वैवाहिक जीवनाला रंग चढतो. वैवाहिक जीवनातील विविधता आणि पतिपत्नींमधील, तसेच आईबाप व मुले ह्यांतील संबंध एकमेकांशी जुळवून घेण्याची शक्यता ह्यामुळे कुटुंबाला अनेक प्रकारच्या बाह्य परिस्थितीत कार्यक्षम राहता येते व प्रत्यक्ष सहकार्यामुळे सांस्कृतिक वस्तुरूप साधने व भोवतालचे नैसर्गिक वातावरण ह्यांच्याशी एकरूप होता येते. ह्यांवर किती प्रमाणात मानव अवलंबून असतो व त्याचे परस्परसंबंध कसे असतात हा मुद्दा प्रस्तुत विवेचनात महत्त्वाचा नाही. मला येथे इतकेच मुख्य सांगायचे आहे की, फक्त लवचिक सामाजिक बंधने आणि बदलू शकणाऱ्या भावनांची संस्था अशा जातीच्या प्राण्यांमध्ये कार्यक्षम होऊ शकेल, की ज्यांना आपल्या भोवतालची परिस्थिती बदलून एक दुय्यम परिस्थिती उत्पन्न करता येईल, आणि तिच्या मदतीने बाहेरच्या जीवनातील अडचणींवर मात करता येईल.

ह्या सर्व विवेचनावरून आपल्याला दिसून येईल की, जरी मानवी कुटुंबातील परस्पर संबंधांचा पाया उपजत बुद्धीवर आधारलेला असला तरी ज्या प्रमाणात अनुभव व शिक्षण ह्यांनी तो बदलतो किंवा ज्या प्रमाणात हे संबंध सांस्कृतिक व पारंपरिक घटकांचा स्वीकार करू शकतील त्या प्रमाणात त्यांचा उपयोग भिन्न प्रकारच्या व गुंतागुंतीच्या कार्यविभागणीत होऊ शकेल.

येथे कौटुंबिक संबंधांबद्दल जे लिहिले ते अर्थातच इतर सामाजिक संबंधांनाही लागू आहे. जसे कौटुंबिक संबंध उपजत बुद्धीवर बऱ्याच प्रमाणात आधारलेले असतात तसे ह्या इतर प्रकारच्या संबंधांचे नसते. त्यात उपजत बुद्धीचा संबंध जवळजवळ नसतो. विवाहसंस्था व कुटुंबसंस्था ह्यांचे औपपत्तिक महत्त्व आणि या संस्थांचे मानवाकरिता असलेले व्यावहारिक महत्त्व ही समांतर असतात. जीवशास्त्रीय एकात्मता आणि सामाजिक एकात्मता यामध्ये कुटुंब हा दुवा असतो; इतकेच नव्हे तर कुटुंबाच्या नमुन्यावरच इतर विस्तृत संबंध आधारलेले असतात. समाजशास्त्रज्ञ व मानववंश शास्त्रज्ञ ज्या प्रमाणात भावनांबद्दलची उपपत्ती सांस्कृतिक परिस्थितीत भावनांची घडण आणि समाज संघटनेशी त्यांचे नाते या बाबी स्पष्ट करू शकतील.

त्याच प्रमाणात आपल्याला आदिवासी समाजशास्त्राचे बरोबर ज्ञान होत जाईल. जाताजाता मला असे सांगावेसे वाटते की, अविकसित समाजातील कौटुंबिक जीवनाचे तपशीलवार वर्णन, प्रियाराधनेच्या चालीरीती, व जमातीतील टोळ्या ह्यांची माहिती जर प्रसिद्ध केली तर समाजातील " गटांची उपजत बुद्धी ", " जातिप्रकारांच्याबद्दलची जाणीव " " गटांचे मानस " अशा प्रकारची समाजसशास्त्रीय शाब्दिक " रामबाण औषधे " प्रचारातून नाहीशी होतील.

ज्यांना आधुनिक मानसशास्त्राचे ज्ञान आहे, त्यांना कळून चुकलेच असेल की, आदिवासींचे समाजशास्त्र समजून घेताना आपल्याला मनुष्याच्या भावनासंबंधीची एक महत्त्वाची उपपत्ती लक्षात घेतली पाहिजे. ही उपपत्ती श्री. ए. एफ्. शँड ह्यांनी प्रथम पुढे मांडली व ते आधुनिक काळातले अत्यंत थोर असे मानसशास्त्रज्ञ होते. त्यांच्या मते मानवाच्या वैचारिक जीवनाचे वर्गीकरण करताना किंवा त्याच्या भावनासंबंधीचे नियम ठरवताना एक गोष्ट विसरता कामा नये, व ती ही की, मानवाच्या भावना नुसत्या हवेत तरंगत नसतात तर त्या निरनिराळ्या वस्तूंच्या भोवती केंद्रित झालेल्या असतात. ह्या वस्तूंभोवती मनुष्याच्या भावना निश्चित प्रकारच्या क्रमात संघटित झालेल्या असतात. शिवाय शँड ह्यांनी " स्वभावाचा पाया " ( The Foundation of Character ) ह्या आपल्या ग्रंथात निरनिराळे असे नियम शोधून काढले आहेत की, त्यांच्या आधारे मनोविकारांचे भावनांमध्ये संघटन होते. त्यांनी असे दाखवून दिले आहे की, मानवी स्वभावाबद्दलच्या नैतिक प्रश्नांची उत्तरे फक्त भावनांच्या संघटित स्वरूपाच्या अभ्यासानेच देता येतील. आपल्या प्रस्तुत विवेचनात शँडची भावनांबद्दलची उपपत्ती एका सामाजिक प्रश्नामध्ये उपयुक्त ठरली व आपल्याला असे दाखवून देता आले की, प्राण्यांच्या व सांस्कृतिक प्रतिक्रियांमधील फरकाचे बिनचूक विश्लेषण केले तर त्यांची मते अगदी बरोबर असल्याचे दिसून येते. प्राण्यांची उपजत बुद्धी व मनुष्याची आसक्ती ह्यांतले मुख्य भेद असे — परिस्थितीपेक्षा वस्तूला ( व्यक्तीला ) असलेले जास्त महत्त्व; भावनांची संघटित भूमिका, त्यांचे अखंडत्व आणि त्यांचे स्वरूप स्पष्ट व घन झाल्यामुळे तयार होणारे कायम लवचिक क्रम. शँडच्या उपपत्तीत आपण जी भर टाकली ती एवढीच की, भावना मनात तयार होण्याचा सामाजिक संघटनेशी संबंध असतो, तसेच मनुष्याने बनवलेल्या वस्तूंच्या संस्कृतीशीही असतो.

मानवी भावनांच्या संबंधात शँडने जो एक महत्त्वाचा मुद्दा मांडला आहे तो असा की, जे मनोविकार त्या भावनांत प्रामुख्याने आढळतात ते एकमेकांपासून स्वतंत्र नसून त्यांच्यात एकमेकांना दूर ठेवण्याच्या व दाबून टाकण्याच्या प्रवृत्ती दिसून येतात. ह्यापुढे जे विश्लेषण केलेले आहे त्यात आई आणि मूल व बाप आणि मूल ह्यांच्या नमुनेदार किंवा प्रातिनिधिक संबंधांचा अधिक तपशीलवार विचार करावा लागेल. ह्यामुळे भावनांचा विकास होताना ज्या काही विचारांना मनातून काढून टाकावे लागते किंवा जे मनोविकार दाबून टाकावे लागतात त्यांच्या स्पष्टीकरणाला मदत होईल.

आणि येथे हे स्पष्ट केले पाहिजे की, शँडची मनोविकारांची उपपत्ती मनोविश्लेषणाच्या अगदी जवळ येते. ह्या दोन्हीही उपपत्ती व्यक्तीच्या मनोव्यापारांच्या पूर्वीच्या जीवनातील अवस्थांविषयींचा विचार करतात. ह्या दोन्ही उपपत्तींनी हे ओळखले आहे की, व्यक्तीच्या मनोव्यापारांच्या प्रत्यक्ष अभ्यासानेच आपल्याला समाधानकारक निष्कर्ष काढता येतील. जर मनोविश्लेषणशास्त्रज्ञांना शँडच्या उपपत्तीची अधीक माहिती असती तर त्यांना पुष्कळशा तात्त्विक चुका टाळता आल्या असत्या आणि त्यांना कळून चुकले असते की, उपजत बुद्धी ही मानवी मनोविकारांचाच एक भाग आहे आणि निव्वळ एखादी तात्त्विक कल्पना नाही. आणि त्या दृष्टीने त्यांनी अंतर्मनाबद्दलची स्पष्ट कल्पना दिली असती व तिच्याभोवती गूढ वलय निर्माण केले नसते. दुसऱ्या बाजूला फ्रॉइडने मनोविकारांच्या उपपत्तीत दोन महत्त्वाच्या मुद्द्यांवर भर दिला आहे. त्याने प्रथम ही गोष्ट पुढे मांडली की, मनातील विचार उत्पन्न होण्याचे स्थान म्हणजे कुटुंब आहे शिवाय त्याने असेही दाखवून दिले की, मनातील विचारांना आकार येताना काही गोष्टी काढून टाकून जागा मोकळी करणे हेही अत्यंत महत्त्वाचे आहे आणि ह्या घडामोडीत विचार दाबून टाकण्यामध्ये स्पष्ट धोके आहेत. दबाव आणणाऱ्या शक्ती मनात दडलेल्या एका नियंत्यामुळे कार्यान्वित होतात असे मनोविश्लेषणशास्त्रज्ञ मानतात, पण आपण वर जे विवेचन केले आहे त्याच्या आधारावर आपण त्याला निश्चित आणि स्पष्ट असे स्थान देऊ शकतो. दबाव आणणारी शक्ती म्हणजे मनातील भावनांचीच शक्ती आहे. सामाजिक वागणुकीत उपयुक्त ठरण्याकरता प्रत्येक भावनेला सुसंगती पाहिजे, तीतूनच ह्या शक्तीचा उगम होतो. द्वेष आणि राग हे नकारात्मक मनोविकार आईबापांच्या सत्तेखाली वागणे, त्यांच्याबद्दल आदर दाखवणे अथवा त्यांचे सांस्कृतिक नेतृत्व स्वीकारणे ह्यांच्याशी जुळणारे नाहीत. आई व मुलगा ह्यांच्या संबंधात वैषयिक घटक येऊ शकत नाहीत; कारण कुटुंबातील व्यक्तींच्या नैसर्गिक कार्यविभागणीतील सुसंवाद त्यामुळे बिघडून जाईल. ह्या प्रश्नांचा विचार आपण पुढील प्रकरणात करू.

❧ ❧

## प्रकरण ९ वे

# मातृत्व आणि मात्रागमनाचा मोह

अगदी जवळच्या नात्यातील व्यक्तींमध्ये लैंगिक संबंध येण्यावर जो प्रतिबंध आहे त्याच्या उत्पत्तीची कारणे हा मानववंशशास्त्रात एक वादाचा आणि त्रासदायक प्रश्न झालेला आहे. ह्या प्रश्नाचा संबंध विवाहबाह्यता किंवा विवाहाचे प्राथमिक स्वरूप, तसेच समाजातील पूर्वीच्या संकरयुक्त विवाहपद्धतीशी जोडला जातो. जवळच्या नात्यातल्या व्यक्तीशी लैंगिक संबंध येण्यावर जो निर्बंध आहे त्याचा विवाहबाह्यतेशी खासच संबंध आहे; एवढेच नव्हे तर ती ह्या पद्धतीची एक बाजू आहे. ह्याला उदाहरण म्हणून जमातीतील टोळीचे देता येईल. कारण टोळीमधील नात्याचे शब्द कुटुंबातल्या नात्याशी जुळणारे आहेत. येथे आपण ह्या प्रश्नात जाण्याचे कारण नाही; कारण ह्या वेस्टरमार्क, लोवी इत्यादी तज्ज्ञांचेही तेच मत आहे.[1]

प्रथम एक गोष्ट स्पष्ट केली पाहिजे की, जीवशास्त्रज्ञांच्या मते अगदी जवळच्या नातेवाइकांत जरी लैंगिक संयोग झाला तरी त्यापासून कोणतेही दुष्परिणाम होत नाहीत.[2] नैसर्गिक परिस्थितीत जवळच्या नात्याच्या व्यक्तींत एकसारखा लैंगिक संयोग होत गेला तर त्याचे काही दुष्परिणाम होतील की काय हा प्रश्न केवळ तात्त्विक आहे. निसर्गात तरुण नर वयात आला की आईबाप–भावंडे ह्यांच्यापासून दूर जातो व माजावर आलेल्या कोणत्याही मादीबरोबर लैंगिक संयोग करतो. अर्थात येथे जवळच्या नात्याच्या प्राण्यात लैंगिक संबंध फारच क्वचित घडतो. म्हणजे प्राण्यांच्या बाबतीत जवळच्या नात्याच्या व्यक्तीतील लैंगिक संयोगापासून जीवशास्त्रदृष्ट्या किंवा अर्थातच नैतिक दृष्टयाही कोणताच दुष्परिणाम घडून येत नाही. शिवाय प्राण्यांच्या बाबतीत जवळच्या नात्याच्या व्यक्तीशी लैंगिक संयोग करण्याचा मोहही असत नाही.

म्हणजे प्राण्यांच्या बाबतीत जवळच्या नात्याच्या व्यक्तीतील लैंगिक संयोगाबद्दल काही विशेष आकर्षणही असत नाही. किंवा त्यापासून जीवशास्त्रदृष्ट्या काही तोटाही होत नाही. ह्याच्या उलट मानवाच्या बाबतीत सर्व प्रकारच्या समाजात जवळच्या नात्याच्या व्यक्तींतील लैंगिक संयोगावर अत्यंत कडक असे निर्बंध आणि निषेध असल्याचे दिसून येते. ह्या निर्बंधाचे कारण शोधताना आपल्याला कोणत्याही विशेष उपपत्तीचा आधार घेण्याची किंवा एकाच घरात राहाणाऱ्या व्यक्तींच्या लैंगिक संबंधा-संबंधी काही विशेष तिटकारा असतो अशा प्रकारची कल्पना गृहीत धरण्याची जरुरी नाही. ही कारणे म्हणजे संस्कृतीमुळे घडून येणाऱ्या दोन घटनांचा परिणाम असल्याचे

आढळते. पहिली घटना म्हणजे मानवी कुटुंब ज्या पध्दतीने एकत्र राहाते त्यात जवळच्या नात्याच्या व्यक्तीत लैंगिक संयोगाचा गंभीर मोह पडणे साहजीक असते. दुसरी घटना म्हणजे लैंगिक संयोगाच्या मोहामुळे कौटुंबिक स्वास्थ्याला विशिष्ट प्रकारचे धोके उत्पन्न होतात. ह्यात पहिल्या मुद्द्यावर आपल्याला फ्रॉइडचे मत मान्य केले पाहिजे व वेस्टरमार्कचे म्हणणे अमान्य केले पाहिजे, कारण त्याच्या मते मानवात जवळच्या नात्याच्या किंवा एकाच घरात राहाणाऱ्या व्यक्तीशी लैंगिक संयोग करण्याची प्रवृत्तीच मानवाच्या ठिकाणी नसते. पण संस्कृतीत जवळच्या नात्याच्या व्यक्तीशी लैंगिक संयोग करण्याचा मोह होतो ह्या परिस्थितीचा स्वीकार करताना आपण मनोविश्लेषण शास्त्रज्ञांची जी एक उपपत्ती आहे की, लहान मुलगा व आई ह्यांच्या घनिष्ट संबंधाचे मूळ लैंगिक आकर्षणात आहे ती उपपत्ती मात्र स्वीकारीत नाही.

लैंगिक उपपत्तीविषयी फ्रॉइडने जे तीन लेख लिहिले त्यांत त्याने हा सिध्दांत पुढे मांडला. त्याने असे सिध्द करण्याचा प्रयत्न केला की आई आणि मूल, विशेषतः ते अंगावरचे दूध पीत असताना त्यांचा संबंध मुख्यत्वे लैंगिकच असतो. ह्यावरून जे घडून येते ते असे की, मुलग्याला जे लैंगिक आकर्षण प्रथम भासते ते आईबद्दलच असते, व ते अर्थातच मानसिक मातागमनाच्या स्वरूपाचेच असते. हे "लैंगिक इच्छेचे दृढीकरण" (Fixation of Libido हा मनोविश्लेषण शास्त्रातील शब्दप्रयोग आहे) सर्व जन्मभर टिकते व त्यामुळे मातागमनाचा मोह एकसारखा दडपून टाकावा लागतो. त्यामुळे ईडिपस मनोगंडाच्या दोन भागापैकी एक भाग बनतो.

ही उपपत्ती स्वीकारणे अशक्य आहे. लहान मूल व त्याची आई ह्यांच्यामधील संबंध लैंगिक संबंधांहून अगदी निराळे असतात. उपजत प्रवृत्तींचा विचार फक्त आत्मनिरीक्षणाच्या आधारावर किंवा सुख आणि दुःख ह्या भावनांच्या आधारावर न करता त्यांच्या कार्यावरून केला पाहिजे. उपजत बुद्धी ही एक जन्मापासून असलेली यंत्रणा आहे व तिच्यामुळे एका विशिष्ट परिस्थितीत व्यक्ती एका विशिष्ट रीतीने वागते व आपल्या शारीरिक गरजा भागवते. अंगावर पिणारे मूल आणि आई ह्यांचा संबंध सर्वांच्या आधी अन्नग्रहणाच्या इच्छेवर अवलंबून असतो. त्याचप्रमाणे मूल आईला बिलगते ते त्याच्या शरीराला जी उबेची, संरक्षणाची व मार्गदर्शनाची गरज असते ती भागवण्याकरता. भोवतालच्या परिस्थितीला तोंड देण्याची शक्ती मुलाच्या अंगी नसते; आणि ज्या अर्थी त्याला आधार मिळू शकणारी व्यक्ती म्हणजे आईच त्याच्या जवळ असते तेव्हा ते साहजिकच तिचा आधार घेते. लैंगिक संबंधात शारिरिक आकर्षणाचे व एकमेकांना बिलगण्याचे जे उद्दिष्ट असते ते म्हणजे संयोग होऊन गर्भधारणा व्हावी. ह्या दोन प्रकारच्या जन्मजात प्रवृत्तींमध्ये— आई व मूल ह्यांच्यातील संबंध व लैंगिक संयोग ज्या प्रारंभिक व पूर्तता करणाऱ्या क्रिया असतात त्यांच्यात काहीसे साम्य असते. पण त्यांच्यातील भेद दाखवणारी रेषा अगदी स्पष्ट आहे; कारण एका प्रकारच्या कृतींनी, भावनांनी व प्रवृत्तींनी मुलाच्या अपरिपक्व शरिराची वाढ होऊन त्याला

अन्न, ऊब व संरक्षण मिळते; तर दुसऱ्या प्रकारच्या कृतींनी लैंगिक संयोगाला व नव्या जीवाच्या उत्पत्तीला मदत होते.

ह्या कारणांमुळे मात्रागमनाचा मोह मूल आणि आई ह्यांच्या लैंगिक संबंधातून उद्भवतो, अशा तऱ्हेचे साधेसुधे उत्तर आपल्याला स्वीकारता येत नाही. इंद्रियांच्या द्वारा होणारे सुख हे दोन्ही प्रकारच्या संबंधात असते व उपजत बुद्धीच्या आधारावर केलेल्या प्रत्येक यशस्वी क्रियेत त्याचे अस्तित्व दिसून येते. उपजत बुद्धीच्या निरनिराळ्या आविष्कारात सुखाच्या मापाचा उपयोग करता येणार नाही, कारण त्या सर्वांमध्ये ते असतेच. पण जरी प्रत्येक भावनात्मक भूमिकेच्या मागे वेगळी वेगळी उपजत बुद्धी असते असे आपण गृहीत धरतो, तरी त्या दोहोत एक घटक नेहमी आढळतो. नुसते उपजतबुद्धीमुळे सुख होते हा सामान्य सिद्धांत आपण येथे पुढे मांडतो असे नव्हे तर शरीरस्पर्शाने विशेष प्रकारचा आनंद होतो हे लक्षात घेतले पाहिजे. आईच्या शरीराबद्दल मुलाला जी आकर्षणाची प्रेरणा होते तिच्यामुळेच ते आईला बिलगते. आपल्या व तिच्या त्वचेचा शक्य तेवढा जास्त भाग परस्पर स्पर्श करील अशी त्याची खटपट असते, व विशेषतः आईच्या स्तनाग्रांना आपल्या ओठांचा स्पर्श करण्यात त्याला विशेष आनंद वाटतो. लैंगिक प्रेरणेने केलेल्या प्राथमिक तयारीच्या हालचाली आणि मुलाच्या मनातील प्रेरणेमुळे त्याने केलेल्या क्रिया ह्यांत जे साम्य आढळते ते लक्षणीय आहे. ह्या दोहोतील फरक त्यांच्या कार्यक्षमतेवरून व त्यांच्या पूर्ततेकरता केलेल्या कृतींवरून ठरवला पाहिजे.

हे जे काही बाबतींत साम्य आहे त्याचा परिणाम काय होतो? मनोविश्लेषणशास्त्राच्या एका तत्त्वाचा आपण येथे विचार केला पाहिजे. हे तत्त्व आता मानसशास्त्रात सर्वमान्य झाले आहे. ते असे की, व्यक्तीच्या पुढच्या आयुष्यात असा एकही अनुभव येत नाही की त्याने बालपणीच्या काही आठवणी जागृत होत नाहीत. तसेच आपल्याला शँडच्या भावनांविषयीच्या उपपत्तीवरून हेही कळते की, मानवाच्या भावनाविषयक भूमिकेमध्ये हळूहळू मनोविकारांचे संघटन होत असते. ह्याला आपण अशी पुस्ती जोडली की, मनोविकारांच्या आठवणींचे अखंडत्व आणि एका भूमिकेवरून हळूहळू दुसऱ्या भूमिकेचा उगम ह्यांतूनच सामाजिक बंधनांचे मुख्य तत्त्व दिसून येते.

जर आपण प्रेमी जनांच्या लैंगिक भूमिकेला हे तत्त्व लावले तर आपल्याला दिसून येईल की, लैंगिक संयोगात दोन शरीरांचा जो निकट संबंध येतो त्याचा आई आणि मुलगा ह्यांच्या संबंधावर पाठीमागून विपरित परिणाम होत असला पाहिजे. प्रेमी जन एकमेकांचे लाड करताना जी माध्यमे व ज्या पद्धती उपयोगात आणतात— उदाहरणार्थ, त्वचास्पर्श, आलिंगन, कुरवाळणे आणि शक्य तितके एकमेकांच्या जवळ जाणे— त्यांच्यामुळे इंद्रियविषयक सुखही एकाच प्रकारचे ( आई व मुलगा ह्यांच्या बाबतीततल्या-सारखेच ) मिळते. ह्याचा अर्थ असा की, जेव्हा ही प्रेरणा मनात उत्पन्न होते तेव्हा बालपणातील तशाच प्रकारच्या अनुभवाच्या आठवणी जाग्या होतात. मग ह्या

आठवणी एका विशिष्ट वस्तूशी ( व्यक्तीशी ) संलग्न असतात व ती वस्तू सर्व जन्मभर त्या मनुष्याच्या मनात अगदी पुढच्या ठिकाणी राहते. ही वस्तू ( व्यक्ती ) म्हणजे त्याची आई. व्यक्तीच्या लैंगिक जीवनात मन त्रस्त करणाऱ्या आठवणी उत्पन्न होतात आणि त्या आदर, आज्ञाधारकपणा, व सांस्कृतिक परावलंबन ह्यांच्याशी विरोध करणाऱ्या असतात एवढेच नव्हे तर वयात येणाऱ्या मुलाने त्या बालपणात वाटणाऱ्या आकर्षणाला पूर्णपणे दडपून टाकलेल्या असतात. वयात आल्यानंतर मनात येणारे लैंगिक विचार लैंगिक भूमिका बालपणातील आठवणींशी मिसळतात. गोंधळ उत्पन्न होतो आणि आईच्या भोवती संघटित विचारांचे चे एक वलय पूर्वी निर्माण झालेले असते त्याचा नाश होण्याचा धोका उत्पन्न होतो. सांस्कृतिक शिक्षणाकरता मनाची ही भूमिका कमी कमी वैषयिक झालेली आहे, मानसिक आणि नैतिक परावलंबित्व इतर व्यवहारी गोष्टींत आलेले असते व समाजाच्या विचारसरणीमुळे आई ही घरातील मुख्य व्यक्ती आहे ही खात्री पटलेली असते. आपण ह्या ग्रंथाच्या मागील काही प्रकरणांत पाहिलेच आहे की, तरुण मुलाच्या ह्या अवस्थेत त्याचे आणि त्याच्या आईचे संबंध कसे ढगाळलेले असतात, आणि मनातील भावनांचे नीट संघटन होणे कसे जरूर असते. ह्याच अवस्थेत व्यक्तीच्या मनात जोरदार प्रतिकार उत्पन्न होतात, आई-बद्दल मनात उत्पन्न झालेल्या वैषयिक भावना दडपून टाकल्या जातात आणि सुप्त मनात मात्रागमनाचा मोह बालपणच्या आठवणी आणि नवे अनुभव ह्यांच्या मिश्रणामुळे तयार होतो.

वर जो अर्थ सांगितला त्यात व मनोविश्लेषणशास्त्रज्ञाच्या अर्थात फरक आहे तो असा की, फ्रॉइडच्या मते अगदी बालवयापासून आईबद्दलची भूमिका अखेर-पर्यंत कायम राहते. आपल्या विचारसरणीत आपण असे दाखवण्याचा प्रयत्न करतो की, बालवयातील मनोभूमिका व नंतरची भूमिका ह्यात काही थोड्या गोष्टींतच एकरूपता आहे व ती मुख्यतः मनोविकारांच्या उद्भवामुळेच दिसून येते. ह्यामुळेच इतर प्राण्यांत अशा प्रकारचा मोह दिसून येत नाही पण मनुष्यात नवीन मनो-विकारांचे मागच्या कालातील घटनांवर जे प्रभुत्व दिसते ते मात्रागमनाच्या मोहाचे कारण असते.

आता आपल्यापुढे असा प्रश्न येतो की, मात्रागमन हे प्राण्यांच्या बाबतीत जर धोकेबाज ठरत नाही तर मनुष्याच्या बाबतीत ते अनिष्ट का व्हावे ? आपण पूर्वी पाहिलेच आहे की, माणसाच्या बाबतीत भावनांचा विकास होऊन त्यांपासून विशिष्ट मनोभूमिका तयार होणे हे सामाजिक संबंध व सांस्कृतिक प्रगती ह्यांच्या मुळाशी असते. श्री. शँड ह्यानी असे निश्चित सिद्ध केले आहे की, ह्या सर्व पद्धती विशिष्ट नियमांप्रमाणे कार्यक्षम होतात. एक तर त्या एकमेकांशी मिळत्याजुळत्या असल्या पाहिजेत, म्हणजे मनातील भावना एकमेकांशी जुळतील अशा रीतीने संघटित व्हावयास पाहिजेत; आणि अशा रीतीने संघटित झालेल्या मनोभूमिकांत आपसांत

सहकार्य व मिश्रणाचे अखंडत्व प्रस्थापित व्हावयास पाहिजे. कुटुंबात आई व मूल ह्यांच्यामधील भावनात्मक संबंध जेव्हा अगदी सुरुवातीस स्पष्ट होतो तेव्हा त्या दोघांच्यात एक नैसर्गिक आकर्षण असते व ते काही प्रमाणात इंद्रियविषयक असते. नंतर मात्र ही भूमिका बदलणे अवश्य असते. आईचे कार्य म्हणजे मुलाला शिक्षण देणे, योग्य मार्गदर्शन करणे सांस्कृतिक बाबतीत दिशा दाखवणे, व घरात योग्य अधिकाराचा वापर करणे हे असते. जसजसा मुलगा वयाने मोठा होत जाईल तसतशी त्याची प्रतिक्रिया आज्ञाधारकपणा व आदर ह्यांच्यावर आधारलेली असली पाहिजे. मूल अंगावर पिण्याचे सुटल्यापासून वयात येईपर्यंतचा जो दीर्घ काल जातो त्यात पूज्य बुद्धी, अवलंबन, आदर, आणि अतीव असा जिव्हाळा हीच मुलाची आईबद्दलची भूमिका असावयास पाहिजे. ह्याच वेळी मुलाचे एक प्रकारचे बंधविमोचन होऊन शारिरिक संपर्कापासून तो मुक्त होण्याची प्रक्रिया पूर्ण व्हावयास पाहिजे. ह्या अवस्थेत कुटुंब हे एक सांस्कृतिक केंद्र बनते व त्यात जीवशास्त्रविषयक बाबी येत नाहीत. बाप आणि मुलाला स्वतंत्रपणे राहण्याचे व सांस्कृतिक परिपक्वतेचे शिक्षण देत असतात. त्यांचे शरीरक्रियाशास्त्रविषयक कार्य ह्या आधीच संपलेले असते.

वर वर्णन केलेल्या परिस्थितीत मुलाच्या मनात जर मात्रागमनाचा मोह उत्पन्न झाला तर ती एक नाशकारी घटना ठरेल. आईकडे वैषयिक किंवा लैंगिक विचारांनी आकर्षित होणे ह्यामुळे कुटुंबात जी परिस्थिती मोठ्या परिश्रमाने रचली तिचा नाश होण्याची शक्यता असते. तिच्याशी लैंगिक संयोग होण्यामुळे, सर्व लैंगिक संयोगापूर्वी जे प्रियाराधन जरूर असते त्यामुळे, आज्ञाधारकपणा, आदर व स्वातंत्र्य ह्या भूमिकांशी ही वागणूक पूर्णपणे विसंगत होईल. शिवाय घरात आई काही एकटीच नसते. तिचा दुसऱ्या एका पुरुषाशी विवाह झालेला असतो. वैषयिक मोहामुळे मुलगा व आई ह्यांच्यातील संबंध तर पूर्णपणे बिघडतीलच, पण अप्रत्यक्षपणे मुलगा आणि बाप ह्यांचे संबंधही बिघडतील. त्या दोघांमध्ये जर सक्रिय व विरोधी स्पर्धा सुरू झाली तर त्यांच्यातील सुसंवादी नाते नाहीसे होईल व मुलाने बापाच्या मार्गदर्शनाखाली त्याच्यावर पूर्णपणे अवलंबून राहाण्याची नैसर्गिक परिस्थितीही नाहीशी होईल. म्हणून आपण जर मनोविश्लेषणशास्त्रज्ञांचे मत स्वीकारले व मात्रागमनाचा मोह ही एक सर्वत्र आढळणारी घटना आहे असे समजलो तर आपल्याला दिसून येईल की, ह्याचे धोके नुसते मानसिक नाहीत, व ते फ्रॉइडच्या प्राक्कालीन गुन्ह्याच्या उपपत्तीनेही स्पष्ट होणार नाहीत. मात्रागमनाला मनाई केलीच पाहिजे. कारण आपले कुटुंबाबद्दलचे विश्लेषण आणि संस्कृतीच्या विकासातील कुटुंबाचे स्थान ही जर बरोबर असतील तर हे उघड होईल की, मात्रागमन हे संस्कृतीच्या पायाभूत कल्पनेशीच विसंगत आहे. जर कोणत्याही चालीरीती, कायदा आणि नीतितत्त्वे ह्यांनी अगदी जवळच्या नात्याच्या व्यक्तींमधील लैंगिक संयोगाला मान्यता दिली तर कुटुंब अस्तित्वातच राहणार नाही. कुटुंबातील व्यक्ती वयात आल्याबरोबर आपल्याला कुटुंब मोडून गेलेले दिसेल, सर्वत्र

सामाजिक गोंधळ माजेल आणि सांस्कृतिक परंपरा चालू ठेवणे अशक्य होईल. जवळच्या नातेवाइकांमधील लैंगिक संबंधांनी वयामधील भेद उलटेपालटे होतील, वरच्या व खालच्या पिढ्यांची एकमेकात सरमिसळ होईल, भावना विस्कळित होतील आणि ज्या कालखंडात कुटुंब हे शिक्षणाचे सर्वात महत्त्वाचे माध्यम असावयाचे त्याच वेळी त्यातील व्यक्तींच्या भूमिका भीषण रीतीने बदलतील. अशा परिस्थितीत कोणताही समाज टिकून राहू शकणार नाही. ह्याच्या उलट ज्या समाजात जवळच्या नात्यातील व्यक्तींच्या संबंधाला मनाई आहे तेथेच फक्त समाज संघटित होऊ शकेल व संस्कृती अस्तित्वात येऊ शकेल.

आम्ही ज्या प्रकारचे स्पष्टीकरण वर दिले आहे ते ॲटकिन्सन व लँग ह्यांच्या मताशी जुळणारे आहे व त्यांच्या मताप्रमाणे मात्रागमनाला मनाई असणे हा प्राक्कालीन नियम असला पाहिजे असे ते मानतात. अर्थात त्यांची उत्पत्ती व आमची विचारसरणी ह्यात एकवाक्यता नाही. त्याचप्रमाणे फ्रॉइडशीही आमचा मतभेद आहे; कारण त्याचे मत की, मात्रागमन हे बालकाच्या जन्मजात प्रवृत्तीमुळेच घडून येते. आम्हाला हे मान्य नाही. तसेच वेस्टमार्के ह्यांच्याशीही आमचा मतभेद आहे. कारण मात्रागमनाला विरोध ही एक नैसर्गिक भावना आहे. एकाच घरात लहानपणापासून राहणाऱ्या व्यक्तीमध्ये लैंगिक संयोग न होण्याची सहज प्रवृत्ती असते हे म्हणणे बरोबर नाही. ती एक गुंतागुंतीची सांस्कृतिक प्रतिक्रिया आहे. मात्रागमनावरील निर्बंध ही एक जन्मजात प्रवृत्तीमुळे उद्भवलेली प्रक्रिया आहे असे आपण दाखवून दिले आहे, व ते निर्बंध समाजाचे संघटन व संस्कृती ह्यांच्याशी समांतर राहिले पाहिजेत हे स्पष्ट केले आहे. मात्रागमन हा एक प्रमाण-वागणुकीचा नमुना म्हणून कोणत्याही समाजात अस्तित्वात असणे शक्य नाही. कारण तो कौटुंबिक जीवनाशी अगदी पूर्णपणे विसंगत आहे आणि तो त्याचा पायाच उखडून टाकील. सामाजिक संबंधाचा मूलभूत नमुना म्हणजे मुलाचे आई व बाप ह्यांच्याशी प्रमाण-संबंध नाश पावतील. ह्या सर्व भावनांच्या रचनेतून लैंगिक मनोविकार पूर्णपणे काढून टाकले पाहिजेत. ह्या मनोविकारांचे नियंत्रण करणे अतिशय अवघड आहे आणि इतर मनोविकारांशी ते सुसंगत नाहीत. म्हणजे मात्रागमनाबद्दलचा मोह संस्कृतीतूनच उत्पन्न झालेला आहे. कायमच्या संघटित भूमिकांच्या स्थापनेच्या आवश्यकतेतून तो उद्भवलेला आहे. म्हणजे एका अर्थाने मानवाचे ते मूळचे पाप आहे. ह्या पापाची भरपाई सर्व मानवी समाजात एका अति महत्त्वाच्या व सर्वव्यापी अशा नियमाने केली आहे. तरीही मनोविश्लेषणाने आपल्याला दाखवून दिले आहे की मात्रागमनावरील निषेध मानवाच्या मनात जन्मभर घुटमळत असतो.

# प्रकरण १० वे

# सत्ता आणि भावना दडपून टाकणे

मागील प्रकरणात आपण मुख्यत्वे आई आणि मुलगा ह्यांच्या संबंधांचा विचार केला. आता येथे बाप आणि मुलगा ह्यांच्यासंबंधी आपण विचार करू. ह्या विवेचनात मुलीबद्दल फारसा विचार केला जाणार नाही. एका बाजूला नवव्या प्रकरणातील विवेचनात बाप व मुलगी ह्यांमधील लैंगिक आकर्षणाला फारसे महत्त्व नाही, व आई आणि मुलगी ह्यांच्यातील मतभेदही लक्षात घेण्यासारखे नाहीत हे स्पष्ट झालेले आहे. काही झाले तरी आई आणि मुलगा व बाप आणि मुलगा ह्यांच्याबद्दल जे उद्गार काढले आहेत ते काही थोडा फरक करून व कमी प्रमाणात दुसऱ्या प्रकारच्या नात्यांनाही लागू पडतील. फ्रॉइडच्या ईडिपस शोकांतिकेतील पात्रांचा एकमेकांशी संबंध बरोबर दाखविलेला आहे व मानववंशशास्त्राच्या दृष्टीने मुलग्याचे दोन्ही पितरांच्या संबंधात योग्य प्रकारे वर्णन केलेले आहे. फ्रॉइडने ईडिपसच्या बरोबर इलेक्ट्राचा उल्लेखही केलेला नाही, व ह्या त्याच्या वगळण्याच्या क्रियेला आपण दुजोराच दिला पाहिजे.

पूर्वी आपण बाप आणि मुलगा ह्यांच्या संबंधाचे विवेचन करताना असे स्पष्ट म्हटले आहे की, हे उपजत बुद्धीवर आधारलेले आहे. जसे प्राण्यांच्या कुटुंबात एक नर असणे अवश्य असते तीच परिस्थिती मनुष्यांच्या कुटुंबात असते व तेथेही एका पुरुषाची जरुरी असते. सर्व मानवी समाजांत ही जीवशास्त्रविषयक गरज कायदेशीर पितृत्वाच्या स्वरूपात अमलात आणली जाते व त्यामुळे कुटुंबाला एक पुरुष पालक, संरक्षक आणि कारभारी मिळतो.

प्राण्यांच्या कुटुंबातील बापाची भूमिका एक सत्तास्थान म्हणून समजण्यात काही अर्थ नाही. तो कधी एक जुलमी सत्ताधारी बनेल हे शक्य दिसत नाही. कारण जोपर्यंत त्याच्या अपत्यांना त्याची गरज भासते तोपर्यंत त्याच्या अंगी नैसर्गिक सहनशीलता व प्रेमळपणा असतात असे दिसते. जेव्हा अपत्यांना त्याची गरज भासेनाशी होते तेव्हा ती त्याला सोडून निघून जातात.

संस्कृतीच्या परिस्थितीत बापाची सत्ता आवश्यक असते; कारण मुले थोडी मोठी झाल्यावर, जेव्हा सांस्कृतिक शिक्षणाकरता आईबाप व मुले एकत्र राहणे आवश्यक असते, तेव्हा कुटुंबात योग्य व्यवस्था राहण्याकरता कोणत्या तरी सत्तास्थानाची जरुरी असते — अर्थात् केवळ कुटुंबातच नव्हे तर कोणत्याही मानवसमूहात ही गोष्ट

असावी लागते. जे गट जीवशास्त्रान्वये नव्हे तर सांस्कृतिक गरजांमुळे बनलेले असतात अशा इतर प्रकारच्या मानवी गटांत उपजत बुद्धीमुळे घडून येणाऱ्या सुव्यवस्थेचा अभाव असतो; आणि बेबनाव आणि अडचणी निर्माण होतात व त्यांना कोणत्या तरी कायदेशीर अनुज्ञेचा व शक्तीचा आधार लागतो.

जरी पित्याला किंवा दुसऱ्या एखाद्या पुरुषाला पुढच्या अवस्थांत सत्ता स्वीकारावी लागते, तरी प्रारंभीच्या अवस्थेत त्याची भूमिका अगदी निराळी असते. जसे प्राण्यांमध्ये कुटुंबाच्या प्राथमिक अवस्थेत नर गर्भवती व दूध पाजणाऱ्या मादीचे संरक्षण करतो त्याचप्रमाणे मनुष्यांच्या कुटुंबाच्या प्राथमिक अवस्थेतही पिता हा पालक बालकांची काळजी घेणाऱ्या दाईचे काम करतो; व सत्ता गाजवणाऱ्या पुरुषाची त्याची भूमिका नसते. जेव्हा तो पत्नीच्या गर्भविषयक निर्बंधांत सहभागी होतो, तिच्या कल्याणाविषयी काळजी घेतो, एवढेच काय, जेव्हा पत्नीच्या गर्भारपणात तो आपणही बाजूला बसतो, जेव्हा तो मुलांना जेवूखाऊ घालतो, तेव्हा त्याची शारिरिक शक्ती, नैतिक सत्ता, त्याचा धार्मिक दृष्ट्या वरचा दर्जा, व त्याचे कायदेशीर हक्क ह्यांपैकी काहीच व्यवहारात दिसून येत नाहीत. प्रथम म्हणजे ह्या ज्या वर दिलेल्या गोष्टी तो करतो त्या त्याचे कर्तव्य म्हणून समजल्या जातात. त्यांचा त्याच्या विशेष हक्कांशी काही संबंध नसतो. वरीलपैकी पुष्कळशा व्यक्तिगत बाबतीत त्याला स्त्रीचीच भूमिका करावी लागते—पुष्कळदा त्यात त्याची थोडी मानहानीसुद्धा होत असावी—किंवा कित्येक वेळी त्याला तिला तिच्या कामात मदत करावी लागते. तरीही त्याला अनेकदा सामाजिक बहिष्काराला तोंड द्यावे लागते व तो उपहासाचा व अपमानाचा विषय होतो; समाजही त्याच्याकडे या दृष्टीने बघतो व त्याची बायको जीवनातील सर्व महत्त्वाची कार्ये पार पाडते. आपण पूर्वी ह्या गोष्टीवर जोर दिलाच आहे की ह्या सगळ्या परिस्थितीत बाप नम्रपणे व स्वेच्छेने वागत असतो, त्याला आपली कामे करण्यात आनंद वाटत असतो, आपल्या पत्नीच्या कल्याणाकरता तो झटत असतो आणि लहान अपत्याबद्दल त्याच्या मनात अभिमान व प्रेम असते.

संस्कृतीने मनुष्याला ज्या चालीरीती, कल्पना व समाजातील वागणुकीचे नमुने दिले त्या सर्वांचा संबंध त्यांचा कुटुंबाला उपयोग व्हावा व त्या काळच्या मानवजातीचा त्यांपासून फायदा व्हावा ह्याच्याशी होता. बापाने प्रेमळ, दयाळू व कळकळीने वागणारा व्हावे, त्याने आपल्या पत्नीच्या संघटित कार्यामध्ये दुय्यम भूमिका घ्यावी अशी अपेक्षा केली जाते, कारण ह्या काळात त्याचे संरक्षण, त्याचे प्रेम, त्याच्या मायाळू भावना ह्या सर्वांमुळे तो आपली पत्नी व मुले ह्यांचा कार्यक्षम पालक बनतो. म्हणजे इथे सांस्कृतिक वागणुकीचा उद्देश प्राण्यांच्या उपजत बुद्धीने होणाऱ्या वागणुकीच्या उद्देशाशी जुळणारा असतो. तो उद्देश म्हणजे कुटुंबातील नराने किंवा पुरुषाने आपल्या गर्भवती पत्नीचे व अपत्यांचे प्रेमळपणे संरक्षण करावे. अर्थातच मानवी समाजात पुरुषांची ही प्रवृत्ती किती तरी अधिक काळपर्यंत टिकून

राहावी लागते— अपत्ये वयात आल्यानंतर कित्येक वर्षेपर्यंत— आणि शिवाय प्रारंभीच्या कालात पुरुषाला अपत्यांच्या काळजीचा किती तरी अधिक भार उचलावा लागतो. आणि इथेच प्राण्यांचे कुटुंब व मानवाचे कुटुंब ह्यांतला मुख्य फरक स्पष्ट होतो. प्राण्यांचे कुटुंब अपत्यांची आईबापांनी घेण्याची काळजी अनावश्यक झाली की संपुष्टात येते, पण मानवाचे कुटुंब मात्र दीर्घकालपर्यंत टिकून राहावे लागते. ह्या कालानंतर संस्कृतीमधील मानवी कुटुंबात अपत्यांच्या शिक्षणास सुरुवात होते व त्यात आईबापांचा मायाळूपणा, प्रेम व काळजी ह्या गोष्टी पुरत्या पडत नाहीत. संस्कृतिक प्रशिक्षण म्हणजे केवळ जन्मजात प्रवृत्तींचा विकास नव्हे. कला आणि ज्ञान ह्यांच्याविषयीच्या शिक्षणाव्यतिरिक्त ह्या शिक्षणाने भावनात्मक भूमिका, समाजातील चालीरीतींचे ज्ञान, आणि नीतितत्त्वांचा विकास ह्या सर्व गोष्टी साध्य केल्या जातात. आणि ह्या सर्वांत आपल्याला एक मूलतत्त्व आढळते आणि ते आधीच मूल आणि आई ह्यांच्या संबंधात आपण पाहिलेले आहे, आणि ते म्हणजे निर्बंध, दडपण, व नकारात्मक आज्ञा हे आहे. तसे पाहिले तर शिक्षण म्हणजे गुंतागुंतीच्या व कृत्रिम सवईच्या प्रतिक्रियेतच समाविष्ट असते व त्यांतून भावना संघटित होऊन त्यांतून मनोविकारांची भूमिका बनत असते.

आपल्याला कळून चुकले की, वाढ होणाऱ्या मुलाच्या मनावर जे नीतितत्त्वांचे दडपण असते व समाजातील सार्वजनिक मताचा व नीतिविषयक विचारांचा त्यांच्यावर जो परिणाम होत असतो त्याचा त्याच्या मनावर दाब पडत असतो. विशेष म्हणजे मुलाच्या मनावर ज्या गोष्टींचा परिणाम घडत असतो त्यात मूळच्या जमातीच्या जीवनातील भौतिक मूलतत्त्वांची चौकट ही प्रमुख असते, त्यांच्यातच ते मूल वाढत असते व त्याच्या मनातील निरनिराळ्या भूमिकांचे नमुने तयार होत असतात. पण ह्या सर्व घडामोडींना परिणामकारक अशा सत्तेची पार्श्वभूमी असावी लागते. आणि ह्यामध्येच मुलाला सामाजिक जीवनातील स्त्रियांची बाजू व पुरुषांची बाजू ह्यांतील फरक कळू लागतो. ज्या स्त्रिया त्याची काळजी घेतात त्या त्याला अधिक जवळच्या व माहीत असलेल्या वाटतात; व केव्हाही जरूर लागेल तेव्हा त्याला माया, मदत, सहारा व सांत्वन ह्यांकरता त्यांच्याकडे आश्रयार्थ जाता येते. ह्याच्या उलट पुरुषाची भूमिका जास्तजास्त सत्तेची, दूर अंतरावरची, महत्त्वाकांक्षेच्या मागे लागलेली व अधिकार गाजवणारी अशी वाटते. अर्थात हा फरक बालपणातील प्राथमिक अवस्थेनंतरच मुलाच्या मनात आकार घेऊ लागतो; कारण त्याच्या आधी आई व बाप ह्यांच्या भूमिका सारख्याच असतात. त्यानंतर मात्र जरी आई आणि बाप ह्या दोघांनाही मुलाला शिक्षण देऊन तयार करावे लागते तरीही आई पूर्वीची मायाळूपणाची भूमिका पुढेही चालू ठेवते व बापाला कुटुंबात अगदी थोडी का होईना पण सत्ता धारण करावीच लागते.

तरी पण एका विशिष्ट वयाला मुलगा कुटुंबापासून वेगळा होऊन बाहेरच्या

जगात उतरतो. ज्या समाजात दीक्षासमारंभाची प्रथा असते तेथे ही घटना एका विशिष्ट व तपशीलवार पद्धतीने केली जाते. त्यात समाजाच्या ह्या नव्या सभासदाला कायदा व नीतितत्त्वे समजावून दिली जातात, समाजातील सत्तेचा अर्थ सांगितला जातो, जमातीच्या पद्धतीविषयी माहिती सांगितली जाते व पुष्कळदा शारीरिक कसोट्या व उपासमारीने त्याच्या मनामध्ये ह्या सर्व गोष्टी ठसविल्या जातात. समाजशास्त्रीय दृष्टिकोनातून दीक्षासमारंभ म्हणजे तरुणाला कुटुंबाच्या पंखाखालून काढून समाजाच्या सत्तेखाली आणण्याची प्रक्रिया असते. ज्या समाजात दीक्षासमारंभ नसतो तेथेही ही प्रक्रिया हळूहळू आणि विखुरलेल्या स्वरूपात होते; पण मूलतः तिचे स्वरूप तेच असते. मुलाला घर सोडून बाहेर जाण्यास उत्तेजन दिले जाते किंवा निदान कुटुंबाच्या दबावाखालून स्वतंत्र होण्याकडे त्याचा कल व्हावा असा प्रयत्न होतो. त्याला जमातीची परंपरा माहीत करून दिली जाते, व पुरुषांच्या सत्तेखाली त्याने वागावे असे त्याच्या मनावर बिंबवले जाते.

पण ही पुरुषांची सत्ता म्हणजे बापाचीच असेल असे मात्र नाही. ह्या ग्रंथाच्या पूर्वीच्या भागात मुलगा बापाच्या सत्तेला मान देऊन कसा वागतो व त्याचा अर्थ काय हे दाखवले आहे. हाच मुद्दा आता प्रस्तुत विवेचनाच्या संदर्भात निराळ्या शब्दात दाखवता येईल. ज्या समाजात कुटुंबातील सत्ता मामाच्या हातात केंद्रित झालेली असते तेथे बाप मुलांचा सहकारी व मित्र राहू शकतो. बाप व मुलगा ह्यांच्यातील भावना सहज व प्रत्यक्षपणे विकसित होऊ शकते. अगदी बालपणात मुलाच्या मनात बापाविषयी जी आपुलकीची व प्रेमाची भावना असते ती मुलाचे वय वाढत जाते तसतशी हळूहळू व एकसारखी वाढत जाते. मुलगा लहान असताना बाप जी भूमिका करतो ती नंतरच्या जीवनातील भूमिकेहून फारशी वेगळी नसते. सत्ता, जमातीबद्दलची महत्त्वाकांक्षा, दबाव आणणाऱ्या गोष्टी व जुलमी उपाय ही सर्व दुसऱ्याच व्यक्तीसंबंधींच्या भावनांशी संलग्न होतात; म्हणजे मामाबद्दलच्या, आणि त्यांचा पाया अगदी वेगळ्या प्रकारचा असतो. मानसशास्त्रातील ज्या पद्धतीने मनातील भावना आकार घेतात, आणि इथे मला शँडच्या उपपत्तीचा संदर्भ दिला पाहिजे, त्यावरून उघड होईल की, अशा रीतीने मनात दोन निरनिराळ्या भावना अस्तित्वात येणे व त्यापैकी प्रत्येक आपापल्या परीने आतल्याआत मिलाफ घडणारी असणे हे बापाच्या सत्तेखाली वागण्यापेक्षा किती तरी अधीक सोपे असते.

बापाच्या सत्तेखाली वागताना दोन मूलभूत गोष्टींचा संबंध येतो आणि त्या दोन्हींमुळे मुलाच्या मनातील भावनांना योग्य स्वरूप प्राप्त होणे कटीण भासते. जेथे आनुवंशिकता बापाकडून ठरवली जाते व जेथे बापाच्या हातात सर्व सत्ता असते तेथे बापाला सर्वश्रेष्ठ अधिकारी व अखेरचा निकाल देणारी व्यक्ती ही भूमिका बजावावीच लागते. मायाळू संरक्षकाची भूमिका हळूहळू टाकून देऊन त्याला कडक शिस्तीचा न्यायाधीश आणि कायदे पाळण्यास भाग पाडणारा अधिकारी ही भूमिका घ्यावी

लागते. ह्या बदलामुळे बापाच्या भावनात्मक भूमिकेत खूपच फरक पडतो. त्याची तुलना करायचीच झाली तर तरुण मुलाच्या आईबद्दलच्या भूमिकेत जो बदल होतो— आदर व वैषयिक आकर्षण— त्याच्याशीच करावी लागेल. ह्या मुद्द्यावर येथे विशेष भर देण्याचे कारण नाही. बापाच्या भूमिकेत विश्वासाच्या ठिकाणी दडपशाही, मायेच्या ठिकाणी सत्ता, आणि मैत्रीच्या ठिकाणी नियंत्रण ह्या बदलाविषयी आपण पूर्वी बरेच विवेचन केले आहे. ह्यात आणखीही एका बाजूचा विचार आपण पूर्वी केला आहे, आणि तो बापाच्या सत्तेशी नेहेमी निगडित असतो— जरी त्यात बाप प्रत्यक्ष अधिकार गाजवीत नसला तरी— आणि तो म्हणजे अखेरीस बापाची सर्व संपत्ती व सत्ता मुलाच्याच हातात यावयाची असते. जरी बापाची सत्ता मर्यादित असली तरी तो मागील पिढीतला मुख्य पुरुष असतो; आणि कायदा, जमातीतील कर्तव्ये व निषेध आणि निर्बंध ह्यांचे तो प्रतिनिधित्व करतो व जुलमाचे, नीतीचे व सामाजिक शक्तींच्या मर्यादेचे तो प्रतीक असतो. इथेसुद्धा बाप व मुलगा ह्यांच्यातील मूळचे मायेचे व परिणामकारक प्रतिक्रियेचे नाते बदलून सत्ता व दडपण ह्यांची भूमिका स्वीकारणे सोपे नसते. हे सर्व आता आपल्याला माहीत झाले आहे.

येथे मात्र आपल्याला माहीत झालेल्या घटना आपल्या प्रस्तुत विवेचनात समजावून घेतल्या पाहिजेत. मानवी कुटुंबाच्या विकासात बाप व अपत्य ह्यांच्यामधील संबंध जन्मजात प्रवृत्तींवर न आधारता व वयात आलेली अपत्ये कुटुंब सोडून जातात ह्या घटनेवर न आधारता, विशिष्ट भावनांवर अवलंबून ठेवले पाहिजेत. ह्या भावनांचा पाया म्हणजे जीवशास्त्राने निश्चित केलेली आईबापांची माया हा असतो; पण पुढे त्याच पायावर कडक शिस्त, करारीपणा व जुलमी दडपण ह्यांची उभारणी करावी लागते. बापाला काही गोष्टी करवून घ्याव्या लागतात, आपण सत्तेचे व शिस्तीचे उगमस्थान आहो असे दाखवावे लागते, आणि कुटुंबात तो सांगेल तोच कायदा ठरतो. आणि तोच जमातीचे नियम अमलात आणतो. बापाच्या अधिकारामुळे बालपणातील लाड करणाऱ्या प्रेमळ पालकाची जागा एक शक्तिमान व भीतिदायक असा अनियंत्रित सत्ताधारी घेतो. ज्या भावनांमध्ये अशा तऱ्हेचे विरोधी मनोविकार अंतर्भूत झालेले असतात त्यांची घटना फार कठीण असणार हे उघडच आहे. पण ही विरोधी मूलतत्त्वांची एकत्र बांधणी मानवी संस्कृतीला अत्यावश्यक आहे. कारण प्राथमिक अवस्थेत बाप हा जीवशास्त्रदृष्ट्या कुटुंबाला अत्यावश्यक असा घटक असतो व त्याचे कार्य अपत्यांचे संरक्षण करणे हे असते. त्याच्या अंगचा मायाळूपणा हे भांडवल उपयोगात आणून कुटुंब त्याला आपल्यात आकर्षित करून गुंतवून ठेवू शकते. पण इथेसुद्धा बापाच्या भावनांचा संस्कृती उपयोग करून घेते व कुटुंबातील वयाने सर्वांत मोठा पुरुष ह्या नात्याने त्याच्याकडे निराळीच कर्तव्ये सोपवते. कारण मुले, विशेषतः मुलगे जसजसे मोठे होत जातात तसतसे त्यांचे शिक्षण, कुटुंबाची एकी व त्यातील व्यक्तींचे एकमेकांशी सहकार्य ही घडवून आणण्याकरता आणि कुटुंबाबाहेर जमातीचे कायदे

पाळले जातात हे पाहण्याकरता एका अधिकारी व्यक्तीचे अस्तित्व आवश्यक असते. केवळ पुरुषांतील हेव्यामुळे वयस्कर माणसाच्या संतापी स्वभावामुळे व लैंगिक मत्सरामुळे बापाची स्थिती अवघड बनते, हे बहुतेक मनोविश्लेषण शास्त्रज्ञांना असे वाटले तरी, खरे नाही. मानवी कुटुंबाच्या सखोल आणि आवश्यक अशा वैशिष्ट्यांमुळे त्याला दोन कार्ये सिद्धीस न्यावयाची असतात : मानवजात टिकून राहावी याकरता प्रजोत्पादन आणि संस्कृतीच्या अखंडत्वाचे पालन. बापाकडे ज्या दोन भूमिका येतात, एक संरक्षणकर्ता व दुसरी आज्ञापालन करवून घेणारा, त्या मानवी कुटुंबाच्यावर दिलेल्या दोन कार्यांचाच परिणाम होय. ईडिपस मनोगंडातील एका बाजूला मायेचे आकर्षण आणि दुसऱ्या बाजूला बाप व मुलगा ह्यांतील विरोध ही कुटुंबाच्या निसर्गाकडून संस्कृतीकडे होणाऱ्या विकासावर आधारलेली आहेत. ह्या वैशिष्ट्याचा अर्थ समजून घेण्याकरता कोणत्याही प्रकारच्या केवळ ह्या मुद्द्याला लागू होईल अशा उपपत्तीची जरुरी नाही. मानवी कुटुंबाच्या रचनेतूनच ह्या गोष्टी उद्भवलेल्या आहेत.

बापाच्या संबंधामुळे उत्पन्न होणारे धोके टाळण्याचा एकच उपाय आहे आणि तो म्हणजे पितापुत्र संबंधातील निरनिराळे मूलभूत घटक दोन वेगळ्या वेगळ्या व्यक्तींकडे सोपवणे. हीच घटना आपल्याला मातृसत्ताक पद्धतीत आढळते.

♠ ♠

## प्रकरण ११ वे

# पितृसत्ता व मातृसत्ता

आता आपल्याला एका वादग्रस्त मुद्द्याकडे वळता येईल, आणि तो म्हणजे मुलाने वंश आईकडून की, बापाकडून समजावा ह्याच प्रश्नाला तितकेसे बरोबर नसलेले पण खुसखुशीत असे "पितृसत्ता वा मातृसत्ता" हे स्वरूप आहे.

एकदा पितृसत्ता व मातृसत्ता ह्यांत सत्तेचा किंवा अधिकाराचा संबंध नाही हे स्पष्ट झाले म्हणजे ते जास्त सुयोग्य असलेले हे शब्द पितृवांशिकता व मातृवांशिकता त्या शब्दांऐवजी वापरले तरी गैरसमजूत होण्याचा धोका राहाणार नाही. ह्या दोन तत्त्वांबद्दल जे प्रश्न नेहेमी विचारले जातात ते असे की, ह्या दोहोंपैकी "आधीचे" कोणते, त्यांचा "उगम" कशातून झाला, मातृवांशिकता व पितृवांशिकता ह्या विशिष्ट "अवस्था" होत्या की काय? इत्यादी. मातृवांशिकतेबद्दलच्या बहुतेक उपपत्तीत ही संस्था पूर्वी अस्तित्वात असलेल्या लैंगिक संकराशी जोडलेली असते; कारण मग त्यात अपत्याचा बाप अमुकच पुरुष आहे असे निश्चितपणे सांगता येत नाही. अर्थातच सर्व नाती आईच्या मार्फतच ठरविणे भाग होते.[1] "बाप हा नेहमीच अनिश्चित" असतो; ह्या विषयावर व आदिवासी समाजातील नीती, नात्याचे संबंध आणि मातृसत्ता ह्यांच्या निरनिराळ्या बाजूंवर अनेक ग्रंथ लिहिले आहेत.

बहुतेक सर्व सिद्धांत व उपपत्त्या ह्यांच्यावर टीका करण्यापूर्वी नेहमीप्रमाणे त्यांतील मूळ कल्पना कोणती ते स्पष्ट करून प्रश्नाचे स्वरूप ठरविले पाहिजे. बहुतेक सिद्धांत असे गृहीत धरतात की, पितृसत्ता व मातृसत्ता एकाच वेळी अस्तित्वात असू शकणार नाहीत, एक दुसऱ्याला वगळते. तसेच बहुतेक उपपत्तींच्या मते ह्यापैकी कोणती तरी एक पद्धती आधी अस्तित्वात होती व दुसरी संस्कृतीच्या मागूनच्या अवस्थेत आली. उदाहरणार्थ, श्री. एस्. हार्टलँड, प्राथमिक अवस्थेतील समाजशास्त्रातले एक नामांकित मानववंशशास्त्रज्ञ असे म्हणतात की, "माता हा समाजाचा एकमेव पाया आहे" (पूर्वी उल्लेखलेला ग्रंथ, पृ. २) आणि असेही विधान करतात की, मातृसत्तेमध्ये "वंशसंबंध आणि म्हणून नात्याचे संबंध फक्त आईच्या मार्फतच ठरवले जातात." ह्या प्रख्यात मानववंशशास्त्रज्ञाच्या ग्रंथात ही कल्पना अथपासून इतीपर्यंत आलेली आहे. मातृसत्ता ही एक स्वतंत्र अशी समाजपद्धती आहे, व समाजसंघटनेच्या सर्व बाजूंचे व स्वरूपांचे ती नियंत्रण करते असे त्या ग्रंथात म्हटलेले आहे. ह्या

लेखकाने आपल्यापुढे जे उद्दिष्ट ठेवलेले आहे ते असे की, मनुष्यांतील नाती ठरविण्याची आपल्याला माहिती होऊ शकणारी सर्वांत आधीची पद्धत म्हणजे फक्त स्त्रीच्या मार्फतच; आणि पित्याकडून नाती ठरविण्याची पद्धती मागून विकसित झाली" (पृ. १०) पण आश्चर्यकारक गोष्ट अशी की, ज्या ग्रंथात श्री. हार्टलँड पितृवांशिकतेच्या आधी मातृवांशिकता होती हे सिद्ध करण्याचा प्रयत्न करीत आहेत त्यातच नेहमी एक विधान आढळते : नेहेमी मातृसत्ता व पितृसत्ता ह्यांचे मिश्रण असते. एवढेच काय पण अगदी संक्षिप्त निवेदन करताना श्री. हार्टलँड म्हणतात : "पितृसत्ता व पित्याकडून नाती ठरवणे ह्या पद्धतींनी मातृसत्तेवर सर्व जगात फार मोठे आक्रमण केले आहे. ह्याचा परिणाम असा झाला आहे की, मातृसत्ताक पद्धती बदलण्याच्या निरनिराळ्या अवस्थांत असल्याचे आढळून येते व नव्या समाजरचनेत बाप हाच नात्याच्या सर्व माणसांत मुख्य बनतो व तोच सत्ता गाजवतो." (पृ. ३४). खरे म्हणायचे तर सर्व जगात पितृसत्तेच्या पद्धतीबरोबरच मातेच्या मार्फत ज्यांच्याशी नाते जुळते तीही मंडळी असतात व नाते जुळवण्याच्या ह्या दोन्ही पद्धती एकमेकांत संपूर्णपणे मिसळून गेलेल्या असतात.

आता प्रश्न असा उपस्थित होतो की, "प्राथमिक उगम" किंवा "एका-मागून एक येणाऱ्या अवस्था" ह्यांच्याबद्दल आनुवंशिकता ठरविताना काही उपपत्त्या पुढे मांडण्याची जरूर आहे काय ? आणि मग त्यांच्या आधारावर अगदी खालचा व अगदी वरचा समाज बदलत्या परिस्थितीत आहे असे म्हणणे बरोबर आहे का ? त्यापेक्षा निरीक्षणावर आधारलेला निष्कर्ष असा होईल की, मातृत्व व पितृत्व ही एक-मेकांपासून विभक्त व स्वतंत्र अशी कधीच आढळत नाहीत. तर्कशास्त्रदृष्ट्या ह्या प्रश्नावर विचार करताना आपण असे लक्षात घेणे जरूर आहे की, पितृसत्तेपासून अगदी स्वतंत्र अशी मातृवंशिक पद्धती कुठे अस्तित्वात आहे का व ह्या दोन्ही पद्धती एकमेकांना पूरक असण्याचा संभव जास्त असून एकमेकांच्या विरोधी आहेत हे खरे आहे काय ? ई. बी. टेलर व डब्ल्यू. एच्. आर्. रिव्हर्स ह्यांनी ही विचारसरणी अगोदरच लक्षात घेतली आहे आणि रिव्हर्सनेतर मातृसत्ता व पितृसत्ता ह्यांचे तीन भागांत विभाजन केले आहे : आनुवंशिकता, वारसा आणि अनुक्रम. ह्या विषयाचा सर्वांत समर्पक विचार डॉ. लोवी ह्यांनी केलेला आहे. त्यांनी ह्या एकंदर प्रश्नात नियमबद्धता आणली आहे, तसेच परिभाषाही तयार केली आहे व तीत दोन बाजूची व एकाच बाजूची नाती ही कल्पना पुढे मांडलेली आहे. कुटुंबाची संघटना ही दोन बाजूंच्या नात्यावर आधारलेली असते तर टोळी संघटना फक्त एका बाजूच्या नात्यावर आधारलेली असते. लोवीने[२] असे स्पष्ट दाखवून दिले आहे की, ज्या अर्थी कुटुंब हा एक सर्व समाजात आढळणारा समूह आहे आणि ज्या अर्थी नाती आईकडून व बापाकडून अशी दोन्ही बाजूनी मानली जातात त्या अर्थी एखादा समाज केवळ पितृसत्ताक किंवा केवळ मातृसत्ताक आहे असे म्हणणे शुद्ध हास्यास्पद आहे. अर्थात ह्या विचारसरणीवर कोणताही आक्षेप

घेता येणार नाही. तशीच लोवीची टोळीबद्दलची उपपत्तीही तितक्याच महत्त्वाची आहे. त्याच्या मते ज्या समाजात कुठली तरी नात्याची एक बाजू जास्त महत्त्वाची समजली जाते ते लांबचे नाते असलेले समूह तयार होतील व तेच सब् किंवा टोळी बनतील.

लोवीच्या विचारसरणीला आपण आणखी पुस्ती जोडली पाहिजे. काही विशिष्ट मानवी संबंधांचा अर्थ समजण्याकरता एकाच बाजूच्या नात्यावर जोर देणे का आवश्यक आहे, ते कशा रीतीने केले जाते आणि एकाच बाजूने नाती लक्षात घेण्याची पद्धती कोणती?

आपण पूर्वी पाहिलेच आहे की, जेथे मुलाला आई आणि बाप ह्या दोघांची जरूर असते तेथे नाती दोन्ही बाजूनी जातात. कुटुंब ही संस्थाच अशी आहे की, त्यात आई व बाप ह्या दोघांचा समावेश होतो व मुलाला दोन्ही बाजूचे संबंध लागू होतात. हाच दोन्ही बाजूनी नाती ठरविण्याचा आरंभ आहे. एक क्षणभर आपण जर तद्देशीय जीवनाची समाजशास्त्रीय सत्यस्थिती आणि ते लोक नाती ठरविण्याकरता ज्या पद्धतीचा उपयोग करतात ती ह्यांमध्ये फरक केला तर आपल्याला असे दिसून येते की, मुलाच्या अगदी लहानपणापासून नाती दोन्ही बाजूकडून मोजली जातात. पण ह्यातसुद्धा जरी आई आणि बाप ह्या दोघांचा संबंध असतो तरी त्यांच्या भूमिका एकसारख्या किंवा प्रमाणबद्ध नसतात. वय जसजसे वाढत जाते तसतसे मूल आणि आईबाप ह्यांचे संबंध बदलत जातात आणि अशी परिस्थिती उत्पन्न होते की, आपल्या नात्यातली माणसे कोणती हे स्पष्टपणे कळून घेणे जरूर होते आणि त्यामुळेच दुसऱ्या बाजूने समाजालाही आपले नात्याबद्दलचे तत्त्व तयार करावे लागते.

आपण पाहिले आहे की शिक्षणाच्या पुढच्या पुढच्या अवस्थात आपल्याजवळच्या वस्तू मुलाच्या स्वाधीन करणे व त्यांच्याबद्दलच्या परंपरा व ज्ञान त्याला देणे ह्या गोष्टी येतात. त्याचप्रमाणे मुलाला समाजाची भूमिका, समाजाबद्दलची कर्तव्ये व समाजाचे अधिकार— ज्यांच्यामुळे मोठेपण व दर्जा प्राप्त होतो— हेही समजून सांगावे लागतात. आपल्या ताब्यातील वस्तू, नैतिक मूल्ये व वैयक्तिक अधिकार ह्यांचे दान करण्याला दोन बाजू आहेत. एक आईबापांपैकी जो शिक्षकाची भूमिका करीत असेल त्याला शिकवण्याचा, त्रास करून घेऊन पण शांतपणे नवशिक्याला ज्ञान देण्याचा भार सहन करावा लागतो, त्याचप्रमाणे आपल्या मालकीच्या मौल्यवान वस्तू आणि आपले विशेष अधिकार ह्यांचाही त्याग करावा लागतो. ह्या दोन्ही कारणांमुळे संस्कृती एका पिढीकडून दुसरीकडे जाताना तिला भावनांचा जोरदार आधार लागतो. प्रेम आणि माया ह्यांनी एकत्र आणलेल्या दोन व्यक्तीतच हे संक्रमण व्हावे लागते.

आपल्याला माहीतच आहे की, ह्या भावना समाज फक्त एकाच गोष्टीपासून घेऊ शकतो आणि ती म्हणजे जीवशास्त्रातून उद्भवलेली आईबापांची नैसर्गिक प्रवृत्ती. ह्याचा अर्थ असा की, ह्या सर्व स्वरूपात संस्कृतीचे संचारण हे आईबाप व मुले

ह्यांच्या जीवशास्त्रीय संबंधाशी निगडित असते व म्हणून ते कुटुंबातच होत असते. पण एवढ्याने भागत नाही. संस्कृतिसंचारण आईकडून होऊ शकेल, बापाकडून होऊ शकेल किंवा दोघांकडूनही होऊ शकेल. हा शेवटचा पर्याय सर्वांत असमाधानकारक आहे, कारण जी घटना आधीच धोक्याची, गुंतागुंतीची व मानसिक दृष्ट्या अवघड आहे तिच्यात अनिश्चितता व घोटाळा होण्याची शक्यता उत्पन्न होते.

व्यक्तीला आपल्यापुढे दोन शक्यता दिसतात. ती दोहोंपैकी कुठल्याही एका समूहाशी संबंध जोडू शकते, तिला दोघांकडून भौतिक वस्तूंचा ताबा मिळवता येतो. केव्हाही दोन विकल्पांमध्ये निवड करता येते व तिला दुहेरी दर्जा प्राप्त होतो. ह्याच्या उलट एखाद्या पुरुषाला आपला दर्जा व सामाजिक व्यक्तित्व असे दोन हक्क सांगणारे असतील तर त्यांच्यापैकी कुठल्याही एकाला ते देता येतात. अशा प्रकारच्या समाजात एक कायम भांडणाचे मूळ अस्तित्वात येईल व त्यातून अडचणी व झगडे उत्पन्न होतील आणि एक असह्य परिस्थिती उद्भवेल हे उघड आहे. आपण जो निष्कर्ष पूर्वी काढला त्याला पुष्टी मिळते की, असा कोणताही समाज नाही की, वंश, अनुक्रम व वारसा ह्या गोष्टी अनिश्चित ठेवलेल्या आहेत. पॉलिनेशियातील जमातीतसुद्धा, जेथे व्यक्तीला आपला वंश आईमार्फत किंवा बापामार्फत पाहिजे तसा ठरविता येतो, तेथे सुद्धा व्यक्तीला आपली निवड अगदी प्रारंभीच करावी लागते. ह्याचा अर्थ असा की, आपली नाती आईबापांपैकी कोणत्या तरी एकाच बाजूने ठरवणे ही गोष्ट काही आकस्मिकरीत्या घडलेली नाही. त्या घटनेचा "अर्थ" पितृत्वाच्या तत्त्वावरून लावणे किंवा आदिवासी समाजाच्या मानसशास्त्राशी किंवा संघटनेच्या ह्या किंवा त्या विशिष्ट तत्त्वाशी संलग्न करणे बरोबर होणार नाही. आपल्या मालकीच्या वस्तू, आपला दर्जा व आपले सामाजिक अधिकार पुढच्या पिढीला देण्याच्या प्रक्रियेचा विचार करण्याचा तो एकमेव मार्ग आहे. मात्र आपल्याला असे दिसून येईल की, ह्या पद्धतीत बऱ्याच गुंतागंती, पूरक घटना आणि दुय्यम प्रतिक्रिया टाळता येत नाहीत. म्हणजे मातृसत्ता व पितृसत्ता ह्यांत निवड करून एकीचा स्वीकार करणे शिल्लक राहतेच.

मातृवंशीय व पितृवंशीय नात्यांबद्दलच्या तत्त्वाचा व्यवहारात कसा उपयोग केला जातो ह्याबद्दल आपण आणखी थोडा खोलात जाऊन विचार करू. आपल्याला माहीत आहे की, मनोविकारांतील भावनांचे संघटन समाजाच्या संघटनांशी निकट संबंधाने जोडलेले आहे. आईबद्दलच्या भावनेला रूप मिळताना आपण ह्या ग्रंथाच्या पूर्व भागात तपशीलवार व विशेषतः मागील प्रकरणात दिलेल्या सारांशात पाहिलेच आहे की, प्रारंभीच्या प्रेमाच्या व मायेच्या बदली सत्ता व अधिकार ह्यांचा अवलंब करण्यात काही विशेष अडचणी उत्पन्न होत नाहीत.

मातृसत्ताक पद्धतीत सत्ता आईकडे नसून तिच्या भावाकडे असते. अधिकाराचे संक्रमण होताना आई आणि मुलगा ह्यांच्यात शत्रुत्व किंवा मत्सर ह्यांचा उद्भव होत नाही. कारण त्याचा वारसा त्याच्या मामाकडून मिळतो. शिवाय, सांस्कृतिक व

सामाजिक प्रभाव कसेही असोत, आई व मुलगा ह्यांच्यातील प्रेमाचे व मायेचे संबंध बाप आणि मूल ह्यांच्यातील संबंधांपेक्षा अधिक बळकट असतात. शिवाय आई आणि मूल ह्यांच्यातील शारिरिक एकात्मता त्यांच्यातील जवळिकीला आधारभूत आहे हे नाकारण्याचीही काही जरुरी नाही. म्हणजे आई व मूल ह्यांच्यातील संबंध जन्माविषयीच्या कल्पना, लहानपणचे प्रेमळ, आई व मूल ह्यांच्यातील अधिक जवळचे नाते ह्या सर्वांमुळे त्या दोघांच्या भावना अतिशय बळकट होतात आणि कायदेशीर व आर्थिक संक्रमणामुळे बिघडत नाहीत. हेच विधान दुसऱ्या शब्दात सांगायचे म्हणजे मातृसत्तेमध्ये मुलाला मालमत्ता त्याच्या मामाकडून मिळते हा जो सामाजिक दंडक आहे त्यामुळे मुलाचे आईशी असलेले प्रेमाचे संबंध बिलकुल बिघडत नाहीत.

वस्तुस्थिती अशी आहे की, हे संबंध अगदी उघड दिसणारे आणि भावनिक दृष्ट्या जास्त चिवट असतात. एका विशिष्ट मातृसत्ताक समाजातील संस्थांच्या तपशीलवार विचारात आपल्याला दिसून आलेच आहे की, जो मामा कडक शिस्त, सामाजिक उद्दिष्टे व महत्त्वाकांक्षा ह्यांचे प्रतिनिधित्व करतो त्याला कुटुंबापासून अगदी योग्य रीतीने लांब ठेवले जाते.

ह्याच्या उलट आपण मागील प्रकरणात पाहिले आहे की, पितृसत्तेमध्ये मनोविकारांच्या घटनेत एक प्रकारचा निश्चित भंग होतो. पितृसत्ताक समाजात पित्याला दोन भूमिका कराव्या लागतात—— मायाळू मित्र आणि कायद्याच्या कडक शिस्तीचा पालक. ह्यामुळे मनातील भावनांच्यात विसंवाद उत्पन्न होतो व कुटुंबातसुद्धा सामाजिक अडचणी दिसायला लागतात; कारण कुटुंबाच्या घटकांतच मत्सर, स्पर्धा इत्यादींचा प्रादुर्भाव होतो.

आणखी एका मुद्दयाचा उल्लेख केला पाहिजे. विकसित समाजापेक्षाही आदिवासी समाजात लैंगिक विचारांवर नात्याच्या संबंधाचा परिणाम होतो. कुटुंबाच्या पलीकडे नात्याच्या संबंधांचा विस्तार झाला की त्यात विवाहबाह्यता व त्याचबरोबर टोळ्यांची घटना झाल्याचे दिसून येते. मातृसत्तेमध्ये कुटुंबातील व्यक्तींमधील लैंगिक संबंधावर जी बंदी असते ती मग टोळीमधील सर्व व्यक्तींना लागू केली जाते. ह्याचा अर्थ असा की, मातृसत्ताक समाजात सर्व स्त्रियांबद्दलची लैंगिक भावना ही एक साधी व सुसंवादी अशी घटना असते. ह्याच्या उलट पितृसत्ताक पद्धतीत जवळच्या नातेवाइकांच्यातील लैंगिक संबंधांवर जे निर्बंध असतात ते जसेच्या तसे टोळीमधील इतर व्यक्तींना लागू केले जात नाहीत.

कोणते लैंगिक संबंध कायदेशीर व कोणते बेकायदेशीर ह्यांबद्दलच्या कल्पनांची एक योजना अस्तित्वात येते. पितृवांशिक विवाहबाह्यतेमध्ये आईचा, म्हणजे जिच्याशी मुलग्याचा लैंगिक संबंध कोणत्याही परिस्थितीत टाळलाच पाहिजे, तिचा समावेश होत नाही. म्हणजे या सगळ्यावरून आपल्याला कळून येईल की, समाजाच्या संघटनेत मातृसत्ता हे तत्त्व पितृसत्तेपेक्षा जास्त उपयुक्त ठरेल. ही उपयुक्तता मानवी संघटनेच्या

अशा एका पातळीवर इष्ट ठरते की, जेथे नात्याचे संबंध हे सामाजिक दृष्ट्या अति महत्त्वाचे समजले जातात, मग ते अगदी मर्यादित स्वरूपात असोत की वर्गीकरण स्वरूपाचे असोत.

इथे हेही ओळखले पाहिजे की, पितृसत्ताक पद्धतीचेही अनेक फायदे आहेत. मातृसत्ताक पद्धतीत मुलावर दोन निरनिराळ्या सत्ता अधिकार गाजवतात आणि कुटुंबाचीही विभागणी होते. अविकसित समाजात दोन्ही बाजूंच्या नात्यांची गुंतागुंतीची पद्धत तयार होते व समाजाच्या घटनेची शक्ती वाढते; पण उच्च पातळीवरच्या समाजांत त्यामुळे अनेक अवघड प्रश्न निर्माण होतील. जसजशी संस्कृती विकसित होईल व टोळी आणि वर्गीकृत नात्यांची पद्धती कमी कमी होत जाईल; आणि जसजशी जवळची जमात, शहर व राज्य ह्यांची संघटना साधी होत जाईल तसतसे पितृसत्तेचे तत्त्व जास्तजास्त महत्त्वाचे होत जाईल. पण ह्यामुळे आपल्यापुढे जो मुख्य प्रश्न आहे त्यापासून आपण दूर जातो.

सारांश सांगायचा म्हणजे असे म्हणता येईल की, मातृसत्ता व पितृसत्ता ह्यांचे सापेक्ष दृष्टीने होणारे फायदे तुल्यबळ आहेत आणि त्यातल्या एकाला पुढचे स्थान देणे किंवा जास्त विस्तृत घटना म्हणून महत्त्व देणे शक्य होणार नाही. पण कायद्याच्या, तसेच आर्थिक व सामाजिक बाबतीत एकाच बाजूने नाती ठरविणे दोन्ही बाजूंनी नाती ठरविण्यापेक्षा अधिक चांगले ही गोष्ट संशयातीत व निर्विवाद आहे.

सर्वात महत्त्वाचा मुद्दा असा की, नाती ठरविण्याकरता किंवा वंश निश्चित करण्याकरता मातृसत्ता किंवा पितृसत्ता ह्यांच्यापैकी फक्त एकाचाच उपयोग करणे योग्य ठरणार नाही. फक्त जेव्हा वारसाच्या प्रश्नान्वये मालमत्ता, नीतितत्त्वे अथवा सामाजिक मूल्ये ह्यांचे हस्तांतर व्हावयाचे असते तेव्हा ह्या दोन पद्धतींपैकी एकीला कायद्याच्या दृष्टीने महत्त्व येते. मी मागे काही ठिकाणी[3] दाखवून दिले आहे की, कायद्याने अशा तऱ्हेने एका पद्धतीला महत्त्व दिले तर त्याबद्दल काही पारंपरिक प्रतिक्रिया होतात व त्यामुळे ही एक बाजूची घटना थोड्या प्रमाणात बदलली जाते.

आता आपण पूर्वी ज्या मुद्द्यापासून विचारांना आरंभ केला तेथे परत जाऊन ह्या ग्रंथाच्या पूर्व विभागात जे निष्कर्ष काढले होते व ज्यांच्यावर डॉ. जोन्स ह्यांनी टीका केली होती त्यांकडे लक्ष देऊ. त्यांच्या मताप्रमाणे मातृसत्ता ही एक गूढ घटना असून ती अज्ञात अशा सामाजिक व आर्थिक कारणांमुळे अस्तित्वात आलेली आहे. खरे म्हणजे मातृसत्ता ही नाती ठरविण्याच्या दोन उपलब्ध पद्धतींपैकी एक आहे व त्या दोन्ही पद्धतींचे काही काही फायदे असतात. फार काय, पितृसत्तेपेक्षा होणारे फायदे थोडे अधीकच आहेत. आणि ह्या फायद्यांमध्ये एक महत्त्वाचा केंद्रबिंदू आहे व तो ह्या प्रकरणात स्पष्ट झालेला आहे : बापाच्या मनातील जोराच्या दडपशाहीचे त्यामुळे नियंत्रण होते व जमातीत लैंगिक संयोगावर जे निर्बंध आहेत त्यांच्या दृष्टीने आईचे स्थान अधीक सुसंगत व जास्त प्रमाणात जुळणारे असे होते. ♠ ♠

# प्रकरण १२ वे

# संस्कृती आणि मनोगंड

आपण आपल्या विषयाचे क्षेत्र आता पूर्णपणे व्यापले आहे : जन्मजात देणगी अथवा प्रवृत्ती ह्यांचे निसर्गापासून संस्कृतीत होणारे संक्रमण. आता आपल्या विचारसरणीचा उल्लेख करून आपल्या निष्कर्षांचा संक्षिप्त आढावा घेणे शक्य होईल. आपण सुरवातीला मनोगंडाच्या उगमाच्या व इतिहासाच्या मनोविश्लेषणात्मक मतांचे परीक्षण केले. त्यात आपल्याला बऱ्याच विसंगती व दुर्गम्य स्थळे भेटली. आधीच दडपल्या गेलेल्या मूलतत्त्वांचे पुन्हा नियंत्रण ही एक कल्पना आढळली; तसेच अज्ञान मातृवांशिकता ही द्वेषाचे निर्मूलन करण्याकरता मुद्दाम योजिली गेली; कुटुंबातील सर्व अडचणी दूर करण्यास पितृसत्ता हा एक योग्य उपाय आहे; ह्या सर्व गोष्टी मनोविश्लेषण शास्त्राच्या मूलभूत तत्त्वाशी जुळवून घेणे कठीण होते व त्याचप्रमाणे मानववंशशास्त्राच्या तत्त्वांशी व वस्तुस्थितीशीही ह्या गोष्टी जुळत नव्हत्या. ईडिपस मनोगंड हे संस्कृतीचे मूळ कारण आहे, तो मानवाच्या सर्व संस्था, कल्पना आणि श्रद्धा ह्यांच्या आधी अस्तित्वात होता, ह्या प्रकारच्या गृहीतकृत्यामुळे ही विसंगती उत्पन्न झालेली होती हेही आपल्याला कळून आले. हा ईडिपस मनोगंड कोणत्या मूळ स्वरूपात उत्पन्न झाला हे शोधून काढण्याच्या प्रयत्नात आपल्याला फ्रॉइडची इतिहासपूर्व कालातील पहिल्या गुन्ह्याची उपपत्ती आढळून आली.

फ्रॉइडच्या मते संस्कृती ह्या गुन्ह्याची प्रतिक्रिया आहे. आणि तो असे गृहीत धरतो की, ह्या गुन्ह्याची आठवण, त्याबद्दचा पश्चात्ताप व त्याबद्दलची द्व्यर्थी भूमिका ही सर्व "सामुदायिक सुप्त मनात" (Collective Unconscious) टिकून राहिलेली आहेत.

ही उपपत्ती स्वीकारणे आपल्याला पूर्णपणे अशक्य झाल्यामुळे आपण तिची जास्त तपशीलवार परीक्षा केली. आपल्याला असे आढळले की, हा कुलचिन्हासंबंधीचा गुन्हा म्हणजे निसर्ग व संस्कृती ह्यांना विभागणारी घटना असली पाहिजे; म्हणजे त्या क्षणापासून संस्कृतीचा उगम झाला असला पाहिजे. हा मुद्दा गृहीत धरला नाही तर त्या उपपत्तीला काहीच अर्थच राहात नाही. पण उलट हा मुद्दा गृहीत धरला तर त्यामुळे उत्पन्न होणाऱ्या विसंगतीमुळे ती उपपत्ती भंग पावते. कुटुंबाच्या प्रारंभीच्या स्वरूपाबद्दल फ्रॉइडच्या उपपत्तीतील व इतर त्याच प्रकारच्या तर्कांमध्ये हे दोष लक्षात घेतल्यानंतर एक ढोबळ चूक दिसून येते ती ही की जन्मजात प्रवृत्ती व

स्वय ह्यात, म्हणजे जीवशास्त्रान्वये होणारी प्रतिक्रिया व सांस्कृतिक सुव्यवस्था ह्यांच्यात फरक केला जात नाही. अर्थात ह्यापुढचे आपले काम म्हणजे निसर्गाकडून संस्कृतीकडे जाताना कौटुंबिक बंधांमध्ये कोणते बदल होतात त्याचा अभ्यास करणे.

जन्मजात देणगीमध्ये काय महत्त्वाचे बदल घडून येतात व त्यांच्यामुळे मानवाच्या मनोभूमिकेत काय फरक पडतो हे शोधून काढण्याचा आपण प्रयत्न केला. ह्यामध्ये आपल्याला मनोविश्लेषणशास्त्रातील महत्त्वाचे प्रश्न दिसून आले व कौटुंबिक मनोगंडाच्या नैसर्गिक घडणीबद्दलची एक उपपत्ती आपल्यापुढे मांडता आली. कौटुंबिक मनोगंड हे संस्कृतीचे एक अपरिहार्य जोडफळ आहे, व ते जेव्हा कुटुंब जन्मजात प्रवृत्तींनी बांधलेल्या समूहातून संस्कृतीने बांधलेल्या समूहात उत्क्रांत होते तेव्हा दिसून येते. मानवशास्त्रदृष्ट्या म्हणायचे म्हणजे हा बदल एकमेकांशी जोडलेल्या साखळीसारख्या प्रेरणांचे संघटित मनोविचारांत संक्रमण होते त्या वेळी स्पष्ट होतो. भावनांचा विकास मानसशास्त्राच्या अनेक नियमांनी बांधलेला असतो व त्या नियमांच्या द्वारे मानसिक परिपक्वता सिद्ध होऊन विशिष्ट मनोविचारांमधून काही भूमिका, जुळवणी, व उपजत बुद्धीच्या प्रेरणा नाहीशा होतात. ह्या यंत्रणेत सामाजिक परिस्थिती फार महत्त्वाची असते, व ती सांस्कृतिक चौकटीत आणि प्रत्यक्ष वैयक्तिक संबंधातून कार्यक्षम होते.

बाप आणि मूल व आई आणि मूल ह्यांच्या संबंधातून काही विशिष्ट भूमिकांचे व चेतनांचे उच्चाटन होण्याच्या क्रियेत अनेक शक्यता संभवतात. मनातील प्रेरणांचे व विचारांचे पद्धतशीर संघटन काही विशिष्ट भूमिका काढून घेऊन किंवा कमी कमी होऊन, नाट्यमय धक्क्यामुळे, संघटित उद्दिष्टांमुळे (उदाहरणार्थ समारंभाच्या प्रसंगी), उपहासामुळे आणि सार्वजनिक मतामुळे घडून येणे शक्य आहे. अशा प्रकारच्या यंत्रणांमुळे मुलाच्या मनातील आईविषयीच्या भोगासक्तीच्या भावना हळूहळू नाहीशा होतात, तर उलट बाप व मूल ह्यांच्यातील हळुवार व नाजूक संबंध जाऊन त्यांची जागा कडक शिस्त व जुलूम ह्यांनी घेतली जाते. ह्या यंत्रणा ज्या तऱ्हेने आपले कार्य करतात त्यांचा परिणाम नेहमी एकाच प्रकारचा होतो असे मात्र नाही. त्याचप्रमाणे मनातील व समाजातील पुष्कळशा व्याधी समाजात लैंगिकता दडपून टाकण्याकरता वापरलेल्या चुकीच्या पद्धतींमुळे, तसेच सत्तेचा उपयोग करण्याच्या चुकीच्या धोरणांमुळे उद्भवतात. ह्या ग्रंथाच्या पहिल्या दोन भागांत काही थोडी प्रत्यक्ष उदाहरणे दाखवून ही विधाने तपशीलवार सिद्ध केली आहेत. आणि ह्याला ह्या शेवटच्या भागात तात्त्विक आधारही आहे हे दाखवले आहे.

म्हणजे मनातील विचारांची रचना, त्यामुळे होणारे आतील कलह व चुकीची घडण, ही सर्व एका विशिष्ट समाजातील नियंत्रणे किती व कशी कार्यक्षम असतात त्यावर अवलंबून असते. ह्या नियंत्रणाची प्रमुख अंगे म्हणजे लहान मुलांच्या लैंगिकतेचे नियंत्रण, जवळच्या नातेवाइकांतील लैंगिक संबंधांवरील निर्बंध, विवाहबाह्यता,

सत्तेची विभागणी आणि कुटुंबरचनेचा नमुना ही असतात. प्रस्तुत निबंधाचे कदाचित हेच महत्त्वाचे कार्य असेल. जीवशास्त्रविषयक, मानवशास्त्रविषयक व समाजशास्त्रविषयक अशा तिन्ही प्रकारच्या कारणीभूत झालेल्या गोष्टींचा परस्परसंबंध काय ते आपण दाखविले. संस्कृतीमध्ये उपजत बुद्धीच्या लवचीकपणाबद्दल व जन्मजात प्रवृत्तींमुळे होणाऱ्या सांकेतिक जुळणीबद्दल आणि एक उपपत्ती तयार केली. ह्या उपपत्तीच्या मानसशास्त्रविषयक बाजूने असे सुचविले जाते की, जरी सामाजिक गोष्टी महत्त्वाच्या असल्या तरी "गटाचे मन", "सामुदायिक सुप्त मन", "समाजशीलतेची उपजत बुद्धी" आणि तसल्याच इतर तत्त्वज्ञानविषयक कल्पना चुकीच्या आहेत.

ह्या सर्वांमध्ये आपल्याला मानसशास्त्रातील केंद्रबिंदूच्या प्रश्नांचा म्हणजे जवळच्या नात्याच्या व्यक्तींतील लैंगिक संबंधांचा, पित्याच्या अधिकाराचा, लैंगिक निर्बंधांचा आणि उपजत बुद्धीच्या परिपक्वतेचा विचार एकसारखा करावाच लागला. माझी पुष्कळशी मते मनोविश्लेषणशास्त्राशी जुळणारी आहेत ही गोष्ट सत्य आहे, पण इतर काही मुद्द्यांच्या बाबतीत त्यांचा पुनर्विचार करणे जरूर आहे.

अगदी एका स्पष्ट प्रश्नाबद्दल म्हणजे मातृसत्तेचा परिणाम व कार्यक्षेत्र ह्याबद्दल मी पूर्वी प्रसिद्ध केलेली मते व प्रस्तुत ग्रंथातील निष्कर्ष मनोविश्लेषणशास्त्रात उलथापालथ करतील असे नाहीत. पूर्वी म्हटल्याप्रमाणे मातृसत्तेमध्ये पितृसत्तेपेक्षा अधीक फायदा आहे कारण तीमुळे "ईडिपस मनोगंड विभागला जातो" व दोन पुरुषांमध्ये सत्ताही विभागली जाते. उलट दुसऱ्या बाजूला मातृसत्तेमुळे मात्रागमनावर कायम निर्बंध घातला जातो, आणि कुटुंबातल्या लैंगिक संबंधावर निर्बंध घातल्यामुळे आपोआपच विवाहबाह्यता निर्माण होते. पण आपल्याला हेही लक्षात घेतले पाहिजे की, मातृसत्ता ही काही पूर्णपणे मनोगंडावर अवलंबून नाही; ती एक जास्त जास्त विस्तृत अशी घटना असून अनेक निरनिराळ्या कारणांमुळे घडून येते. ही कारणे मी स्पष्टपणे व प्रत्यक्ष स्वरूपात दाखवून दिली आहेत; कारण मला डॉ. जोन्स ह्यांचा जो आक्षेप होता की, मी ही कारणे अज्ञात सामाजिक व आर्थिक कारणांकरिता गृहीत धरतो त्याचे खंडन करावयाचे होते. मी असे दाखवून देण्याचा प्रयत्न केला आहे की, नाती ठरविण्याचे जे दोन विकल्प आहेत त्यात मातृसत्ता ही जास्त उपयुक्त आहे.

ह्यातला मुख्य मुद्दा असा आहे की, जवळजवळ सर्व प्रकारच्या संस्कृतींत एकाच बाजूने नाती ठरविण्याची पद्धत स्वीकारलेली असते; पण संस्कृतीच्या अगदी खालच्या पातळीवरच्या लोकांत मातृवंशाचा उपयोग करणे पितृवंशाच्या उपयोगापेक्षा अधीक फायद्याचे ठरते. मातृसत्तेच्या ह्या महत्त्वाच्या व विशिष्ट फायद्यात तिच्यामुळे ईडिपस मनोगंडाचे परिवर्तन व विभाजन होते, ही गोष्ट लक्षात घेतली पाहिजे.

इथे मला शिवाय हेही सांगितले पाहिजे की, मनोविश्लेषणाच्या उपपत्तीच्या दृष्टिकोनातून पाहिले असता ईडिपस मनोगंड हानिकारक का मानला जातो ते कळणे

कठीण आहे. काही झाले तरी मनोविश्लेषणशास्त्रज्ञांच्या दृष्टीने ईडिपस मनोगंड हा संस्कृतीचे मूळ उगमस्थान आणि धर्मांची, कायद्याची व नीतीची सुरुवात असतो. मग तो काढून टाकण्याची काय जरूर असावी? मानवाने किंवा "सामुदायिक मनाने" तो मोडून टाकण्याचे उपाय का शोधून काढावे? आमच्या मते मात्र हा मनोगंड हे कारण नसून तो एक उप-उत्पादन आहे. तो एक सर्जनशील तत्त्व नसून मनोव्यवस्थेतील बिघाड आहे. मात्र ह्या बिघाडाचा दुष्परिणाम मातृसत्तेत पितृसत्तेपेक्षा कमी प्रमाणात होतो.

हे सर्व निष्कर्ष काही वर्षांपूर्वी दोन वेगळ्या वेगळ्या निबंधांत प्रथम प्रसिद्ध केले गेले होते व ते प्रस्तुत ग्रंथाचा भाग १ व भाग २ म्हणून घातलेले आहेत. येथेसुद्धा सर्वसाधारण प्रश्नाचा विचार करताना आपल्याला मनोविश्लेषणाच्या उपपत्तीला पुष्टी देता आली. मात्र ही उपपत्ती एक प्रकारची स्फूर्ती व चालू सिद्धांत म्हणून समजली गेली तरच; उपपत्ती ठाम सत्य म्हणून मानली गेली तर मात्र अशी पुष्टी मिळणार नाही.

शास्त्रीय संशोधनात एकमेकांबरोबर सहकार्य करावे लागते; निरनिराळ्या विषयांतील तज्ज्ञांबरोबर देवाण-घेवाण होते. मानववंशशास्त्रज्ञांना मनोविश्लेषणाच्या तज्ज्ञांकडून बरीच मदत झालेली आहे, व ह्या तज्ज्ञांनी जर सहकार्य करण्याचे नाकारले व ज्या क्षेत्रात अर्थातच त्यांना विशेष ज्ञान असणे शक्य नाही त्यांतील प्रामाणिकपणे दिलेली वस्तुस्थिती स्वीकारली नाही तर ती दुर्दैवाची गोष्ट ठरेल. शास्त्रीय प्रगती ही एका दिशेने जाणाऱ्या सरळ रेषेसारखी नसते. नवीन प्रांत काबीज करताना पुष्कळदा भूमीच्या ज्या भागावर हक्क सांगितला जातो त्यात काहीही उगवत नाही. शास्त्रीय विषयाचा एखादा विद्यार्थी काय किंवा एखादा शास्त्रीय संप्रदाय काय, त्यांच्या दृष्टीने एखाद्या असमर्थनीय भूमिकेपासून माघार घेणे हे नवीन संशोधनात धडाडीने पुढे जाण्याइतकेच महत्त्वाचे आहे, आणि वैज्ञानिक पूर्वेक्षणात एक गोष्ट नेहमी लक्षात ठेवली पाहिजे की, वाळू आणि खडे ह्यांचा खूपसा गाळ चिकाटीने चाळून टाकून दिल्यावरच सत्याचे थोडेसे सोनेरी कण आपल्या हाती लागणे शक्य होते.



# टीपा

## भाग १, प्रकरण १

१. जे. सी. फ्ल्यूगेल ह्यांच्या " The Psycho-Analytic Study of the family " ह्याला हा संदर्भ आहे. तो ग्रंथ जरी एका मानसशास्त्रज्ञाने लिहिला असला तरी त्याची दिशा समाजशास्त्रीयच आहे. जरी लेखकाने ते स्पष्ट केलेले नाही तरी १५ व १७ ही प्रकरणे प्रस्तुत प्रश्नाबद्दलच आहेत.

## भाग १, प्रकरण २

१. प्रस्तुत लेखकाचे " The father in Primitive Psychology " ( Psyche Miniatures ) 1927, आणि " Baloma, Spirits of the Dead " Journ. R. Anthrop. Inst. 1916 पाहा.

२. प्रस्तुत लेखकाचे " Primitive Economics " in Economic Journal 1921 पाहा. तसेच Argonauts of the Western Pacific, प्र. २ व ६. ह्याची कायदेशीर बाजू Crime and Custom in Savage Society, 1926 मध्ये दिलेली आहे.

३. मनोविश्लेषणाचे सिद्धांत सर्वसाधारण अमेरिकन व युरोपियन कुटुंबाच्या अभ्यासावर आधारलेले आहेत. यूरोप-अमेरिकेतील समाजांच्या वरच्या थरात मेलानेशियाप्रमाणे आपण मातृसत्तेकडे जात आहोत की काय हे भविष्य मी वर्तवू शकत नाही. जर ह्या ग्रंथातील उपपत्ती बरोबर असेल तर काही आधुनिक गोष्टी ( स्त्री-पुरुषांनी एकमेकांचे लाड करण्याच्या पार्ट्या ) त्या दिशेकडे जात आहेत असे वाटते. व त्यामुळे कुटुंबांतील व्यक्तींच्या भावनांतही बदल होऊ शकेल.

४. पूर्व यूरोपमधील शेतकऱ्यांच्यातील आईबाप व मुले ह्यांच्या एकमेकांबद्दलच्या भूमिकांची मला प्रत्यक्ष माहिती आहे.

५. बालपणातील लैंगिकतेबद्दल फ्रॉइड जरी अनेक अवस्था कल्पितो तरी त्याच्या मुख्य ग्रंथात त्यासंबंधी स्पष्ट उल्लेख नाही. मानसशास्त्रातील अतज्ञाला हे पुस्तक वाचणे जरा अवघडच आहे. Child हा शब्द कधी baby ह्या अर्थाने वापरला आहे, तर कधी कुमार ( adolescent ) ह्या अर्थी वापरला आहे. संदर्भावरूनच ते ओळखावे लागते.

## भाग १, प्रकरण ३

१. बाळंतपणानंतर आईने लैंगिक संयोग करण्यावर कडक निर्बंध आहेत. पाहा– G. Pitt Rivers " The Contact of Races and Clash of

Culture" 1917, प्र. ७ सेक्शन ३.

२. "The Trauma of Birth" (मूळ जर्मन) डॉ. रँक ह्यांचे निष्कर्ष प्रस्तुत लेखकाला अमान्य आहेत. मनोविश्लेषणातील नवीन सिद्धांत तो स्वीकारू शकत नाही व ते त्याला समजतही नाहीत.

### भाग १, प्रकरण ४

१. येथेही आधुनिक यूरोपियन व अमेरिकन कुटुंबाचा अपवाद करावा लागेल. बापाची सत्ता कमी होत आहे व मुले त्याला भिण्याऐवजी त्याची कीवच करतील.

### भाग १, प्रकरण ५

१. पाहा— A. Moll–The Sexual Life of the Child (मूळ जर्मन तसेच हॅवेलॉक एलिस, फ्रोसरंत्झ, शार्लट ब्यूहलर व विल्यम स्टर्न ह्यांचीही पुस्तके.

२. झोलाने आपल्याला दिलेल्या कल्पनांशी मी सहमत आहे.

३. फ्रॉइडच्या पूर्वीच्या मतांशी माझी मते ह्या बाबतीत जुळतात. पण नंतरच्या एका निबंधातली त्याची मते मला पटत नाहीत.

४. आजकाल आधुनिक पुरुष आणि स्त्री आपल्या मुलांना लैंगिक विषयांबद्दल माहिती देतात. अर्थात ह्यांची संख्या फार नाही. पण त्यामुळे मुलांचा आपल्या आईबापांबद्दलचा दृष्टिकोन फारसा बदलेल असे वाटत नाही. अगदी उघड वागणाऱ्या ट्रोब्रियांड बेटावरील लोकांतसुद्धा मुले आईबापांजवळ लैंगिक गोष्टींबद्दल विश्वास टाकून बोलत नाहीत. त्याऐवजी ती आपल्या गुप्त गोष्टी सांगतात.

५. हे प्रथम १९२१ मध्ये लिहिले, पण तेव्हापासून मी आपली मते बदलली आहेत. लहान मूल आईच्या शरिराशी निकट संबंध आल्यानंतर त्याच्या मनात लैंगिक विचार येतात हे विधान मला हास्यास्पद वाटते. पुढे भाग ४, प्रकरण ९ मध्ये मी ह्याबद्दल अधीक विवेचन केले आहे.

### भाग १, प्रकरण ७

१. A. Moll (Sexual Life of the Child) मूळ जर्मन १९०८.

२. सुप्त कालखंडाचा उल्लेख अनेक ठिकाणी आहे, पण त्याच्या ग्रंथात त्याबद्दल विस्तृत उल्लेख नाही. शिवाय हा कालखंड लुप्त होऊ शकेल असेही त्याने एका ग्रंथात म्हटले आहे.

३. मी गुदद्वारसंबंधी वैषयिक भावना हा शब्दप्रयोग आता वापरणार नाही, पण ज्याची बिनचूक व्याख्या केलेली आहे असा शब्द वापरण्यास हरकत नाही.

### भाग १, प्रकरण ८

१. पुढे पाहा— भाग ४, प्रकरण ९.

२. उदाहरणार्थ मोपासांच्या कादंबरीत वर्णन केल्याप्रमाणे.

३. पुष्कळ देशांत शेतकरी कुटुंबात बाप व मुलगी ह्यांचा लैंगिक संयोग बरेचदा घडून येतो. विशेषतः लॅटिन वंशांमध्ये मला तर एक कुटुंब असे माहीत आहे की हा संबंध उघडपणे चालतो व त्यांना मुलेही झाली आहेत.

४. ह्या घटनेच्या विस्तृत वर्णनाकरता प्रस्तुत लेखकाचा Sexual Life of Savages हा ग्रंथ पाहा.

५. तरुण मुलगा, बाप व मामा ह्यांचे परस्परसंबंध मी वर्णन केल्यापेक्षा अधिक गुंतागुंतीचे असतात. पाहा, Crime and Custom 1926.

## भाग १, प्र. ९

१. वरील मजकूर लिहिल्यानंतर मला कळून चुकले की, कोणताही मनोविश्लेषणशास्त्रज्ञ माझे मत स्वीकारणार नाही.

## भाग २, प्र. २.

१. ॲम्फलेट बेटावरील रहिवाशांच्या चालीरीतींबद्दलची माहिती "Argonauts of the Western Pacific" प्र. ११ मध्ये पाहा.

२. मैलू बेटावरील रहिवाश्यांबद्दलचा लेखकाचा निबंध पाहा. त्यात मानसिक रोगांबद्दल माहिती नाही. मी तेथे परत जाईन व आणखी अभ्यास करीन अशी मला आशा होती.

## भाग २, प्र. ३

१. पाहा– माझे Argonauts of the Pacific. जादू, मंत्र, विधी इत्यादींचे वर्णन.

२. तुलना करा— Baloma (Journ of the R. Anthrop. Insti. 1916.)

३. हा मुद्दा Crime and Custom मध्ये जास्त विस्ताराने मांडला आहे.

## भाग २, प्र. ४

१. The Argonauts of the Western Pacific मधील पौराणिक कथांवरील प्रकरण पाहा. पृ. ३०४ व त्यापुढे.

२. ह्या पौराणिक कथांमधील चिन्हांबद्दल फ्रॉइडच्या अनुयायांना कुतूहल वाटेल. पुरुषांच्या रेतामुळे गर्भधारणा होते ही कल्पना पुष्कळ रानटी समाजांना

माहीत नसते. ते फक्त स्त्रीचे इंद्रिय " उघडे करण्याचे " काम पुरुषाचे इंद्रिय करते असे समजतात. त्याकरता इतरही काही वस्तूंचा उपयोग केला जातो; उदाहरणार्थ एखादा मासा किंवा स्फटिक. माझा " Psyche " मधील १९२७ मध्ये प्रसिद्ध केलेला The Father in Primitive Psychology हा निबंध पाहा.

३. ह्या पौराणिक गोष्टी Argonauts मध्ये दिल्या आहेत.

४. वरील ग्रंथ पृ. ४२१ व पुढे.

५. ,, ,, पृ. २६२-२६४.

६. ,, ,, जादूवरील प्रकरणे तसेच " जादूमध्ये शब्दाचे महत्त्व ". तुलना करा— Ogden and Richards—The Meaning of Meaning प्र. २.

७. " Myth in Primitive Psychology " 1926.

## भाग ३, प्र. १

१. " Mother Right and Sexual Ignorance of Savages " Int. J. Psychoanalysis VI, भाग २, १९२५, पृ. १०९–३०.

२. " Psychoanalysis and Anthropology ", Psyche भाग ४.

## भाग ३, प्र. ३

१. फ्रॉइड– Totem and Taboo, न्यूयॉर्क १९१८.

२. फ्रॉइड– Totem and Taboo. डार्विनच्या The Descent of Man II, प्र. २० पृ. ६०३–६०४ मधून घेतलेले.

## भाग ३, प्र. ४

१. फ्रॉइड व तो ज्यांचा आधार घेतो त्या लँग, क्रॉले, मॅरेट वगैरे शास्त्रज्ञांनी ही कल्पना स्वीकारलेली नाही. फ्रेझरने ही कल्पना टाकून दिलेली आहे. ड्युर्खाइमवर बहुतेक तज्ज्ञांनी टीका केली आहे. सर्व प्रख्यात समाजशास्त्रज्ञांनी सामाजिक, वैचारिक केंद्राविरुद्ध मतप्रदर्शन केले आहे. तुलना करा– M. Ginsberg–" The Psychology of Society " 1921.

## भाग ३, प्र. ५

१. " Totem and Taboo, an Ethnologic Psychoanalysis " 1920, पृ. ४८ व पुढे.

२. जोन्स, पूर्वी उल्लेखिलेले ठिकाण.

२. तुलना करा– Freud–Group Psychology aud the Analysis of the Ego. 1922, पृ. ९०. Kroeber ह्या सुप्रसिद्ध तज्ज्ञाचे नाव Kroeger असे सर्वत्र छापलेले आहे. चुकीला काही तरी अंतःस्थ कारण असते हे तत्त्व इथे लागू पडेल काय ?

## भाग ३, प्र. ६

१. " Character and The Emotions " in Mind new series, vol. I and " the Foundations of Character " I edition 1917.

## भाग ४, प्र. २

१. विधानात व सर्व ग्रंथातच मी एकपत्नीव्रतावर आधारलेल्या कुटुंबाबद्दलचाच विचार केलेला आहे. डॉ. लोवी ह्यांनीही जवळजवळ सर्व मानवी समाजात एकपत्नीव्रत असल्याचेच ग्रहीत धरले आहे, पाहा– Primitive Society, विशेषतः प्र. ३. कॅ. पिट्-रिव्हर्स ह्यांच्या Contact of Races and Clash of Cultures ह्यात ह्या प्रश्नाचा फार उत्तम प्रकारे विचार केलेला आहे. त्यांच्या मते संस्कृतीच्या खालच्या पातळीवर अनेक-पत्नीव्रताला महत्त्व आहे. पुष्कळदा जमातीच्या प्रमुखाला अनेक बायका असल्यामुळे त्याला समाजात वरचा दर्जा मिळून त्याला राजकीय व आर्थिक फायदे होतात. ह्याबद्दल आणखी विचार व्हावयास पाहिजे.

२. ह्याबद्दलचा तपशीलवार विचार मी " Magic, Religion and Science " ह्या निबंधात केला आहे. हा निबंध जे नीड्हॅम् ह्यांनी संपादित केलेल्या ग्रंथात ( १९२५ ) समाविष्ट केलेला आहे.

## भाग ४, प्र. ३

१. पाहा–Havelock Ellis ह्यांचे Studies in the Psychology of Sex ( सहा भाग ). ह्यात लैंगिक उपजत बुद्धीचा जीवशास्त्रीय उगम लक्षात घेतलेला आहे व प्राणी आणि मानव ह्यांच्यांतील साम्य दाखवून दिलेले आहे. ह्या ग्रंथात डार्विनच्या Theory of Sexual Selection तसेच मानवातील लैंगिक निवड ह्या सर्वांचा विचार केलेला आहे.

२. Havelock Ellis ने निरनिराळ्या ऋतूंत होणाऱ्या मानवांतील व प्राण्यांतील लैंगिक संयोगाचा विचार " Sexual Periodicity ( भाग १, १९१० ची आवृत्ती ) ह्यात केला आहे. तुलना करा– Westermarck— History of

Human Marriage भाग १, प्रकरण २.

### भाग ४, प्रकरण ५

१. वेस्टरमार्कने " History of Human Marriage " मध्ये विवाहापूर्वी लैंगिक संयोग न केलेल्या १०० आदिवासी लोकांचा संदर्भ दिला आहे. ( १९२१, भाग १, पृ. १३८–१५७ ). पण त्याने दिलेला पुरावा समाधानकारक वाटत नाही. केवळ विवाहाच्या वेळी लैंगिक संयोग न केलेल्या स्त्री-पुरुषांना काही जमातींत मान मिळतो किंवा कुमारी नवरी त्या लोकांना फार मोलाची वाटते एवढे म्हणणे म्हणजे पुरावा होत नाही. पण त्यातली महत्त्वाची गोष्ट म्हणजे अपत्याच्या कायदेशीरपणाबद्दलची भूमिका. विवाहबाह्य लैंगिक संयोग उघडकीला आला तर समाजाची टीका व अपमान सहन करावा लागतो; तर काही जमातीत त्या दोन व्यक्तींना एकमेकांशी विवाह करावा लागतो. विवाहपूर्व पावित्र्य आणि अपत्याचा कायदेशीरपणा हे दोन प्रश्न वेगळे ठेवले पाहिजेत.

२. तुलना करा— प्रस्तुत लेखकाचे " The Father in Primitive Psychology, " 1927.

### भाग ४, प्र. ६

१. येथे ह्या मुद्द्याबद्दल विस्ताराने संदर्भ देता येणार नाहीत. माझ्या आगामी " The Psychology of Kinship " ह्या ग्रंथात ते मी करणार आहे.

### भाग ४, प्र. ९

१. तुलना करा.— Westermarck– " History of Human Marriage " व Lowie– " Primitive Society ". प्रस्तुत लेखकाच्या Kinship वरील आगामी ग्रंथात ह्याचे आणखी विवरण केले जाईल.

२. नात्याच्या व्यक्तीत विवाह झाल्यामुळे जीवशास्त्रदृष्ट्या होणारे परिणाम Pitt- Rivers– " Contact of Races and Clash of Culture " 1927 मध्ये पाहा.

### भाग ४, प्र. ११

१. पाहा— E. S. Hartland– " Primitive Society " 1921, पृ. २, ३२ व इतर.

२. R. H. Lowie, " Primitive Society, " Family, Kinship and sib ह्या विषयांवरील प्रकरणे.

३. " Crime and Custom in savage Society " 1926, Nature, ६–२–१९२६ ची पुरवणी, व १५–८–१९२५ चा निबंध.

# परिभाषा

| | |
|---|---|
| Adolescence | कुमारावस्था |
| Anal Eroticism | गुदद्वार लैंगिकता |
| Anthropology | मानवशास्त्र |
| Babyhood | बाल्यावस्था |
| Biology | जीवशास्त्र |
| Childhood | बालपण |
| Endogamy | अंतर्विवाह्यता |
| Ethnology | मानववंशशास्त्र |
| Exogamy | विवाहबाह्यता |
| Fairy Tales | यक्ष-यक्षिणींच्या गोष्टी |
| Family | कुटुंब |
| Family Complex | कुटुंबाचा मनोगंड |
| Fatherhood | पितृत्व |
| Foster Mother | दाई |
| Homosexuality | समलिंगी आकर्षण |
| Hypothesis | गृहीत प्रमेय |
| Hysteria | भावनोद्रेक |
| Infancy | शैशव |
| Initiation | दीक्षा |
| Instinct | उपजत बुद्धी, सहजप्रवृत्ती |
| Legends | दंतकथा |
| Maternity | मातृत्व |
| Matriarchy | मातृसत्ताक कुटुंबरचना |
| Matrilocal | मातृस्थानीय |
| Mental Complex | मनोगंड |
| Myth | लोककथा, पौराणिक कथा |
| Nuclear Complex | केंद्रगंड, केंद्रीय मनोगंड |

| | |
|---|---|
| Nuclear Family | केंद्रित कुटुंब |
| Nursery | मुलाची खोली, लहान मुलांची शाळा |
| Obscene | अश्लील |
| Paternity | पितृत्व |
| Patriarchy | पितृसत्ताक कुटुंबपद्धती |
| Patrilocal | पितृस्थानीय |
| Physiological | शरीरशास्त्रीय |
| Physiology | शरीरव्यापारशास्त्र |
| Pregenital | पूर्वलैंगिक |
| Primitive | प्राचीन, आदिवासी |
| Psychiatry | मानस विकृतिशास्त्र |
| Psychoanalysis | मनोविश्लेषणशास्त्र |
| Psychology | मानसशास्त्र |
| Puberty | वयात येणे |
| Savage | असंस्कृत, रानटी |
| Sensuous | भोगासक्तिविषयक |
| Sentiment | भावना |
| Sex | लिंग, लैंगिकता |
| Sexuality | लैंगिकता |
| Sociology | समाजशास्त्र |
| Symbolism | सांकेतिक भाषा |
| Taboo | निर्बंध, निषेध |
| Theory | उपपत्ती |
| Totem | कुलचिन्ह |
| Tribal Law | जमातीचा कायदा |

# सूची

❂ ❂ ❂

